भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प १०६ वें.

# चंद्रिका

अर्थात्

## कविवर्य चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे यांचा

## काव्यसंग्रह.



" पूर्णचंद्र न हि सहस्त्रधारा-पात्र रुप्याचें लटकविलें,
न चंद्रिका हें सरस्वतीनें पयोभिषिंचन चालविलें. "

गोदागौरव.

" O ! the joys that came down shower-like
" Of Friendship, Love, and Liberty,
" Ere I was old ! "

—S. T. COLERIDGE.

प्रस्तावनालेखक

गजानन त्र्यंबक माडखोलकर

सहसंपादक, 'महाराष्ट्र', नागपूर.

शके १८५३. सन १९३२.

कापडी बांधणी रु. ३-०-० ]

हस्ताक्षराचा नमुना.

## महाराष्ट्र-दर्शन.

"नित्यं ब्रह्म यथा स्मरन्ति मुनयो हंसा यथा मानसम्
सारंगा जलदागमं वनगजा ध्यायन्ति रेवां यथा ।
युष्मद्दर्शनलालसा प्रतिदिनं युष्मान्स्मरामो वयम्
धन्यश्चिंतितवासरोऽयमुदितो यत्रावयोः संगमः ॥"

— सुभाषितम्.

(पृथ्वी.)

सचेतन सुमूर्तिमान् मनपुढें महाराष्ट्र हा,
द्वितीय मम जीव हा, हृदय हा, जिव्हाळाचि हा;
रसाळ कवितेस हा उगम, तींतलें ओज हा,
तुडुंब भरला दिसे प्रणय हा, महानंद हा! १

— चंद्रशेखर.
८.१२.१९३१.

# मुखोद्गार.



आज तागाईत पुष्कळ आधुनिक कवींचे काव्यसंग्रह स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले आहेत. हा काव्यसंग्रहच अनेक कारणांनीं फार मागसला होता. पण परमेश्वरकृपेनें तोही आज ह्या रूपानें प्रगट होण्याचा सुयोग आला, हें पाहून फार संतोष वाटतो. आणि उशीरानें कां होईना, पण माझे मनोरथ परिपूर्ण केल्या-बद्दल त्या विश्वनियंत्याचे उपकार मानून मी हा काव्यसंग्रह माझ्या रसिक देश-बांधवांस प्रेमादरानें समर्पण करितों.

**वस्तू नीरस गौणहि सजवुनि माधुर्य त्यांतुनी भरिते,**
**संजीविनी–सुधेचें पोषक हें कार्य ‘ चंद्रिका ’ करिते.**

यास्तव ह्या संग्रहास ‘ **चंद्रिका** ’ हें अन्वर्थक नांव द्यावेंसें वाटलें, व तेंच दिलें आहे.

ह्यांतील अर्धी अधिक काव्यें गोदातीरीं नांदेड येथें राहणारे माझे अहेतुक कविमित्र रा. रा. राजेश्वर यादव मुळावेकर ( यादवसुत ) यांनीं मला मिळवून दिलीं आहेत. हे काव्यलोलुप सद्गृहस्थ मुंबईस प्रकृति अस्वस्थ असतांही तेथील मराठी ग्रंथसंग्रहालयांत प्रत्यहीं जात असत. तेथें त्यांनीं वृत्तपत्रें व मासिकें चाळून त्यांतून माझीं उपलब्ध झालीं तीं काव्यें शोधून काढलीं, व त्यांच्या यथातथ नकला करून त्या त्यांनीं मजकडे पाठविल्या. अर्थात् ह्या ग्रंथाची उभा-रणी करण्याच्या कामीं त्यांचें साहाय्य प्रामुख्यानें कारणीभूत झालें आहे. सबब, त्यांचे केवळ औपचारिक आभार मानून न थांबतां, त्यांनीं केलेल्या बहुमोल मदतीबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी आहें, असें प्रांजलपणें व्यक्त करितों. तसेंच,

येथील वरिष्ठ न्यायाधिशीचे वकील विद्वन्मित्र रा. रा. दाजी नागेश आपटे बी. ए., एल्एल्. बी. यांनीं कर्नाटक छापखान्याचे मालक व चालक श्रीयुत मं. ना. कुळकर्णी यांची माझी गांठ घालून दिली, व त्यांजकडून हा काव्यसंग्रह भारत-गौरव-ग्रंथमालेंत चिरस्थायी करून देण्याचें ठरविलें. यास्तव मी त्यांचा बहुत आभारी आहें !

## मुखोद्गार

ह्या ग्रंथास विद्वद्वर्य दाजी नागेश आपटे ह्यांनींच प्रस्तावना लिहावी असा पूर्वसंकेत होता. पण ह्या कामीं त्यांनीं घेतलेले परिश्रमच जास्त आहेत, असें जाणून त्यांस प्रस्तावना लिहिण्याबद्दल आणखी विशेष तसदी घ्यावयास लावणें, हें माझ्या संकोचवृत्तीमुळें मला बरें वाटलें नाहीं. जाणून, तें काम मी मित्रवर्य रा. माडखोलकर यांस करून देण्याविषयीं विनंति केली, व तिचा त्यांनींही मोठ्या आनंदानें स्वीकार केला. यास्तव मी त्यांचें आभारपूर्वक अभिनंदन करितों. रा. माडखोलकर हेही रसिक विद्वान्, बहुश्रुत व कसलेले लेखक आहेत. त्यांचें विवेचन यथार्थ गुणग्राही व मार्मिकपणाचें असतें असा लौकिक आहे; आणि त्यास साजेल अशी प्रस्तावनाही त्यांनीं ह्या ग्रंथास जोडली आहे. तत्रापि, केवळ त्यांची प्रस्तावनाच वाचून हें पुस्तक बाजूस न ठेवितां, यांतील काव्यें वाचक व टीकाकार आस्थापूर्वक वाचितील, व त्यांच्या वास्तविक बरेवाईटपणाबद्दल स्वावलंबनानें आपापले प्रांजल अभिप्राय ठरवितील, अशी मला आशा आहे.

शेवटीं आजन्म शारीरिक व मानसिक श्रम सोसून, मी सद्यःकालीन व भावी पिढीसाठीं जी ही कविता लिहून ठेविली, ती भारतगौरव ग्रंथमालेसारख्या सुप्रतिष्ठित वाङ्मयांत ह्या सुंदर रूपानें चिरथायी केल्याचें सर्व श्रेय श्री. मं. ना. कुळकर्णी यांस देऊन मी ह्या शब्दब्रह्मांतून परब्रह्मांत लीन होतों.

ॐ तत् सत् परमात्मने नमः ।

---

# प्रस्तावना



कविवर्य चंद्रशेखर यांनीं, आपल्या या काव्यसंग्रहाला प्रस्तावना लिहिण्याची आज्ञा मला करून, माझा मोठा बहुमान केला आहे, असें मी समजतों. वस्तुतः शब्दब्रह्माचा साक्षात्कार घडलेल्या त्यांच्यासारख्या प्रथितयश कवीला माझ्या प्रस्तावनेची काय आवश्यकता ? त्यांची पहिली कविता ज्या वेळीं 'करमणुकीं'तून छत्तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाली, त्या वेळीं माझा जन्महि झालेला नव्हता; व पत्ररूपानें त्यांच्याशीं माझा परिचय झाल्याला जरी आतां दहा वर्षें होऊन गेलेलीं असलीं, तरी त्यांच्या प्रत्यक्ष भेटीचा लाभ मला अजूनहि घडलेला नाहीं. त्यामुळें, या आपल्या 'चंद्रिके'ला प्रस्तावना लिहिण्याबद्दल जेव्हां मला त्यांचें पत्र आलें, तेव्हां 'अभिव्यक्तायां चंद्रिकायां किं दीपिकापौनरुक्त्येन' या कवि-कुलगुरूच्या मार्मिक उक्तीची आठवण होऊन, मला साहजिकच एक प्रकारचा संकोच वाटला. पण, त्यांच्या काव्यांच्या परिशीलनाचा जो विशुद्ध आनंद मी आज सतत एक तप उपभोगीत आलों आहें, त्याची अंशतः तरी फेड आपल्या हातून झाली तर पहावी, या बुद्धीनेंच अखेर मी हें साहस करावयाला उद्युक्त झालों. कारण, कवीचें ऋण रसिक हा फक्त त्याला धन्यवाद देऊनच पर्यायानें थोडें बहुत फेडूं शकतो. मधुपान करीत असतांना भ्रमरानें गुंजारव करावा, हें स्वाभाविकच होय. मग त्या गुंजारवानें फुलाला आपला गौरव झाल्यासारखा वाटो वा न वाटो. शिवाय, आणखीहि एक विचार माझ्या मनांत आला. कवीला समकाली-नांकडून सहसा न्याय मिळत नाहीं; व त्यानें भाकरीसाठीं हात पसरला असतां, पुष्कळदां त्याच्या कपाळीं धोंडा बसण्याचा प्रसंग येतो. चंद्रशेखरांच्या बाबतींत तरी दुर्दैवानें असाच प्रकार घडलेला आहे. केशवसुतांच्या वैणिकांतील उद्दाम भावनांचें तांडव पाहून स्तिमित झालेल्या तत्कालीन पिढीला चंद्रशेखरांच्या विचारगंभीर कवितेची बूज करण्याचें भान राहिलें नाहीं, असें दिसतें. एरवीं, 'असे गंजीफांचे धडधडित वाडे वसवितां' ही त्यांची 'तारातरंगां'तील एकच ओळ तेवढी काव्यमय आहे, या गोविंदाग्रजांच्या अविचारी उद्गारांचा दुसरा काय अर्थ करणार ? तेव्हां, समकालीनांकडून ज्याची अशा रीतीनें पद्धतशीर उपेक्षा झाली, त्या या थोर कवीचा, नवीन पिढीचा एक प्रतिनिधि म्हणून,

आपण यथार्थ गौरव करावा, अशीहि एक कल्पना माझ्या मनांत आली. कारण, कोणत्याहि प्रचंड शिल्पाची भव्यता किंवा रम्यता ही तें जवळून पाहणारापेक्षां दुरून बघणाराच्या मनांतच अधिक उत्कटतेनें भरत असते. त्या दृष्टीनें, चंद्रशेखरांच्या कवितेचें समालोचन, या प्रस्तावनेच्या रूपानें, करावयाला त्यांच्या समकालीन टीकाकारांपेक्षां मला खचित जास्त अधिकार पोंचतो.

चंद्रशेखरांच्या प्रतिभेची घडण अशा प्रकारची आहे कीं, त्यांच्या नामकरणाच्या दिवशीं जणुं कांहीं साऱ्या उदात्त गुणांच्या अधिदेवता त्यांचा पालख हलवावयाला भूतलावर अवतीर्ण झाल्या असाव्यात, असा भास मनाला होतो. जानकीजीवनाच्या पदस्पर्शानें पुनीत झालेल्या गोदावरीच्या परिसरांत जन्म; पुण्यासारख्या विद्वत्तेच्या माहेरघरीं संस्कारसुलभ विद्यार्थिदशा गेलेली; पुत्रोपम प्रेम करणाऱ्या ज्येष्ठ बंधूंच्या सुसंस्कृत सहवासांत प्रतिभेचा विकास झालेला; महाराष्ट्रशारदेचा केवळ सजणच अशा दत्त कवीचें अकृत्रिम सौहार्द लाभलेलें; आणि गुजरातच्या देवभूमींतील, ब्रिटिश रियासतीपेक्षांहि एका अर्थानें अधिक प्रगमनशील, अशा बडोदें संस्थानांत वास्तव्य. हें त्यांचें भाग्य जरी दारिद्र्यदोषानें डागळलेलें असलें, तरी त्यांत अंतर्हित असलेलें अध्यात्मिक ऐश्वर्य किती थोर आहे ! त्यांचा हा काव्यसंग्रह म्हणजे त्या ऐश्वर्याचा मूर्तिमंत आविष्कारच होय. त्याचें तें गभीर पण प्रसन्न सौंदर्य पाहिलें, म्हणजे शुचितेच्या बाबतींत मुनिमनाशीं स्पर्धा करणाऱ्या, बाणानें वर्णिलेल्या, अच्छोद सरोवराची आठवण होते. क्षुद्र विचार किंवा शबल भावना यांचा चुकूनहि कुठें आढळ त्यांत व्हावयाचा नाहीं. आणि तो व्हावा तरी कसा? कारण, चंद्रशेखरांची कवितेविषयींची कल्पनाच मुळीं अशी कीं,—

**जें जें शुद्ध, उदात्त, उज्ज्वल असे हेलाविते तें मनीं**
**धन्या ती कविता भवार्तहि जनां जी वृत्ति दे उन्मनी**

त्यांनीं कविस्फूर्ति हा मुळीं एक समाधीचाच प्रकार मानला आहे. ‘कुंजकूजना’ला आळवितांना ते उद्गारतात—

**दिव्य तेजोवलयांत विचारांच्या**
**लीन होउनिया कवी सुधावाचा**
**वदे नैसर्गिक काव्य.........**

कवीच्या या योगारूढ स्थितीचें त्यांनीं ‘ कवितारती ’च्या प्रारंभीं मोठें मनोहर वर्णन केलें आहे. तें वर्णन काल्पनिक नाहीं. त्यांनीं स्वतः त्या उन्मनीचा अनुभव घेतला असल्याचा प्रत्यय हा संग्रह वाचतांना अनेकदां येतो. किंबहुना, त्यांच्या वेदांती मनाचा हा एक विशेषच आहे कीं, तें स्फूर्तीच्या आवेशनिमिषांत परेंतून अपरेंत, प्रत्यक्षांतून परोक्षांत आणि ज्ञातांतून अज्ञेयांत न कळत लीलेनें प्रवेश करितें. ‘ वसंतमाधवां’त वसंताच्या वन्य आणि नागर वैभवाचें वर्णन करितां करितां, त्यांना एकदम बहिःसृष्टीप्रमाणें अंतःसृष्टींतहि वसंत विनटलेला दिसतो; आणि, त्या मनोगत माधवाचें चिंतन करितां करितां–

**येथें नसोनि मुरली रव रम्य चाले,**
**येथें न चंदन तरी वपु गार झालें,**
**येथें नसोनि रवि तेजचि तेज आहे,**
**मध्यें मनोनयनहो ! बघवे न साहे.**

अशी त्यांची अवस्था होऊन जाते. मिल्टनच्या ‘ इल् पेन्सेरोसो ’ या काव्याचें त्यांनीं केलेलें रूपांतर जें इतकें उत्कृष्ट साधलें आहे, तें याच कारणामुळें.

आणि, खरोखरीच मिल्टनप्रमाणें महाकवि व्हावयाला योग्य अशीच त्यांच्या मनाची रचना आहे. केशवसुत, टिळक किंवा दत्त यांच्याप्रमाणें त्यांची प्रतिभा वैणिक ( Lyrical ) नाहीं. कोणत्याहि कवीची प्रतिभा वैणिक असावयाला तो थोडा तरी आत्मपूजक,—अहंनिष्ठ असावा लागतो. स्वतःच्या वासना-विकारांत भाव-कवीचें ( Lyrical Poet ) मन इतकें रमलें–रंगलेलें असतें कीं, त्यापरतें त्याला दुसरें कांहीं सुचत नाहीं; व आपल्या अगदीं क्षुद्रतम अशाहि भावनेला पृथ्वीमोलाची कल्पून, तिच्यासाठीं, निदान शब्दसृष्टींत तरी, तो ब्रह्मांडाची आदळ करावयाला बिनदिक्कत तयार होतो. व्यापक तत्त्वांचा किंवा कल्पनांचा साक्षात्कार त्याच्या मनाला होत नाहीं, असें नव्हे. पण, तो झाला, तरी पृथ्वी ज्याप्रमाणें सूर्याला प्रदक्षिणा घालीत असतांनाहि स्वतःभोंवतीं गिरक्या मारीत असते, त्याप्रमाणें व्यापक तत्त्वांच्या समाधींतहि त्याच्या आत्मपूजक प्रतिभेचा अहंभाव गळून पडत नाहीं. त्याच्या या अहंतेच्या उन्मादांतच वैणिकाची सारी आकर्षकता सांठविलेली असते म्हटलें तरी शोभेल. टिळकांच्या विनवणीं ’त दाखविलेली ईश्वरी निःश्वसितांची भीति किंवा ‘ आम्ही कोण ’

या सुनीतांतील केशवसुतांचे दर्पोद्गार विचारांतीं जरी कदाचित् आपल्याला असमंजस वाटले, तरी हीं वैणिकें वाचीत असतांना आपण त्यांतील उन्मादानें क्षणैक मोहून जातोंच कीं नाहीं ? ही अहंता,—आत्मपूजनाची ही प्रवृत्ति चंद्रशेखरांच्या ठिकाणीं अगदीं नाहीं. त्यांच्या स्वतःच्या शब्दांत सांगावयाचें, म्हणजे त्यांची कविता 'अनुविचार–संचारिणी' आहे. तिचा उद्भव भावनेच्या अतिरेकांतून होत नाहीं; तर विचारांच्या परिणतींतून ती विकसित होते. फ्रेंच टीकाकार टेन यानें मिल्टनविषयीं असें म्हटलें आहे कीं, "तो भावनेच्या आवेगांत वाहून जाऊन लिहीत नसे; तर स्वतःला सुचलेल्या कल्पनांना पूर्वसूरींच्या कल्पनांची जोड देऊन आणि वस्तुजाताचें जसें साक्षात् तसेंच पुस्तकांतून आलेलेंहि ज्ञान संपादून, एकाद्या साहित्यकोविदाप्रमाणें आपल्या काव्यांची रचना करण्याचा त्याचा प्रघात होता." चंद्रशेखरांविषयींहि असेंच म्हणतां येईल. भाव-कवीच्या प्रतिभेचें उद्दीपन अनुकूलप्रतिकूल संवेदनेची नुसती एक ठिणगी पडल्यानें होऊं शकतें. त्याचें मन म्हणजे, जणुं कांहीं, तो एक बारुद ठांसून भरलेला सुरुंगच. चंद्रशेखरांच्या प्रतिभेच्या उद्बोधनाचा प्रकार अगदीं निराळा. क्षेमेंद्रानें 'कविकंठाभरणां'त असें म्हटलें आहे कीं, "महाकवींच्या कृतींतील रस-गुणांचा उद्रेक पाहून तन्मय झालेलें मन जेव्हां त्या तन्मयतेच्या कारणांचें मनन करितें, तेव्हां त्याला स्वतःला कवित्वाचे कोंब आपोआप फुटतात." चंद्रशेखरांच्या प्रतिभेचें उद्बोधन पुष्कळदां याच प्रकारानें घडलेलें असल्याचें दृष्टीस पडतें. तिचा आत्मा विचार हा आहे, भावना नव्हे. त्याचें एक उदाहरण याच संग्रहांत दाखवावयाचें झालें, तर तें असें दाखवितां येईल कीं, जें सोमनाथाचें उध्वस्त देवालय पाहून अलीकडील भाव--कवीला फार तर एकाद दुसरें सुनीत लिहिण्याची सुरसुरी आली असती, त्या देवालयाच्या भंगलेल्या प्राकारांत चंद्रशेखरांच्या अभिजात प्रतिभेला त्याच्या वृद्ध वास्तुपुरुषाचें दर्शन घडून, सोमनाथावर ऐतिहासिक महाकाव्य लिहिण्याची स्फूर्ति झाली. अशा विचारप्रधान कवीला वैणिकें लिहिणें जवळ जवळ अशक्यच. त्यांच्या कवितेचें स्वरूप रानांतून अल्लडपणानें खळखळत वहाणाऱ्या ओहोळा-सारखें नाहीं; तर जिच्या विशाल प्रवाहांत तीरावरील मंदिरांचीं व प्रासादांचीं रम्योत्तुंग शिखरें प्रतिबिंबित झालेलीं आहेत अशा मंदाकिनीसारखें आहे. आणि, शरदृतूंतील पुनवेच्या रात्रीं, देवळांतील घंटांचे मधुर नाद ऐकत किंवा प्रासादांच्या

महाद्वारांवरील मनोहर दीपराजि पहात, तिच्या पात्रांतून नौकाविहार करीत असतांना ज्या प्रकारचें सुख होतें, त्याच प्रकारचा आनंद त्यांची अभिजात कविता वाचतांना मनाला होतो.

तथापि, आपल्या या विशिष्ट मनोवृत्तीमुळें चंद्रशेखरांना जरी वैणिकें लिहिणें शक्य झालें नसलें, तरी 'दत्तवियोग,' 'कवितारति,' 'कुंजकूजन,' 'तारातरंग,' 'उत्कंठिता' इत्यादि त्यांच्या कांहीं कवितांतून भावना आणि विचार यांचा हृदयंगम मिलाफ झालेला दृष्टीस पडतो. विशेषतः 'कवितारति' ही त्यांची कविता अतिशय आत्मपर आहे. कवितेविषयीं आपल्याला असलेली आसक्ति आणि तिच्या प्रसादनासाठीं आपण केलेली तपस्या यांचें या कवितेंत त्यांनीं केलेलें वर्णन मनाला चटका लावितें.

**तुझ्यास्तव उपेक्षिल्या बहुविधा सुविद्या कला,**
**तुझ्यास्तव न तीं पदें, उपपदें मिळालीं मला;**
**तुझ्यास्तव न लोभतां विभवमार्ग मी टाळले,**
**तुझ्यास्तव सखे ! मला स्वजन तेहि कंटाळले;**
**तुझ्यास्तवचि हेलना मम गृहावधानीं घडे,**
**तुझ्यास्तव जनाहुनी विजन हा मला आवडे,**
**तुझ्यास्तव तुझ्यापरी मृदुल देहिनी गेहिनी**
**अनेक समयीं दिली ढकलुनी, अये मोहिनी !**

हें वर्णन कांहीं निव्वळ अलंकारिक किंवा औपचारिक नाहीं. मिल्टनप्रमाणें चंद्रशेखरांनींहि कवित्वशक्ति ही दैवी सिद्धि मानलेली आहे; व ती साध्य होण्यासाठीं त्यांनीं कोणतेहि कष्ट करावयाचे शिल्लक ठेविलेले नाहींत. संस्कृत, मराठी आणि इंग्रजी या तीन भाषांतील सत्कवींच्या उत्कृष्ट कृतींचीं पारायणें तर त्यांनीं आपल्या प्रतिभेच्या विकासासाठीं केलींच. पण, 'वाग्वश्येवानुवर्तते' अशी स्थिति प्राप्त झाल्यानंतरहि, वर्ण्य विषयाच्या चिंतनांत त्यांनीं रात्रीच्या रात्री अलोचन घालविल्या आहेत; आणि शब्दार्थांचें सात्म्य साधण्यासाठीं तास न् तास तळमळत काढले आहेत.

**निशा दशदिशांसही गवसणी यदा घालिते,**
**सुषुप्ति निज मोहनी स्थिरचरांवरी टाकिते,**

**प्रशांत समयीं अशा भ्रमसि जेथ लीलावती,**
**अतंद्रितचि तेथ हा अनुसरे तुझा सोबती**

अशा अतंद्रित स्थितींत जेव्हां अर्धी रात्र घालवावी, तेव्हां ज्या केवल समाधीवर त्यांनीं एवढा भर दिला आहे, तींत त्यांच्या मनाचा लय होऊन, त्यांची प्रतिभा जागृत होत असे. अशा तऱ्हेची एकनिष्ठ तपस्या त्यांनीं केलेली असल्यामुळेंच त्यांच्या कवितेंत भाषेचें सौष्ठव आणि विचारांचें सौंदर्य इतकें समरसतेनें एकवटलेलें पहावयाला मिळतें. लेंभे, मोगरे, टिळक प्रभृति त्यांच्या समकालीन अभिजात कवींपैकीं एकाचीहि रचना त्यांच्या रचनेइतकी रमणीय नाहीं. टिळकांच्या कवितेंत प्रसाद पुष्कळ असला, तरी नादाचा जवळ जवळ अभावच. उलट लेंभे यांच्या कवितेंत नाद हाच मुख्य गुण. पण, पायांत घुंगुर बांधून नाचणाऱ्या नर्तकीच्या सावलील पदन्यासांनीं जरी मन कांहीं वेळ गुंग केलें, तरी तिच्या नृत्यांत जर भावनांचा नवनवोन्मेष नसेल, तर तें जसें लवकरच कंटाळवाणें होतें, त्याप्रमाणें लेंभे यांच्या त्या श्रवणकोमल पण अर्थाच्या दृष्टीनें किंचित् हीणकस असलेल्या कवितेची मोहनी मनावर फार काळ टिकत नाहीं. शिवाय त्यांच्या रचनेंत सैलपणा फार. उलट, चंद्रशेखरांनीं जरी पदपूरकें क्वचित् वापरलेलीं असलीं, तरी तीं उत्कृष्ट नकसकामांत एकाद दुसऱ्या तडा गेलेल्या जागीं लुकण भरावें त्याप्रमाणें. मोगरे यांची कविता म्हणजे बोलून चालून गद्याच्या सरहद्दीवर घोटाळणारें पद्य. रचनेच्या बाबतींत चंद्रशेखरांनीं केवळ आपल्या या समकालीन कवींवरच नव्हे, तर वामनपंडित आणि मोरोपंत यांच्यावरहि मात केली आहे, असें म्हणावयाला मला यत्किंचितहि शंका वाटत नाहीं. वामनपंडितांचे श्लोक त्यांच्या श्लोकांइतके सुश्लिष्ट नाहींत आणि मोरोपंतांच्या आर्या त्यांच्या आर्याइतक्या प्रसन्न नाहींत. त्यांच्या श्लोकांची बरोबरी कदाचित् रघुनाथ पंडितांचे श्लोकच करूं शकतील. चंद्रशेखरांचे शब्द इतके मृदु आणि रसगर्भ असतात कीं, त्यांचें सौष्ठव पाहून कमलांची कांति हरपावी; त्यांची रचना इतकी घोटीव असते कीं, तिच्या आरस्पानी अंगांतून ध्वन्यर्थांच्या छटा विविधतेनें झळाळतात; आणि, वागर्थांचें अद्वैत त्यांच्या कवितेंत इतकें सुंदर साधलेलें असतें कीं, त्याच्या मानानें भारवीचें क्लिष्ट अर्थगौरव साहजिकच रुक्ष वाटतें.

चंद्रशेखरांच्या प्रतिभेचे हे सारे आत्मीय गुण या संग्रहांतील 'घनाभिनंदन,' 'हिंदवंदना,' अद्भुत वीणा,' 'सौजन्य,' 'महाराष्ट्रदर्शन,' 'काय हो चमत्कार'

'मानसांतील प्रतिबिंबें,' 'कवितेचीं विहारस्थळें' इत्यादि त्यांच्या स्फुट वा खंड काव्यांतून उत्कटतेनें व्यक्त झालेले आहेत. यांपैकीं कांहीं काव्यांना इंग्रजीचा आधार आहे, हें खरें. पण तो आधार म्हणजे, चित्रकारानें आपल्या कल्पकतेला स्फूर्ति मिळण्यासाठीं कांहीं काळ पुढें एकादा आदर्श ( Model ) ठेवावा, तशा प्रकारचा. स्वतःच्या स्मृतिसंपुटांत सांठविलेल्या सौंदर्यविशेषांची जोड देऊन त्यानें निर्मिलेली कृति जशी बहुधा त्या आदर्शाहून भिन्न आणि रम्य असते, तशीच स्थिति चंद्रशेखरांच्या या इंग्रजीवरून, फक्त कल्पनेची तेवढी स्फूर्ति घेऊन, लिहिलेल्या कवितांचीहि आहे. उदाहरणार्थ, त्यांची 'सौजन्य' हीच कविता घ्या. 'सौजन्या' वर सचेतनत्वाचा आरोप करून, त्याच्या देव-मूर्तीचें जें मनोज्ञ चित्र त्यांनीं तींत रेखाटलेलें आहे, तें पहात असतां, त्या कवितेचें मूळ एका अमेरिकन पंडिताच्या सौजन्यावरील ( Gentleness ) निबंधांत आहे, असें कोणाला वाटेल ? या कवितेंतील सौजन्याच्या शब्द-चित्राइतकींच 'अद्भुत वीणें' तील करुणादि सात देवतांचीं शब्दचित्रेंहि रमणीय आणि त्यांच्या वैशिष्ट्याचीं निदर्शक आहेत. 'काय हो चमत्कार' या त्यांच्या लोकप्रिय खंडकाव्याला जी इतकी अवीट गोडी आली आहे, ती त्यांच्या या अतुल चित्रणचातुरीमुळेंच होय. आर्येसारखें मोरोपंतांनीं बेसुमार हाताळलेलें गद्यसदृश वृत्त; आणि कथानक पहावें, तर तेंहि अगदीं ग्रामीण. पण, चंद्रशेख-रांनीं त्यांतील प्रत्येक प्रसंग इतका सहृदयतेनें आणि सुंदर रेखाटलेला आहे कीं, त्याच्यापुढें अलीकडील नकली चटकदार वैणिकें आणि चित्ताकर्षक प्रणयकथा अगदीं फिक्या वाटतात. पाटिलबोवांच्या जिऊचें हें त्यांतलें वर्णन किती सहज-मधुर आहे पहा—

**गोधूमवर्ण तीचा, हरणाच्या पाडसापरी डोळे**
**स्नेहाळ वदन नामी, प्रसन्न विधुबिंब जेविं वाटोळें;**
**तो केशपाश काळा, भाळावरि लांब आडवें कुंकूं,**
**जणुं म्हणाति शब्द तीचे आम्ही कोकिलरवासही जिंकूं;**
**घेती पाटिल साड्या हौसेच्या रेशमी किनारीच्या,**
**ऐनेदार खडीच्या झळकति चोळ्या तया कुमारीच्या;**
**येतां सुदिन सणाचा पुतळ्यांची माळ ती गळां घाली,**
**तेव्हां शृंगाराच्या माहित नव्हत्या नव्या तऱ्हा चाली;**

**जाई आईसंगें मळ्यांत किंवा खळ्यांत ही कन्या,**
**साधी निसर्गसुंदर दिसे तदा देवता जणों वन्या.**

त्याचप्रमाणें, जिऊ आणि तिचा प्रियकर यांच्या पहिल्या भेटीचें हें वर्णन तरी किती हृदयस्पर्शी आहे !—

**किन्नरमिथुनासम तीं द्राक्षीच्या रम्य मंडपाखालीं**
**कांहीं गुंजन करितां अदृश्य तेथेंच दृष्टिला झालीं.**
**एका क्षणप्रभावें बनलीं अन्योन्य मित्र जिवलग तीं,**
**लगबगती भेटाया, भेट न होतां मनांत तगमगती.**
**भारोनि टाकिलीं जणुं, जादूच्या पूर्णसिद्ध मंत्रानें,**
**वागति भिन्न जनांमधिं तथापि विजनांत एकतंत्रानें.**

गेल्या तीस वर्षांत अनेक आधुनिक कवींनीं कथनपर खंडकाव्यें लिहिलेलीं असून, टिळकांचें ‘ सुशीला ’ किंवा विनायकांचें ‘ गणिकोद्धार ’ इत्यादि खंड-काव्यें आपआपल्या परीनें उत्तमच आहेत. पण, जानपद जीवनाच्या मुग्ध पार्श्वभूमीवर चंद्रशेखरांनीं उभी केलेली ही, मृत्यूवर मात करणाऱ्या दिव्य प्रेमाची, करुणकथा इतकी रसपूर्ण आहे कीं, तिला मराठी खंडकाव्यांत केवळ स्वतंत्रच नव्हे, तर श्रेष्ठ स्थान देण्याचा मोह पडतो.

परंतु, या खंडकाव्यापेक्षांहि ‘ गोदागौरव ’ या त्यांच्या, दुर्दैवानें अपुऱ्याच राहिलेल्या, भाव-काव्याची योग्यता आणि महत्त्व अनेक दृष्टींनीं अनन्य वाटतें. या काव्यांत चंद्रशेखरांनीं गोदावरीचें आणि तिच्या सान्निध्यांत आपण घाल-विलेल्या दिवसांचें अतिशय हृदयंगम वर्णन केलें आहे. गंगेवर जगन्नाथ पंडितांनीं लिहिलेलें, किंचित् निराळ्या प्रकारचें पण आत्मपर असें, ‘गंगालहरी ’ हें संस्कृत लघुकाव्य लोकप्रिय असून, चिंतामणिपेठकरांचें निव्वळ वर्णनपर असें ‘ गंगावर्णना ’ हें मराठी काव्यहि पुष्कळांच्या पहाण्यांत असेल. पंडितरायांच्या काव्यांत गंगेच्या परिसरांचें, वास्तविक म्हणतां येईल असें, वर्णन प्रायः मुळींच नाहीं; जे काय थोडेसे वर्णनपर श्लोक आहेत, ते कल्पनाविलासांतच गणावे लागतील. उलट, चिंतामणिपेठकर यांनीं भूवर्णन व नकाशा डोळ्यांपुढें ठेवूनच जणुं कांहीं आपलें काव्य लिहिलें आहे, असा भास त्यांतील पल्लेदार वर्णनें वाचून होतो. ‘गोदागौरवां’त या दोन्ही काव्यांतील उत्तम विशेष एकवटलेले

आढळतात. त्यांत 'गंगालहरीं'तील आर्तता जशी आहे, तशीच 'गंगावर्णनें'-तील वर्णनाची सूक्ष्म दृष्टीहि पण आहे. किंबहुना, त्यांतील प्रत्येक स्थलाचें, दृश्याचें आणि व्यक्तीचें वर्णन आत्मीयतेच्या जिव्हाळ्यानें केलेलें असल्यामुळें, बायरनच्या 'चाइल्ड हॅरोल्ड' या काव्याप्रमाणें, त्याला उत्कृष्ट वैणिकाची माधुरी प्राप्त झाली आहे. त्याची सुरुवातच मुळीं मनाला अगदीं चटका लावते. जननी-समान प्रिय असलेल्या गोदेच्या दर्शनासाठीं आसुसलेला हा कवि आपल्या प्रति-भेला म्हणतो—

**यास्तव मज ह्या उष्ण धुळीच्या गुजराथेंतुनि चट्सरशी**
**उचलुनि देवी ब्रह्मगिरीवरि गोदेसन्निध ठेव कशी !**

आणि तिच्या संनिध येतांच, पंडितरायांप्रमाणें, त्यानें असा निर्धार केला कीं,—

**प्रगटुनि येथें मूर्तिमती तूं देशिल दर्शनलाभ जना,**
**तोंवरि माते ! करीत राहिन एक लयानें तव भजना;**
**भजनांतहि मज बालवयींच्या सहजचि होतिल आठवणी,**
**हृदय विदारुनि दावुं कुणाला सुखासुखाच्या सांठवणी ?**

अशा तऱ्हेचा प्रारंभ करून नंतर चंद्रशेखरांनीं आपण अवलोकिलेलीं दृश्यें आणि अनुभविलेले प्रसंग यांचें अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन केलें आहे. त्या वर्णनांत आत्मपरता जरी ओतप्रोत भरलेली असली, तरी अहंता मात्र मुळींच नाहीं. वाऱ्यानें झुलणाऱ्या वनस्थलीवर जशी संध्येची रम्योदास प्रभा पडलेली असावी, तसें या भाव-काव्यावर, नाना प्रकारच्या आठवणी होऊन, त्यांच्या मनाला आलेल्या उदासपणाचें मनोहर पटल पसरलेलें आहे. या बाबतींत प्रसिद्ध इंग्रजी कवि गोल्डस्मिथ याच्या 'ट्रॅव्हलर' या काव्याशीं त्याचें बरेंच साम्य आहे, असें म्हणतां येईल. तथापि, त्या काव्याइतकें 'गोदागौरव' हें चिंतनप्रधान मात्र खास नाहीं. 'ट्रॅव्हलर' मध्यें वर्णन आणि चिंतन यांचा इतका बेमालूम मेळ पडलेला आहे कीं, तें वाचीत असतांना वर्णनाच्या घनदाट राईतून चिंतनाच्या गुहेंत आपण केव्हां प्रवेश करितों, हें आपल्याला कळतहि नाहीं. उलट 'गोदागौरवांत'त चिंतनापेक्षां वर्णनांवरच कवीचा भर एकंदरींत अधिक. त्यांतील सारींच वर्णनें इतकीं रेखींव आणि रसपूर्ण आहेत कीं, तीं वाचीत असतां गोदावरीचे ते रमणीय परिसर डोळ्यांपुढें उभे राहून,

## प्रस्तावना

**मन रमलें, मी जाऊं अथवा येथचि राहूं ? सांग बरें !**
**चालुनि पुढतीं, बघतां मागें, नयनांतुनि हे झरति झरे.**

अशी कवीप्रमाणें आपल्याहि मनाची अवस्था होते.

अशा तऱ्हेचें हें अपूर्व भाव-काव्य पुरें करण्याइतकी मानसिक आणि प्रापंचिक स्वस्थता चंद्रशेखरांना लाभूं नये, याबद्दल कोणाला खेद वाटणार नाहीं ? ज्याची वाणी इतकी आकर्षक, ओघवती आणि प्रदीर्घ रचनेला अनुकूल, त्या या थोर कवीचें प्रतिभाबल मासिकांच्या मागणीनुसार काय केवळ स्फुट आणि खंड काव्यें लिहिण्यांत खर्च व्हावें ? ताजमहालासारखें विशाल शिल्प निर्माण करण्याची ज्याची योग्यता, त्या कलावंताचा सारा जन्म शाडूचीं सुबक चित्रें करण्यांत जावा, हें आश्चर्य नव्हे काय ? पण याबद्दल मनाला वाईट वाटून घेण्यांत काय अर्थ ? मिल्टनप्रमाणें चंद्रशेखरसुद्धां भलत्याच काळांत जन्माला आले, हेंच खरें. प्रतिष्ठेसाठीं चुरशीचे सामने करण्याचा हा काळ असून, आपल्याला प्रसिद्धीची बिलकूल लालसा नाहीं असें तोंडानें म्हणत, स्वतःच्या अचिर-प्रकाशित काव्यांची वर्णी विद्यापीठांत लावण्यासाठीं तेथील वतनदारांचे उंबरठे गुप्त रीतीनें झिजविणाऱ्या दांभिकांची आज सर्वत्र चलती आहे. अशा या आत्मपूजनाच्या काळांत चंद्रशेखरांसारख्या मानधन कवीला कोण विचारतो ? पण, आज जरी त्यांच्या लोकोत्तर कवित्वगुणांची बूज दुर्दैवानें होत नसली, तरी आधुनिक कवितेचा भावी इतिहासकार जेव्हां तिचा आढावा घेण्यासाठीं मुरडून मागें पाहील, तेव्हां महाराष्ट्राच्या अर्वाचीन अभिजात कवींत त्याला चंद्रशेखरांना अग्रपूजेचा मान द्यावा लागेल, अशी मला खात्री वाटते.

ता. १२ । १ । ३२
चिटणीसपुरा, नागपूर.

**ग. त्र्यं. माडखोलकर.**

# प्रकाशकांचें निवेदन.



ह्या चंद्रिकेंत संकलित असलेल्या कवि चंद्रशेखर यांच्या काव्यांतील गुणवैशिष्ट्य, श्री. माडखोलकर यांनीं आपल्या प्रस्तावनेंत सांगितलेंच आहे. तेव्हां त्याची पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाहीं. श्री. माडखोलकर यांचें समालोचन अगदीं यथार्थ आहे, असें आम्हांस वाटतें; व आमच्या म्हणण्यांतील सत्य वाचकांस प्रत्यक्ष अनुभवानें कळून येईल, अशी आमची खात्री आहे. आतां, आम्हांस विशेष सांगावयाचें तें इतकेंच कीं, स्वतंत्र काव्यरचना करणें हें काम तर कठिण खरेंच. पण इतर भाषेंतील कवितांचें समर्पक आणि गोड असें कवितात्मक भाषांतर करणें, हें कामही कांहीं कमी दुष्कर नव्हे. किंबहुना, तें करणारास मूळच्या कवीची तंतोतंत साथ करावयाची असते, आणि म्हणूनच भाषांतरकारांत स्वयं-कवीपेक्षांही प्रसंगोपात्त अधिक कौशल्य असावें लागतें, असें म्हटलें तरी चालेल. हें कौशल्य कवि चंद्रशेखर ह्यांच्यांत पूर्णतेनें असल्याचें आमच्या प्रत्ययास आलें आहे. त्यांनीं स्वामी विवेकानंदांच्या इंग्रजी कविता, श्रीमदाचार्यांचा आत्मबोध, इत्यादि काव्यांचीं जीं सर्वांगसुंदर भाषांतरें केलीं आहेत, तीं ह्या संग्रहाच्या शेवटच्या भागांत दिलीं आहेत ( पान २६९ ते २९१ व ३०१–११ ). तीं पाहतां वाचकांस आमच्या म्हणण्याची साक्ष पटेल. एकंदरींत ह्या कवींनीं आपला सर्व जन्म सरस्वतीच्या एकनिष्ठ उपासनेंत घालविला असून श्री. माडखोलकर यांच्या म्हणण्याप्रमाणें ते वामन पंडित, रघुनाथ पंडित, मोरोपंत, इत्यादि प्राचीन, व टिळक, केशवसुत, लेंभे, इत्यादि अर्वाचीन अभिजात कवींप्रमाणेंच लोकादरास पात्र आहेत, असें आम्हांस वाटतें.

प्रकाशक.

# कविचरित्राचा सारांश.



गोदातीरीं श्रीक्षेत्र नासिक येथें तिलभांडेश्वर महादेवानजीक गोऱ्हे घराण्याचें चार पिढ्यांचें वडिलोपार्जित घर आहे. तेथें माघ शु० ८ रविवार शके १७९२, म्हणजे ता. २९ जानेवारी सन १८७१ रोजीं सूर्योदयाबरोबर कवि चंद्रशेखर यांचा जन्म झाला. त्यांस आपल्या मातोश्रींच्या उदरांत १८ वर्षें वास करावा लागला ! हा त्यांच्या जन्मासंबंधीं एक असाधारण विशेष आहे. नासिकापासून नजीक असलेल्या गंगापूर गांवीं एक वयोवृद्ध निष्णात वैद्य रहात असत. त्यांच्या गुणावह औषधी क्रियेनें ते जन्मास येऊं शकले. ही गोष्ट खुद्द मातोश्रींच्या मुखानें त्यांस पुष्कळ वेळां सांगण्यांत आली होती. त्यांचे वडील शिवराम रामकृष्ण, व मातोश्री मणिकर्णिकाबाई यांस अनुक्रमें वामनराव व नारायणराव असे दोन पुत्र झाले; व नारायणरावांमागून २० वर्षांनंतर ह्यांचा जन्म झाला. हे कवि शुक्ल यजुर्वेदीय माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण.

२. लहानपणीं वडीलधाऱ्या माणसांकडून यांचें लाडकोडानें जें संगोपन करण्यांत आलें, व त्यांच्या छत्रछायेंत असतां यांनीं जे उपभोग भोगिले, त्यांचें दिग्दर्शन गोदागौरवांत केलेंच आहे ( पान २५२–५३ ). यांचें मराठी शिक्षण दाजी पंतोजींच्या गांवठी शाळेंत, व नंतर सरकारी नंबर ३ च्या शाळेंत नासिक येथेंच झालें. मराठी पांचवी इयत्ता उत्तीर्ण झाल्यावर इंग्रजी शिकण्यासाठीं ते नासिक हायस्कुलांत जाऊं लागले. हें शिक्षण चवथ्या इयत्ते पावेतों आलें होतें. शाळेला उष्णकाला निमित्त रजा होती. तेव्हां ती सुटी मौजेंत घालविण्यासाठीं कवींचे सख्खे चुलते गोपाळ रामकृष्ण ऊर्फ गोपूतात्या यांनीं त्यांस सिन्नर येथें बोलाविलें. यावेळीं गोपूतात्या सिन्नरास सार्वजनिक बांधकाम खात्यांत नौकरीस होते. ह्या सिन्नरच्या सहलींत कवींबरोबर त्यांचा समवयस्क पुतण्या नीलकंठ, जो त्यांच्याच वर्गांत असे, तोही होता. सिन्नर हा तालुका बागाइती असल्यामुळें हवामानानें सर्द, तथापि रमणीय आहे. तेथें गोपूतात्या बाजीराव देशपांडे ह्यांच्या वाड्यांत बिऱ्हाडानें रहात असत. त्यांतील एक स्वतंत्र माडी ह्या तरुण चुलत्या पुतण्यांस सोंपण्यांत आली. तींतून गांवचा देखावा दिसत होता. शिवाय, नागेश्वर–गोंदेश्वर ह्या भव्य देवालयांच्या आवारांतून ही दुकल चैनीनें भटकावयासही जात असे. ह्याच ठिकाणीं कवि चंद्रशेखर यांनां अगदीं पहिल्यानें कविता

करण्याची बुद्धि सुचली. ते मनाशीं गुणगुणत एक स्तोत्र लिहूं लागले; व त्या बरोबरच त्यांचा पुतण्या "का वर्डस्वर्थ!" म्हणून त्यांची टर उडवूं लागला! त्यांच्या स्तोत्राचें पालोपद

**"नारायणा शरण त्या करुणालया मी"**

असें होतें. हें स्तोत्र तयार झाल्यावर त्यांनीं गोपूतात्यांस वाचून दाखविलें. तें त्यांना फार आवडलें; व त्यांनीं आपले पुतणे चंद्रशेखर यांचें कौतुक करून "तूं कवि होशील!" असा आशीर्वादही दिला. अर्थात् ह्या गोष्टीनें मनोवृत्तीस उत्तेजन मिळून त्यांच्या अंतर्यामीं कवित्वाचें बीजारोपण झालें.

३. पण पुढें शाळेंतील अभ्यासाचा धोशा मागें लागल्यानें हें बियाणें जागच्या जागींच मुरत राहिलें. त्यांचें इंग्रजी शिक्षण अनुक्रमें नासिक हायस्कूल, बडोदें हायस्कूल, व नंतर विश्राम बागेंतील पुणें हायस्कूल, ह्या संस्थांतून प्रवेश परीक्षे-पावेतों झालें. पुणें हायस्कुलांत गुरुवर्य विठ्ठल नारायण पाठक, एम्. ए. व हरि गणेश ऊर्फ हरिभाऊ गोडबोले, बी. ए. यांच्या अमदानींत शिकत असतां, ते सदाशिव पेठ, गाय आळीमध्यें बॅरिस्टर गाडगीळ यांच्या वाड्यांत रहात होते. हें जीवनवृत्त निरोपितांना कवींनीं, गाडगिळांच्या टेनिस ग्राउंडच्या कोंपऱ्यावरील ती त्यांची निरामय सुंदर कोठडी अजून डोळ्यांसमोर दिसते! असे उद्गार काढिले. शाळेला मे महिन्याची सुटी मिळाल्यावर ते दररोज सायंकालीं पर्वती, चतुःशृंगी, वगैरे रमणीय देखाव्यांच्या भागांतून सहलीसाठीं जात असत. वसंतकाल अस-ल्यानें कोकिलांचे सुस्वर पंचमालाप निघत होते. ते ऐकून त्यांच्या स्फूर्तीस जागृति आली. आणि सुटीमुळें रिकामपण होतेंच. त्याचा लाभ घेऊन त्यांनीं वर सांगितलेल्या कोठडींत "कोकिल" ही पहिली कविता लिहिली, व ती करमणूक-कर्त्यांकडे पाठवितांच कै. वा. हरिभाऊ यांनीं ता. १८ मे १८९५ च्या अंकांतून प्रसिद्ध केली. (पान १–२ पहा.) ही कविता पहातांच वर्गबंधूंतील कित्येक रसि-कांनीं कवि म्हणून त्यांचा बोलबाला केला. पण तो तात्पुरता. पुढें शिक्षण चालू होतेंच. परंतु कवि म्हणाले कीं, "गणित विषयांत माझ्यासारखा निव्वळ शंख मीच!" त्यामुळें परीक्षेंत दोन वेळां अपयश येऊन त्यांचें मन खट्टू झालें, व त्याबरोबर शिक्षणाचीही इतिश्री झाली!

४. नंतर धंदेशिक्षण मिळविण्याच्या उद्देशानें ते एक दोन वर्षें अमदाबाद येथें त्यांचे नासिक हायस्कुलांतील वर्गबंधु कै. वा. अनंत रामचंद्र कवडे, फोटो आर्टिस्ट

यांच्या समागमें राहिले. पण त्या कामीं सदोदित असणारी धांदल, जिवाची लावतोड, आणि काबाडकष्ट, ह्यांचें त्यांच्या मनोवृत्तीशीं जुळेना. शिवाय, दिवसें-दिवस कवितेच्या मोहपाशांत त्यांचें मन अधिकाधिक गुरफटूं लागलें. कवीच्या जीवनाला मनःसमाधीची पहिली अपेक्षा असते. त्याला स्वस्थ चित्तानें एके जागीं बैठक मारून मनाच्या मंजुवीणेचा स्वरसंगम लावावा लागतो. रत्नपारख्या-प्रमाणें निरनिराळ्या शब्दांतील पाणी, आणि विविध छटा यांचें बारकाईनें निरीक्षण करून आपल्या कल्पनाशीं त्यांचें सात्म्य साजेल किंबहुना त्यांच्या योगानें मूळची कल्पना खुलून उठेल, अशा ठिकाणीं निवडपूर्वक त्यांची योजना करावयाची असते. तेव्हां कवीचा जीवनक्रम, आणि गिरणींतील यंत्रांच्या खडखडाटांत व्यग्रतेनें राबत रहाणाऱ्या विणकामगाराचा जीवनक्रम, यांचा मेळ कसा बसावा? मानवी "देहाची नश्वरता" ( पान ४–५ ) पटून आणि "कवीच्या आशा" ( पान २-३ ) ह्या वेंच्यांत सांगितलेलें ध्येय पुढें ठेवून, कवि चंद्रशेखर यांस आपला जीवनक्रम आंखावयाचा होता. तेव्हां अर्थातच धंदेवाईक बनून पुष्कळसा पैसा कमावण्याचा नाद त्यांना सोडावा लागला.

५. ते निमूटपणें अमदाबादेहून निघून बडोद्याला परत आले, व त्यांचे बंधु कै. वा. नारायणराव, जे येथेंच फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेट होते, त्यांजपाशीं राहिले. ईश्वरी कृपेनें तिन्ही भाषा बऱ्याशा येत असून अक्षरही चांगलें असल्यामुळें त्यावेळीं चंद्रशेखर यांस कारकुनी पेशाची सरकारी नौकरी मिळण्यास उशीर लागला नाहीं. त्यांनीं प्रथम दिवाण कचेरींत एक वर्ष हंगामी कारकुनाचें काम केलें, व नंतर लागलीच ह्या राज्यांतील चीफ मेडिकल ऑफिसर यांनीं त्यांस चाहून आपल्या कचेरींत बोलावून घेतलें, व टिप्पण म्हणजे Memorandum क्लार्कच्या जागीं त्यांची कायमची नेमणूक केली.

६. ह्याच वेळेच्या सुमारास आधुनिक मराठी कवि ह्या नात्यानें त्यांच्या जीवन-चरित्रांत एक संस्मरणीय गोष्ट घडून आली. ती म्हणजे रसिक कविवर्य दत्तात्रय कोंडो घाटे, बी. ए. यांचा परिचय. आतां, ह्या परिचयानें ह्या उभय कवींचा जो सुखसमागम झाला, तो जरी उणापुरा एक वर्ष, म्हणजे फारच थोडा वेळ टिकला, तरी त्या आऊट घटिकेच्या राज्यांत त्या उभयतांनीं पुष्कळ उपभोग भोगिले, व सुधेसारख्या स्वादिष्ट कवितेच्या मेजवान्या झोडण्यांत—

"अविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत्!"

अशा रात्री मागून रात्री आनंदांत घालविल्या. ही हकीकत " दत्तांची कविता " ह्या ग्रंथारंभीं कवि चंद्रशेखर यांनीं जें " हृद्गत" लिहिलें आहे, त्यांत विस्तारानें वर्णिली आहेच. म्हणून येथें विस्तारभयास्तव आम्हीं तिची पुनरुक्ति करीत नाहीं.

७. आज जवळ जवळ ३४ वर्षें होत आलीं, हे कवि श्रीमंत बडोदें सरकार यांच्या सेवेंत असून आतां ता. ( २९–११–१९३२ ) रोजीं, म्हणजे त्यांच्या वयाच्या ६२ वे वर्षी, ते नौकरींतून मुक्त होत आहेत.

८. सारांश, वर सांगितलेली कारकुनी पेशाची नौकरी त्यांच्या काव्यरचनेच्या व्यवसायाला माफक झाली. ते सरकारी कामकाज संभाळून रात्रंदिवस फुरसतीचा मुबलक वेळ काव्यविषयाकडे लावीत राहिले, व तो विषय त्यांच्या अत्यंत आवडीचा असल्यामुळें त्यासाठीं होत असलेलीं जागरणें व मानसिक श्रम हलके वाटून अंगवळणी पडले. आणि ह्याप्रमाणें पहिली कविता " कोकिल " ही प्रसिद्ध झाल्या तारखेपासून ( ता. १८-५-१८९५ ) आजतागाईत, म्हणजे उघड उघड तीन तपें पावेतों प्रस्तुत कवींनीं कवितारतींत सांगितलेला स्वार्थत्याग करून ( पान ११५–२० ) एकनिष्ठपणें सरस्वतीची जी सतत सेवा केली, तिचें हा काव्यसंग्रह हें साक्षात् फल होय, व हेंच त्यांच्या जीवनचरित्राचें सार आहे.

९. सामान्य जनदृष्टीला जो वेडा मनुष्य जन्मभर एकलकोंड्या वृत्तीनें शब्दब्रह्माशीं खेळत राहिला; त्याचें हें जीवनचरित्र, विद्यापीठांतील पदव्या व पदकें, समुद्रपर्यटनें, विदेशीय शिक्षणसंस्थांचीं प्रमाणपत्रें व गौरव, अधिकाराची थोरवी, सत्तेचें प्राबल्य, धनकनकांचे प्रवाह, लक्ष्मीचा झगझगाट, आणि सुरेंद्राचे भोग व ऐषआराम, इत्यादि ऐहिक वैभवास लोलुप असणाऱ्या सांप्रतच्या जनसमाजास आवडणार नाहीं हें उघड आहे. तरी पण, तीन तपें मधुकरवृत्तीनें गुंगत राहून त्यानें जो हा काव्यमधु संग्रहीत केला, तो " अतिथि देवो भव " ही वेदाज्ञा स्मरून, व " मधुपर्को मधुपर्को मधुपर्कः " हें वचन उच्चारून, आम्हीं अभ्यागतांस सादर केला आहे. तरी सहृदय वाचकांनीं " असार जीवित केवळ माया " अशा ह्या सांसारिक चरित्राच्या व्यामोहांत न पडतां, त्या मधुपर्काचा स्वीकार करून त्यांतील स्वारस्याविषयीं आपआपला प्रांजल अभिप्राय ठरवावा, एवढीच त्यांस आमची प्रार्थना आहे.

मुंबई, ता. २५ जानेवारी १९३२. } प्रकाशक

# अनुक्रमणिका.



अनुक्रमणिका

# शुद्धिपत्र.

—:*:—

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ९ | २४ | खविज्ञ-विचारणा. | खविज्ञ-विचारणों |
| १० | ५ | तुडुब | तुडुंब |
| १४ | १२ | खति | खंति |
| १८ | टीप | प्रस्तावववचें | प्रस्तावनेचें |
| २९ | ९ | विसरोनी | विसरोनि |
| ३० | १८ | रागजेल | रागेजलें |
| ९७ | ८ | सांयमानें | संयमानें |
| १०४ | ४ | सुधावाचा ? | सुधावाचा. |
| १०४ | १० | वचनाबदू | वचनबिंदू |
| १०५ | १८ | वससी | बैससी |
| १०७ | १ | गांधर्वा | गंधर्वा |
| ११० | ८ | तारकांही | तारकांहीं |
| १३१ | २२ | सतीर्थ | सुतीर्थ |
| १३३ | १० | विराजितें ! | विराजतें ! |
| १४६ | अंत्य | रणमीय | रमणीय |
| १५६ | १४ | मोहिनी | मोह्नी |
| १५६ | २४ | गुलगुलां | गुळ्गुलां |
| १७३ | १७ | करिती | करितो |
| १८४ | २ | गिरिकंदा, | गिरिकंदर, |
| १८५ | १२ | लहानूं | लहानू |
| २१५ | १२ | स्वमाव | स्वभाव |
| २१६ | २४ | भृगांभ भृषा | मृगांभ मृषा |
| २२२ | १२ | आळसात | आळसातें |
| २२७ | ६ | अपुल | अपुलें |

## शुद्धिपत्र

| पान. | ओळ. | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| २४४ | १८ | लाटागण | लोटांगण |
| २४६ | ५ | चकचकले, | चकचकले |
| २५० | ५ | करिति | करिन |
| २५६ | २ | घोडे | घोडे' |
| २६१ | १ | आचायकृत | आचार्यकृत |
| २६६ | १ | वसल | वसलें |
| ,, | १४ | तस | तसें |
| २८१ | २१ | भगूर | भंगुर |
| २९४ | १७ | त, | तें, |

# चंद्रिका



## कोकिल.



द्रुतविलंबित.

अहह ! शब्द किती तरि गोड हा !
श्रवणिं कोठुनि येत असे ? पहा !
समजलों. घन आम्रतरूवरी
पिकमुखें स्रवते पयमाधुरी ! १

कितितरी दिसतात विहंगम;
परि जगीं न असा हृदयंगम.
दिसतसे शिखि सुंदर कां न तो ?
श्रुतिकठोर रवा परि केंकतो. २

बघुनि जो नर रूपमनोहरां
भुलतसे, मतिमंदचि तो खरा.
करिति संत पसंत विलोकुनी
गुणचि, पाहति रूप न रोंखुनी. ३

मधुर हा बहु कोकिल बोलका,
लव तरी दिसतो रमणीय का ?
परि कसा हृदयंगम जाहला
निजरवें ? विहगोत्तम शोभला ! ४

अहह ! गोड रवें तुझिया कसें
सकलही वन हें भरलें असे !
श्रुतिमनोहर गाउनि गान गा !
मधुर आम्र असा म्हणसी खगा ? ५

ऋतु वसंत पसंत किं हा असे
म्हणुनि सांगसि वानुनि फारसें ?
अमृत हें अथवा अवनीवरी
अमर या अखिलां रसिकां करी ? ६

समजलों. कटु शब्द वदोनियां
हृदय टाकिति भेदुनि जे, तयां
मधुर बोलुनि हें जग आपलें
शिकविसी करूं, सार दिसे भलें. ७

बघुनि रूप नकोस फसूं मते !
सकल जें चमके नच हेम तें.
अढळतो गुण थोर कधीं कधीं
नर कुरूप पिकांसम त्यांमधीं. ८

प्रकाशन.—करमणूक,
ता. १८ मे १८९५.

---

## कवीच्या आशा.



जरि हा उदासवाणा गेलों मी मृत्युलोक सोडून
लोकीं प्रौढ अशी मम वाणी-आत्मा वदेल मागून. १

परिसुनि वीरश्रीची माझी वाणी स्वदेशहितकारी
म्यानांतुनि आवेशें आपुलिया ओढितील तरवारी. २

अथवा सभेंत माझ्या गर्जुनि कविता अनेक राजांस
सुखनिद्रेच्या बहरीं दचकाया लावितील ते खास. ३
द्याया प्रमाण सज्जन, नीतीचे विषय जेथ येतील,
न्यायप्रचुर अशीं मम नामी वचनेंच तेथ घेतील. ४
कविता बघतां त्यांचें सुभाषितांनीं उचंबळेल मन,
स्वर्गाहुनि मग त्यांनां उत्तेजन द्यावयास उतरेन. ५
कांहीं मंगल गीतें गोड अशीं लिहुनि ठेविलीं असती,
कीं तीं माझ्या मागें गातिल लग्नादिकांत नवयुवती; ६
पुष्पें गुलाब, चंपक, मोतीया, मोगरा, वसंतांत
रंगेल लोक आणुनि उत्सव करितील थोर गांवांत; ७
खेळून खेळ नाना गात्रें दमतील जेधवां त्यांचीं,
तेव्हां विश्रम घेउनि गातिल पद्यें मदीय गमतीचीं. ८
प्रियजनवियुक्त असती, ते तद्विषयीं बघोन मम कविता,
जल ढाळितील ढळढळ, नयनांतुनि दयित निजहि आठवतां; ९
रडुनि रडुनि जें कोणी थकेल बहु तान्हुलें तया जननी
लावील गाढ निद्रा, मंजुल गीतें मदीय रंजवुनी. १०
हे सुंदर भूलोका ! आतां घेतों निरोप शेवटचा,
विस्तार भव्य हा तव, अदृश्य मज होत चालला साचा. ११
बैसुनि दिव्य विमानीं झडकरि मी केविं चाललों नाकीं
सुदूर, संकोचित ह्या तव मर्यादा त्यजून, अवलोकीं. १२
जातां वातावरणामधुनि मला होतसे महानंद,
कीं, माझ्या कवितांचा सकलां लागेल सारखा छंद. १३
मंजुल आणि मधुर ज्या, त्यांनीं मनिं रंजतील तव तनया,
प्रधान वीररसें, त्या पौरुष देतील तूझिया तनयां.— १४

प्रकाशन.—करमणूक,
ता. २७ जुलै १८९५.

---

# देहाची नश्वरता.



मधुर बोलत बालक बोबडें
फिरतसे सदनांत चहूंकडे;
मृदु पदीं रव मंजुळ नूपुरें
करिति, नाद तदीय गृहीं भरे. १
विलसतां शिशु यापरि पाहुनी,
जननि जों सुख घे निज लोचनीं,
तंव हरी शिशु काळ; हरी हरी !
हृदय कोमल माउलिचें चिरी ! २
कसरतीस करोनि कमावलें,
घृत पयादिक सेवुनि पोषिलें,
वपु बलिष्ठ रणांगणिच्या श्रमा
बनविलें क्षम थोर पराक्रमा. ३
अरिशिरें मग ताडफळांपरी
पसरुनी रणिं कीर्तिवधू वरी.
परतला नरकेसरि घेउनी
विपुल खंडणि, देशहि जिंकुनी. ४
परिसुनी रिपु नामहि कांपती,
'भट भयंकर हो !' वच बोलती;
चमक एकसरें तंव कुक्षिला
निघुनि, वीर अचेतन लक्षिला ! ५
सकळशास्त्रविशारद जाहला,
नृपतिला विनयें बहु मानला;
सहज थोर पदाप्रति पावला,
बहु धना मिळवूं मग लागला. ६
स्वकुल उन्नतिला जंव आणितो,
बरिव देशहितें निज जाणितो,

अहह ! दंडधरें तंव ओढिला,
मिळविला धुळिला जन तो भला ! ७

युवति, रूपवती, गृहिणी, सती,
रति जिला वदती जन हीच ती;
प्रिय पतीस, अति प्रिय तो हिला,
भव म्हणोनि सुखावह वाटला. ८

उभय वागति संगतिनें घरीं,
प्रणयवर्धन होत परस्परीं;
तंव अशी भवदक्ष कुलांगना
निजलि ती निजलीच ! उठेच ना ! ९

दयिताविरहानलताप हा
सहन कोण करील बरें ? पहा,
यतिमानसरंजन रामही
करपला, रडला, फिरला मही ! १०

प्रियसखी दिसली मृत ते धवा;
सकल संग झुगारुनि तेधवां,
गहन निर्जन कानन शोधिलें,
प्रभुचिया भजनीं मन शोधिलें. ११

बुडबुडा उदकावरचा जसा
क्षणिक, देह खरोखर हा तसा.
म्हणुनि तो हरिसेवनिं लावुनी,
सुजन बैसति मुक्तचि होउनी. १२

प्रकाशन—करमणूक,
ता. २८ सप्टेंबर १८९५.

---

# इतिहास.

—×—

(१)

बा इतिहासा ! तुजला शेवटचा हा असो नमस्कार !
वाचन तुझें इतःपर नको;—मना शीण जाहला फार. १
नाना अपराध्यांच्या पारायण तें नको चरित्रांचें;
त्याहूनि आवडे बहु दास्य मला गा त्वदीय भगिनीचें. २
हे सौम्य देवि कविते ! ने, ने तव शांत मंदिरा मजला;
अपवित्र चित्रपट हा राजकुलांचा नको पहायाला ! ३
घोर रणांचीं वृत्तें, कारागृह-साध्वसें, न ऐकाया
येतील जेथ मजला ने क्षणि ऐशा प्रशांत तव ठाया. ४
वृत्ति स्वाभाविक मम आनंदोत्फुल्ल तेथ होतील;
कारण, दुर्जनकृत्यें ऐकुनि का सन्मनें न शिणतील ? ५

(२)

हा हा !—वदलों ऐसें सहसा ये वृद्ध तों महाभाग,
इतिहास मूर्तिमंतचि ! आला ह्या भाषणें जया राग. ६
राहे माझ्या पुढतीं उभा, प्रभा दिव्य भोंवतीं फांके,
यद्यपि गभीर दिसली सरोष मुद्रा म्हणोनि मी धाके ! ७
त्याची पिंगट दाढी नाभीवरि रुळतसे सदा त्यातें,
पांडुजटा—घुमटानें भूतकथाभुवन झांकिलें होतें. ८
तन्नयन दूरदर्शी खदिरांगारासमान त्या कालीं
होउनि, मज वाटे कीं एकसरें मेघगर्जना झाली. ९

(३)

रे मूढ तरुण पुरुषा ! जा, जा !—येथूनि चालता हो जा !
सोडित उष्ण श्वासां बैसुनि राहे सदा लताकुंजां ! १०
कामी तरुण जनांच्या विविध मनोवृत्ति मूर्तिमंत, तशा
चेष्टा, अनंगलेखहि वर्णी कविता करोनि गोड अशा. ११

ज्या वाचुनि विरहार्त्ता रामा कामातुरा सुखें रडती,
नरसिंह रणधुरंधर जन तेही स्त्रैण–बायले घडती ! १२

(४)

धिःकार असो मूर्खा ! रे ह्यासाठींच काय मी केलें
तव नव मन सावध जें अज्ञानतमामधीं असे निजलें ? १३
कौरव-पांडव-विक्रम वर्णुनि रक्तासवेंचि वीररस
अंगीं खेळविला तव तो का व्हाया पुढें असा विरस ? १४
गाजी शिवाजि, बाजी, रणपटु.रघुनाथ ' भीमकर्मा ' जो,
त्यांचे महत्पराक्रम निज हृत्पटिं बघुनि मन तुझें लाजो ! १५
ते हृदयावरि कोरुनि बाहु तुझे स्फुरविले सदा ज्यानें,
त्याच्या उपकाराची केलिस का फेड ह्याच वचनानें ? १६
पानिपतावरि भाऊ न्हाऊनी म्लेंछ शोणितें निजला,
विश्वासघात होतां त्यानें भाऊपणा जणों त्यजिला ! १७
हें वृत्त ऐकवोनी कोमल तव नयन साश्रु आरक्त
मी करविले, न जाणुनि मूढा होशिल असा विषयरक्त ! १८
ह्याकरितां तुज कथितों, कृतघ्न होउनि मला न फसवावें,
परि निज कृतिनें माझे सारे तूं हेतु सिद्धिला न्यावे. १९
समरीं असंख्य पडले हळहळ ऐकोनि वाटते फार,
परि देशहिताकरितां मरणें वीरास हाच बडिवार ! २०
औरंगजेब, दुसरा बाजी, कृत्या तशीच आनंदी,
निंदुनि, शिवाजि, पहिले बाजि, अहल्यादि सुजन कां वंदी ? २१
दुर्जन, निंदास्पद जरि, करिति महत्कार्य ते स्वदुश्चरितीं;
वाईटाहुनि बरवें, हीनाहुनि चांगलें उघड करिती ! २२
लोकांच्या दुष्कृतिचा दैन्याचा करिसि जेविं कंटाळा,
तैसा स्वातंत्र्याचा प्रेमा निःसीम बाळगीं, बाळा ! २३
तो मज पासोनि तुला मिळवाया श्रम किती बरें पडले ?
त्याचें स्मरण धरोनी कांहीं तरि चीज पाहिजे घडलें ! २४

म्हणुन क्षीण रसाचा वाहे ज्यामाजि पूर त्या कविता,
संगीत नाटकेंही जळोत कादंबऱ्या, मुला, आतां ! २५

रे ! तरुण देशबांधव झाले ना शक्तिहीन तव सारे
वाचूनि पुस्तकें हीं ? तूंही धरितोस मार्ग तो कां रे ? २६

जरि आर्य-माय गाय स्वतंत्र खाटिक-करांतुनी करणें
तुजला असेल, तरि मग इतिहासाचेच पाय बा धरणें. २७

'कवि' पद मिळवायाची तृष्णा तुजला असेल अनिवार,
तरि ती पूर्ण कराया देतों मम सर्वसंग्रहागार ! २८

घे, हीं पूर्वजचरितें वीररसानें उचंबळों आलीं;
ह्यांच्या सुकाव्यमाला स्वदेशहितचिंतकांस तूं घालीं ! २९

प्रहरण-हरणानें तव गेला लोकांतरास विक्रम रे !
आतां जोम तरी बा दवडुं नको जो तनूंत शेष उरे ! ३०

( ५ )

ऐसें वदोनि झाला सहसा तेथेंच गुप्त इतिहास.
हितवाद अनुसराया पात्र असे हा मदीय बंधूंस. ३१

प्रकाशन—करमणूक,
ता. २५ एप्रिल १८९६.

---

## शरच्चंद्र आणि चंद्रिका.



अहह ! शारद पूर्ण सुधांशु हा
किति तरी रमणीय दिसे पहा !
अमृतपूर्ण तशा अति उज्वला
असति आज खऱ्या सकला कला ! १

नभ निरभ्रहि निर्मल नीलसें
रसिकलोचन लोभवितें कसें !

ग्रह अनेक, असंख्यचि तारका,
कुणि सयंत्र[1] खविज्ञें[2] गणील का ? २
द्युति पहा कशि निश्चल ह्या ग्रहीं[3];
चमकते परि ते उडु[4] संग्रहीं;
अणु अगण्य जणूं भगोणें[5] अशीं
मिळुनि एक नदीच[6] दिसे जशी. ३
पतन कौतुक तें किति केतुंचें[7]
मधुनि वेधित लोचन आमुचे !
भगण फारचि सूक्ष्म असे किती
जणु खबाष्पसमूह[8] विराजती ! ४
अहह ! विस्तृति काय अनंत हे !
किति असंख्य महाद्युतिदीप हे !
निज पथांत यथाविधि चालती,
समयनिष्ठ कशा तरि तद्गती ! ५
चिमुकल्या टिकल्या महदंतरीं[9]
झळकती जणु वाटत अंतरीं[10].
परि अहो ! उडुतेज, विशालता,
उभय होत अचिंत्यचि तत्वतां. ६
गणक ते गणितां गति भागती,
बुध रसज्ञ[11] पृथग्रस नेणती;
करित तार्किक[12] तर्कचि गर्क हो,
कवि तरी किति काव्य करील हो ! ७
सकल विश्व–नियंत्रणकारणा[13] !
असु कशीहि खविज्ञ-विचारणा[14],

१. दुर्बीण हातांत घेतलेला. २. ज्योतिःशास्त्रवेत्ता. ३. Planets. ४. Stars. ५. नक्षत्रें. ६. आकाशगंगा. ७. नक्षत्रपाताची मौज. ८. धुकें–Clusters and Nebulæ. ९. फार दूर. १०. मनांत. ११. रसायनशास्त्रवेत्ते. १२. तर्कशास्त्री. १३. विश्वनियामका परमेश्वरा ! १४. शास्त्रीय शोध.

परि अगाध अगा प्रभु ! हे कृती
तव बचोनिच मन्मति गुंगती ! ८

किति बरें स्पृहणीय शशांक हा !
नयन हो, निरखोनि पहा पहा !
जणु तडाग तुडुंब सुधारसें,
रजनिचा जणु दर्पण कीं असे ९

सुरनदीमधिं खेळुनि विश्रमा–
स्तव करी स्फटिकासन हें रमा ?
मदन दिग्विजयी जणु काय ये
करुनि छत्र निजैकचि हें स्वयें ? १०

रति निजे निज ठेवुनि हार कीं
जपुनि ह्या जणु रत्नकरंडकीं ?
सुजन कीं परमागति पावले
शुचि सुवृत्त तदीय विराजलें ? ११

भरत भूसुत जे रणकेसरी
तिखटशा असि ह्या वसुधेवरी
चमकवोनि विमोचन लाभले,
जणुकिं तद्गत वैभव गोठलें. १२

अहो चंद्रिकेच्या मिषानें पहा हे
मही शुभ्र शालूच कीं नेसताहे.
स्मरोनी जणो नष्ट आर्यप्रभाव,
करी व्यक्त वेषें मनोभंग-भाव ! १३

हरायास कीं ताप तीच्या मनाचा
करी चंद्र वर्षाव हा चंदनाचा;
जणो लागलीं दाट कीं श्वेत अब्जें
प्रफुल्लें जयांनीं धरा ही विराजे. १४

---

१. तरवारी. २. मोक्ष.

कलिंदात्मजेच्या भ्रमें ही क्षितीतें
मिळायास मंदाकिनी काय येते ?
असे शुभ्र पाषाण भूमीच वा हे ?
तिला शुभ्र पाराच कीं लाविला हे ? १५
दिशा सर्वही न्हाणिल्या कीं दुधानें ?
मुलामा दिला त्यांस किंवा रुप्यानें ?
सुधेचे मुखीं नाथ गंडूष टाकी
म्हणोनी वनश्री हंसे लाजुनी कीं ? १६
दिसे वस्तुमात्र प्रसन्न प्रसादें,
गमे शांति देवीच सर्वत्र नांदे;
क्षिति, व्योम, शीतांशु, नक्षत्र तारे,
शरच्चंद्रिकावैभवीं लीन सारें. १७

प्रकाशन—करमणूक,
वर्ष ६. अंक २४. ऑक्टोबर, १८९६.

---

## सौंदर्याविषयीं.



( १ )

गा भुवनसुंदरा ! तव अगाध अनुपम अशा प्रसादानें
नाना सहज गुणांचीं अमोल मनुजांस लाभलीं दानें. १
परि त्या सर्वांमाजीं उत्तम सौंदर्य मानसा भासे;
कीं प्रथम दर्शनीं तें निजठायीं लोभवी तया खासें. २
महिमा अन्य गुणांचा यद्यपि बहु थोर, लोचनां न दिसे.
भस्मांत झांकलेल्या अग्नीचें तेज जेविं ना विलसे. ३
अंतर्गतें गुणें जरि लोहासहि दे सुवर्णता परिस,
तरि सकल मार्मिकांसहि नामी दिसतें सुवर्ण त्यापरिस. ४

---

१ यमुना. २ गुळण्या. ३ स्वच्छतेनें.

ह्या न्यायानें गुणिजन असतां सौंदर्यहीन नावडती;
अन्य गुणांहिं उणे तरि लोकप्रिय जन सुरूप ते घडती ! ५
" होतात आदरास्पद आकृति ज्यांची विशेष अभिरामा. "
हें कविवरोक्ति मौक्तिक परीक्षणानें खरें गमे आम्हां. ६

( २ )

लाजवि तप्त सुवर्णा वर्णहि, पूर्णेंदुला यदानन तें,
तेविं जिचें नेत्रद्वय विकसित नीलारविंद मद हरितें; ७
दाडिंबबीजराजी मानुनि रदनांस मदन शुक–चंचू
नासामिषें जिच्या ही भासे सरसावि आपुली चंचू. ८
किंवा अधर जियेचा, नोहे परि पक्व तोंडलेंच खरें
समजोनि, जवळ केली चंचू भेदावयास त्या कीरें. ९
किंवा जग जिंकाया कायाहीन स्मरें सुवर्णशर
भ्रूधनुषास जियेच्या ओढुनि आकर्ण लाविला प्रखर. १०
निर्मल निटिल जियेचा शोभतसे अष्टमीनिशाकरसा,
वेणी कृष्णभुजंगम वाटे घालूनि बैसला वळसा. ११
अलकमिषानें जीच्या भ्रमर भ्रमती भ्रमें गमें गालीं;
येथें गुलाब-पुष्पें मानुनि नामी प्रफुल्ल हीं झालीं. १२
मनोभिरामा रामा सर्वांगीं सुंदरी परीपरि जे,
वसनालंकृतिमंडित पाहुनि ऐशी न कोण पुरुष रिझे ? १३
किंवा मदनचि साक्षात्, ऐसें नररत्न पाहुनी जगतीं,
भुलती न काय युवती, सुविरल मंदोदरीसमान सती ? १४

( ३ )

सौंदर्यदेवते ! मज दिससी वाचेसही अगोचर तूं !
मग वर्णनीं शिणावें व्यर्थ तुझ्या, ह्यांत काय तो हेतू ? १५
ज्या ज्या धन्य जनांवरि तव सौभाग्यप्रसाद गे घडतो,
त्या त्या मानवरत्नीं चक्षूंचा वृंद कौतुकें जडतो. १६

पूर्णेंदुवदन पाहुनि येते आनंदसिंधुला भरती,
मग लघुजनमननौका कामसमीरें तयामधीं फिरती. १७
जणु मोह लोहचुंबक आकर्षितसे तयांस बुडवाया;
वायां अभिलाषें जन लागति काया स्वकीय झिजवाया. १८
परि रम्य रूप बघतां स्मरमोहें मूढ होउनी धरणें
अभिलाष सुंदरांचा, नव्हे नव्हे हें खरें प्रणय करणें. १९
अभिलाष प्रीति नसे, जन अभिलाषी नसे खरा प्रणयी.
कारण, सौंदर्यातें पाहुनि अभिलाष उद्भवे हृदयीं. २०
परि सौंदर्य खरोखर बाह्य उपाधि प्रसिद्ध हें आहे.
प्रीती बाह्य गुणांवरि अवलंबुनियां कधीं न ही राहे. २१
चिरकाल वास करितो अंभोजामाजिं मधुप तो काय
त्याचा विकास जाणुनि ? किंवा पाहोनि कांति रमणीय ? २२

(४)

रे रे सौंदर्यगुणा ! पुरे तुझा मोह आणि अभिलाष !
वरपंगींच बरें जें, त्याचा माझा असे महाद्वेष ! २३
चांगुलपणा असे तव यौवनसहचर, विनाशवंत तसा,
जनचित्तशांतिरूपी वटीं कुठार प्रहार संततसा ! २४
बा तव योगें उपजे पतिपत्नीमाजिंही अविश्वास;
कारण, तूंच तयांना लाविशि कुपथीं प्रवर्तवायास ! २५
लोकांमध्यें मत्सर, तैसा द्वेष, प्रकोप चित्ताचा
माजे अनेक वेळीं कलह तसाही तुझ्यामुळें साचा ! २६
द्वंद्वें, रक्तस्रावहि तव योगें प्राणघातही घडती !
संसारभंग याची काय असे मग कथा तयापुढतीं ? २७

(५)

नच सामान्य जनांवरि बा सौंदर्या ! प्रताप तव गाजे;
झुंझार झुंझती कधिं, कधीं तुझ्यास्तव बलिष्टसे राजे ! २८
व्यर्थ किमर्थ वदावें बहु, तुजसाठीं महारणें झालीं;
अगणित बळी पडोनी देशांचीं निर्जनें वनें बनलीं ! २९

होउनि राज्यक्रान्त्या, रुसोनि गेली स्वतंत्रता देवी !
ठेवील चाड मग कां ? प्रजेस परनृप पदोपदीं रडवी ! ३०
ऐसे न एक, दोनहि, परंपरा परि महा अनर्थांची
ओढवली तुजसाठीं, तरि जन सारा प्रसाद तव याची ! ३१
तस्मादगाध महिमा, बा सौंदर्या ! तुझा मला वाटे;
अभिरुचि विचित्र पाहुनि लोकांची चित्त विस्मयें दाटे ! ३२

प्रकाशन–करमणूक,
वर्ष ७. अंक २१. नोव्हेंबर, १८९६.

---

## दुर्व्यसनी गृहस्थाची गृहिणी.



दृष्टिआड तो चंद्र होतसे;
येतिना तरी हे घरीं कसे ?
छंद जो कधीं स्वप्निंही नसे,
काय हो तयें लाविलें पिसें ! १
अश्रु गाळितां रात्र लोटिते
त्यांस कासया खंति वाटते ?
सोडुनी दिली लाज अल्प ती
झिंगुनी जनीं व्यर्थ जल्पती. २
आलिया अतां दोंघडीभरें
ताडितील ते दुष्ट वाक्शरें.
यापरी नवे प्रत्यही वरे
होउनी उरा शोक नावरे. ३
असुखसागरीं लोटुनी मला,
उठवितील ते बाळ तान्हुला;
जवळ घेउनी कोडकौतुकें
रमविणें मुला घेउनी मुके ४

नवल मानणें त्याचिया गुणां,
बघुनि हें न तों ठाउकें कुणा.
करुनि गर्जना, झोंप मोडुनी,
खिजवितील ते त्यास येउनी. ५

छबुकडें रडे दीनसें तरी
मज गमे उरीं बोंचते सुरी.
अगइ ! हें पहा केविं झोंपलें;
नयन गोजिरे केविं झांकले. ६

मधुनि मंदसें ये तया हंसें,
सुखवि तें मला फार-फारसें.
जाळिती जरी मज विवंचना,
हर्ष होतसे तरि किती मना ! ७

पाहतांचि हा सगुण सोनुला
होय दृष्टही खचित त्याजला.
प्रथम नाथ जे माझियाविणें
समजती फुका आपुलें जिणें,

अदय होउनी तेच आजला
छळिति कां उगा कोपुनी मला ?
वद दयानिधे ! दीन किंकरी
विसरली करूं काय चाकरी ? ९

पति जिच्यामुळें पावती मती
शिणविण्यास ही बापुडी सती.
भ्रुकुटि घालुनी खीस पाहती
परगृहीं अहो–रात्र राहती. १०

त्यजुनियां सुधाशुद्ध माधुरी
धरिति वासना का विषावरी !
परि असो; जरी फंद यापरी
करिति नित्यही ते परोपरी, ११

तरिहि अंतरीं द्वेष ठेवुनी
नच वदेन मी त्यांस लावुनी.
सुखद काल तो आठवे मला
प्रणय आमुचा ज्यांत जागला. १२

किति परस्परां प्रेमदृष्टिनें
बघुनि शांतवूं मोदवृष्टिनें !
तिळहि ते मला तेविं मी तयां
नच विसंबलें आण घ्यावया. १३

भवहि तेधवां गमतसे मला
कुसुमवाटिका रम्य निर्मला.
सकळ आज तें स्वप्न जाहलें;
स्मरण त्याचियें शेष राहिलें. १४

माझिया प्रिया ! अझुनि शुद्धिला
येउनी धरा प्रणयबुद्धिला;
मारुनी अतां सविष सायकां
विव्हला मला करूं नका नका. १५

सानुराग तें स्मित मुखावरी
मी बघावया बहुत हांवरी.
कीं उरव्रणां मम उपाय तें
होय तूमचें स्मितचि आयतें. १६

किति जरी तुम्ही हीस गांजिलें,
तरि न ही त्यजी ब्रीद आपुलें;
बसुनि शांतिच्या सौख्यदा पदा,
करिल जाच ही सह्य सर्वदा. १७

हे सख्या ! परी सरलिया धनें,
नष्ट झालिया व्यसन-साधनें,
यौवनावना गदद्वानलें
जाळितां, कुणां म्हणसि 'आपलें'? १८

व्याधि आधि ते मग हरावया,
औषधें सदा तुज करावया,
अश्रुपूर ते तव पुसावया,
कोण ये बरें मृदु वदावया ? १९
आज ज्या तुला भुरळ पाडुनी
संपदा तुझी लुटिति झाडुनी,
ये तयांतुनी चढुनि पायरी
शोध घ्यावया कवण ती तरी ? २०
तेधवां, सदा बोलसी जिला,
मारिसी जिला, वारिसी जिला,
त्या पतिव्रतेवांचुनी कुणी
गा ! नये, नये साश्रुलोचनीं. २१

प्रकाशन—करमणूक,
वर्ष ७, अंक १६,
ऑक्टोबर १८९७.

---

## सवतमत्सर.



नेसोनी लाल शालू किति तरि नटली पश्चिमा ही अहाहा !
वाटे आला म्हणोनी प्रियकर सदनीं मोद दावी महा हा.
नानारंगी घनांचा उघडुनि बुरखा हास्यवक्त्रें हराया
आयासातें तयाच्या मृदु पवन पहा घालिते भास्करा या. १
सेवायातें सपत्नी स्वविरह-विपिनीं नाथ ह्या कामिनीला
गेला टाकोनि पूर्वा समजुनि मनिं हें खिन्न हो यामिनीला;
रागानें झोंकुनी दे नग मग सगळे चांदणी चंद्रकोर;
लेवोनी वस्त्र काळें अहह ! विरहिणी जाहली दीन फार. २

प्रकाशन—मनोरंजन,
१८९७.

# धनगर आणि तत्त्ववेत्ता.*



(१)

कोणी वयस्क धनगर दूर वनीं झोपडींत राहतसे.
धनलोभाचा वारा जन्मांतहि ठाउका जयास नसे. १
वार्धक्यानें त्याचे केंस पिकुनि शुभ्र जाहले होते.
बहु अनुभवें जगाच्या ‘ ऋषि ’ पदवीलाचि आणिलें त्यातें ! २
ग्रीष्माच्या रवितापा सोसुनि, शीतास कडक शिशिराच्या,
मेंढ्या चारुनि आणुनि कोंडी त्यांना स्थलीं निवाऱ्याच्या. ३
जाई काळ तयाचा आनंदानें अशा श्रमामाजीं,
न कळे मत्सर त्यातें थोर पदाचीहि दुष्ट वांछा जी. ४
तो प्रामाणिक सुज्ञहि, ऐसी कीर्ती सभोंवती झाली;
तेव्हां एक मजेची गोष्ट स्मरणीय ही घडुनि आली. ५

(२)

विद्यालयीं शिकुनियां सद्वर्तन-नियम बांधिले ज्यानें,
तत्त्वज्ञ थोर ऐसा करिता हो श्रवण कीर्ति ही कानें. ६
मग तो शोधित गेला उटज तया वृद्ध मेंढपाळाचें,
त्यातें प्रश्न करोनी काढितसे सार तद्विचारांचें. ७

(३)

“ आलें ज्ञान कसें तुज ? काय तुवां जागुनी निशासमयीं
केलीस तैलशून्या शतशें ग्रंथावलोकनीं समई ? ८
उन्नत राष्ट्रांचे कीं वाचियले त्वां अनेक इतिहास ?
किंवा तत्त्वज्ञांचे तत्त्वार्थसमुद्र लंघिले खास ? ९
कीं सद्वक्ते बोलति ऐकुनि तें, त्वां बसोनि दिनरजनी
सत्यासत्य तयाचें निश्चित केलें विचार बहु करुनी ? १०

---

* हें काव्य आंग्ल कवि गे–Gay–ह्याच्या काव्यसंग्रहास असलेल्या प्रस्तावनेचें रूपांतर आहे.

निज चातुर्याचे वा सदसत्परिणाम काय भोगविले
अविदित राष्ट्रांसी त्वां ? भोगविले सांग ते जरी असले. ११
कीं बहु नगरें हिंडुनि तज्जनरीती तशीच नयशैली
निरखुनि परस्परांशीं तुलना ग्राह्यार्थ सांग तूं केली ?" १२

( ४ )

परिसुनि सविनय बोले उत्तर जें मेंढपाळ ऐका तें:—
"ज्ञानार्जन करण्याचे मार्ग बिकट हे न ठाउके मातें. १३
मी परदेश न फिरलों, रीति बघाया तदीय नयशैली;
कारण, करावयाची वेशांतर खोड मानवां पडली. १४
ह्या त्यांच्या खोडीनें फसविति अत्यंत शोधकासहि ते;
आपण अपणां नेणों होऊं त्या रीतिनें कसे ज्ञाते ? १५
हे तत्त्वज्ञ ! मला जें थोडेंसें प्राप्त जाहलें ज्ञान,
तें संपादन केलें मीं ह्या सामान्य सृष्टिपासोन. १६
न्यायानें वर्तावें कैसें तें सृष्टिपासुनी शिकलों.
सृष्टीनेंच शिकवितां दुर्गुण सोडोनि सद्गुणीं वळलों. १७
प्रति दिवशीं मधमाशी करोनियां श्रम, करी मला जागें;
सांगे कीं उठिं उठिं बा ! झडकरि कामास आपुल्या लागें. १८
पुढच्या सामग्रीस्तव सावध मुंगी बघोनि झटतांना,
नाना पदार्थ कोण ज्ञाता नाणील आपुल्या सदना ? १९
अति विश्वासू माझा वाघ्या* शिकवी कृतज्ञता मजला,
त्याचाच बघुनि कित्ता प्रामाणिक चाकरीस हा सजला. २०
प्रीती स्वस्त्रीवरतीं ठेवावी सतत मानवें केवीं
शिकलों बघुनि प्रेमा मादीवरि पारवा कसा ठेवी. २१
निंदा आणि तिरस्कृति ह्यांच्यापासुनि रहावया दूर.
सृष्टीनेंच शिकविलें मज, हे सांगूं किती तदुपकार ! २२
अंगीं मोठाईचा आणोनी डौल भाषणांमाजीं
गाजी कधीं न झालों अन्या अवमानुनी बहुसमाजीं. २३

* प्रसंगोपात्त वाघाचींही आंतडीं बाहेर काढणारा धनगराचा कुत्रा.

धिःकार करिति मानव ' तें काय हिडिस् ' म्हणोनि घुबडाचा;
साचा गभीरतेचा कित्ता परि तोच बुद्धिमंतांचा ! २४
मी बहु बोलत नाहीं. कारण, बहु बोलका वदे वायां.
सायास न तरि करिते कां जन राघू उगाच ठेवाया ?† २५
म्यां साहसी नरासम घाला घालोनि परधनावरतीं
भरती अपुली न केली हांव धनाचि न मला अनावर ती. २६
मी खादाड पशूंचा द्वेषचि करितों; जयांत हे तात !
वारी, बहिरि ससाणे, तसेच ते लांडगेहि येतात. २७
सर्पादि पशू द्वेष्यचि जरि तरि षड्रिपु कसे न मानावे ?
वानावें काय जहर ह्यांचें ! हा हा भुजंग ते बरवे ! २८
प्रत्येक वस्तु ऐसी सृष्टींतिल तत्त्व भरुनियां राहे,
पाहे शोधुनि ती प्रति, अशा नराचीच वाण बा आहे ! २९
वस्तू सूक्ष्म कितीही असली क्षुल्लक तरी गुणग्राही
कांहीं तरि तिजपासुनि काढितसे सार संशयचि नाहीं. ३०

(५)

"कीर्ती खरी असे तव" बोले तत्त्वज्ञ मेंढपाळातें;
"तुझिया सुजाणतेची सद्गुण हा साक्ष देतसे मातें. ३१
गर्वानें मनुज जसा, तैसे ग्रंथहि सदोष असतात;
कारण, पुस्तककर्ते बहुधा गर्वेंच लेख लिहितात ! ३२
परि, सृष्टिनियम ह्यांचा करितो अभ्यास तो सुजन घाली
कित्ते सुवर्तनाचे पाहोनी गोष्ट सत्य जे घडली. ३३
इतर जनांतें मग ते कित्ते करितात नीतिनिपुण असे;
विद्यालयीं न जातां तीचा परिणाम त्या जनीं विलसे. ३४

प्रकाशन—मनोरंजन,
वर्ष २ रें, जोड अंक, १८९७.

---

† पोपट फार वटवट करूं लागला, म्हणजे त्याच्या पिंजऱ्याभोंवतीं वस्त्र गुंडाळून त्याला रात्र झाली असें भासवून उगा करितात. त्यास उद्देशून ही पंक्ति आहे.

# विपर्यास.



अमंगलद्योतक कार्तिकाची
होती निशा वद्य अमावसीची.
व्यापूनि गेलें नभ अंधकारें,
चकाकती भासुर त्यांत तारे. १

निवात वातावरणांत होतें,
हेमंतशीतें निज शासनातें
आरंभियेलें जणु गाजवाया,
कठोर राजांसहि लाजवाया. २

न लोटली यामहि यामिनी ती,
दे रूप तीचें तरि फार भीती;
गमे विदारोनि महामुखातें
काळी भुजंगी जग आज खाते. ३

अहो ! तिनें पुण्यपुरासभोंतीं
देवोनि काळ्या अपुल्या कनाती,
केलें महाराष्ट्रविभूषणाचें
स्वरूप तों फार अभद्र साचें. ४

तरू तमोवेष्टित त्या पुराचे
पाहोनि भासे गण हे भुतांचे,
होवोनियां निश्चल तिष्ठले कीं
पौरांसि न्याया यमधर्म-लोकीं. ५

तों श्वान कांहीं मिळुनि स्मशानीं
करीत कोलाहल विव्हळोनी;
लागे दिवाभीत ‘ हुहू ’ कराया,
काळास दे स्फूर्तिच संहराया. ६

किती चिता त्या क्षणिं लाविलेल्या
होत्या किती अर्धचि पेटलेल्या;
प्रदीप्त होवोनि किती जळाया
चौंहीकडे लागत ढांसळाया. ७

भासे न कल्लोळ चिताग्निचे ते,
तें मूर्तिमान् बांधव-दुःख चेते;
शवास्थिभंग-ध्वनि ते न साचे,
सुहृज्जनांच्या मृदुशा उरांचे. ८

प्रकाश कांहीं, तम तेविं कांहीं,
ज्वालाहि कांहीं, घनधूम कांहीं,
मूकत्व कांहीं, रुदनेंहि तैशीं,
स्पर्धी असें तें स्थल रौरवाशीं. ९

नांदे पुरीमाजि तया प्रसंगीं
भयाण औदास्यचि सर्व जागीं;
मध्येंच आर्त्त स्वर दे जनांतें,
पुनः पुन्हां जीवितसंशयातें. १०

प्रचंडशा ग्रंथिक सन्निपातें
खड्गाचियें पाजुनि दिव्य पातें,
संपात त्याचे जहरी अहो ते
पौरांवरी चालविलेच होते ! ११

ज्या ज्या जनीं घाय तयें करावा,
तो तो गतप्राणचि शीघ्र व्हावा !
पडोनि ऐसा चिरकाल घाला
किती विपर्यास पुण्यांत झाला ! १२

जें नित्यही मंडित पंडितांनीं,
रंगेल, हौसी, रसिकां जनांनीं;
तें रम्य, लोकप्रिय, सर्वमान्य,
झालें पुणें संप्रति शून्य-शून्य ! १३

जें स्थान आरोग्यखनी म्हणोनी
सेवीत दूरस्थहि कौतुकांनीं,
संसर्गही आज तदीय नाशी
कुग्रामवासी मलिनां जनांसी. १४

जैं शेंवती, चंपक, मोतियाचा
अमोद तो मोदद यावयाचा,
त्या राजमार्गांतुनि गंधकाचा
दुर्गंध ये संप्रति डांबराचा ! १५
ज्या ज्या पथीं संचरतां जनांतें
विलासिनीविभ्रम दे भ्रमातें,
त्यामार्गिं आजी नृपदूत देती
स्वदर्शनानें यमदूत-भीती ! १६
शौकी जनांनीं उपभोगिलेले
जेथें गळावे मृदुपुष्प झेले
तेथें पथीं त्या अशुभा शुभांचीं *
प्रदीप्त खंडें पडतात साचीं ! १७
द्वारें सुरंगीं शुभ तोरणांनीं
जीं शोभलीं चारु गजाननांनीं,
तीं मृत्युचीं आणि परीक्षणाचीं
भेसूर चिन्हें धरितात साचीं ! १८
ज्या मंदिरीं गानविशारदांनीं
आलाप घ्यावे मधुरस्वरांनीं,
तेथें मृतांच्या मित बांधवांचे
विलाप होती करुणारवांचे ! १९
दीपप्रभा ज्यांतुनि नित्य रात्रीं
विराजती तेविं दिवा सुगात्री,
वातायनीं त्या पसरोनि जाळीं,
स्वभक्ष्य आतां धरितात कोळी. २०
ज्या पाठशालांतुनि बालकांचा
अस्पष्ट पाठध्वनि यावयाचा,
त्यांतूनि, त्या शुद्ध उजाड होतां
भुंकार भुंगे करितात आतां. २१

* गोंवऱ्या हा यज्ञांतील पारिभाषिक शब्द आहे.

नाना ऋतूंतील वसुंधरेचे
प्रसाद जें नित्य मिळावयाचे,
समृद्ध सौभाग्य असें पुण्याचें
जी 'मंडई', तीसहि दैन्य साचें ! २२
असंख्य टाळ्या पडुनी तयांचा
ध्वनी जिथें नित्य घुमावयाचा,
त्या नाट्यशालाहि सभागृहें तीं
पाकोळिचे पंखचि नादवीती ! २३
पेठा, चवाठे, विविधें दुकानें,
सुरम्य आराम, किताबखाने,
क्रीडास्थलें, संचय ते जलाचे,
माहेर सारें जणु शून्यतेचें ! २४
अहो ! विपर्यास असा पुण्याचा
तया महाराष्ट्र—विभूषणाचा
ऐकोनि, चित्तीं भ्रम घालि घाला !
वक्षासि लक्षावधि वेध झाला ! २५

प्रकाशन—करमणूक,
ता. १ जानेवारी १८९८.

---

## हलवा

—:०:—

( प्रियंवदावृत्त. )

मकरसंक्रमण आज लागलें,
सहज कौतुक मनांत वागलें,
म्हणुनि ये मम सुता प्रियंवदा,
तिळ तिच्याच करिं घ्या, प्रियं वदा ! १
दिसति कंटक जरी तयांवरी,
तरि न रोष करणें निजांतरीं;

बहुत कंटक गुलाबही धरी
तरि गुणज्ञ जन त्यास आदरी, २
जग गुणावगुण-मिश्र हें असे;
नियम तोच हलव्यांतही वसे.
कवण दोष मग दे बरें तया
समजतो उमजतोहि जो नया ? ३
जरि सकंटक, तथापि केशरी,
रुचिर हा, धरि सुवृत्तता बरी;
सुहृदता दृढ करी परस्परीं,
उणिव हो गुणगणांत साजरी ! ४
नवविवाहित सुता 'प्रियंवदा'
मजकडे धरुनि छंद ये सदा;
'करमणूक' तनयाच आपली
जिवलगा सखि हिची असे भली. ५
प्रथम वायन तिच्या समागमें
चहुंकडे इजसि वांटणें गमे.
तरि तिच्यासह हिलाहि पाठवा,
रसिक देशभगिनींस भेटवा. ६
नट–नटूनि झटुनी निशीदिनीं
करितसे कृति घमंडनंदिनी !
बहु अपूर्व हलवा असा इनें
बनविला प्रकृतिजन्य घाइनें. ७
मजकडे फिरफिरोनि आणिते,
सुबक तो म्हणुनि हीच वानिते !
परि दिसेल रसिकांस चांगला
तरिच मीहि ठरवीन चांगला. ८

प्रकाशन—करमणूक,
वर्ष ८, ता. १५ जानेवारी, १८९८.

---

# विलंबीनाम संवत्सरास.



रवि युवा विलसे निज वैभवीं,
विटप हे नटले नव पल्लवीं,
पळसही फुलले खुलले बरे,
अझुनि कां करितोस विलंब रे ? १
उपवनांत वनांत करी तसे
अरुणवर्ण अशोक अ-शोकसे;
प्रति दलीं अनुराग जणों भरे !
अझुनि कां करितोस विलंब रे ? २
फुलुनि हे कटुनिंब तरी किती
परिमलें वन भारुनि टाकिती !
ढळति कोमल पल्लवचामरें;
अझुनि कां करितोस विलंब रे ? ३
तरुवरांतिल केवल मोहरे
झुलति आम्र सुशोभित मोहरें !
दश दिशांस सुवासचि संचरे !
अझुनि कां करितोस विलंब रे ? ४
नयनमंजुल मंजुरिभोंवतीं
भ्रमरपुंजहि गुंजति, भोंवती;
लुटिति जो रस तींतुनि पाझरे.
अझुनि कां करितोस विलंब रे ? ५
विविधजाति लता, मधुमालती,
कुसुमिता पवनासह हालती;
सुचविती जणु मार्ग तुला करें.
अझुनि कां करितोस विलंब रे ? ६
ऋतुगुलाबहि, चंपक, मोगरे,
मुदितसे दिसती कलिकाभरें;

जणुं अपेक्षिती ते तुज आदरें.
अझुनि कां करितोस विलंब रे ? ७

पवनही सुखशीतल होउनी,
सुमनगंध परागहि घेउनी,
तुजसि सन्मुख येति दिगंतरें;
अझुनि कां करितोस विलंब रे ? ८

पिकशुकादि रसज्ञ विहंगम
करिति शब्द बहू हृदयंगम !
जणुं तव स्तव गाति निजस्वरें !
अझुनि कां करितोस विलंब रे ? ९

सुबक हें नव वैभव सृष्टिचें.
तरि न कौतुक तें निजदृष्टिचें.
स्वमन संप्रति कीं बहु घाबरे;
अझुनि कां करितोस विलंब रे ? १०

वरिवरी उर जीवितसंशयें
थरथरोनि विषाद मनास ये !
भरंवसा तनुचा पळही नुरे !
अझुनि कां करितोस विलंब रे ? ११

तरुण मन्मथसे नर–मोहरे
वितळुनी मिळतात वसुंधरे !
प्रलय मांडियला सविषज्वरें !
अझुनि कां करितोस विलंब रे ? १२

पुरजनीं निज सुंदर मंदिरें
त्यजुनि सेवियलीं विपनान्तरें;
पिडियले यमराज–भयें पुरे !
अझुनि कां करितोस विलंब रे ? १३

वनहिमातपवातहि साहती,
जणुं अनाथ अरक्षित राहती;
दिवस संतत चिंतिति ते बरे.
अझुनि कां करितोस विलंब रे ? १४

खटनटा परि हे दिन ओखटे,
अमित कंटकशीं कटु संकटें;
सकल नष्ट दशा कधिं ही सरे?
अझुनि कां करितोस विलंब रे? १५
सदय होउनि तूं झणि आलिया
खचित नेशिल दुःस्थिति ही लया;
धरुनियां दृढ आस अशी जनीं
बघति ते तुज सोत्सुक लोचनीं. १६
असुख जाउनि ये सुख मागती,
सतत हीच दिसे जगतीं गती;
सुखद होशिल ह्यावरुनी खरा,
जग तरी मग वांटिल साखरा! १७
तरि अतां विनती परिसोनि घे.
अयि विलंब! गृहाहुनि तूं निघे.
द्रुत!—विलंबित हो न पथान्तरीं-
भय हरोनि कृपा करिं किंकरीं! १८

प्रकाशन—करमणूक,
वर्ष ८, अंक १२, मार्च १८९८.

---

## नववर्ष.

—०—

येतां वसंतऋतु नूतन अंकुरानें
वेली तरू विलसती बहु संभ्रमानें,
उल्हासदायक अशा प्रति सुप्रभातीं
त्यांच्या नवीन कलिकांस विकास येती. १
वायू फुलांतिल पराग सुगंध वाही,
दाही दिशा भरुनि दे सुमवैभवांहीं;

टाकोनियां शिशिरभाव जल स्वभावें
जावें जडत्व अतएव सवेग धांवे. २
येतो जणों दिनपती नव वैभवें कीं
देवी उषा म्हणुनि लाल गुलाल फेंकी;
उत्साह घेउनि नवा मधुशोधनांत
रेणूंत भृंगतति रंगुनि गुंगतात. ३
पीडा जरी सकलही गत शीतकाळीं
पिल्लांस आणि अपुल्यास उदंड झाली,
तत्रापि तीस विसरोनी विहंग सारे
गाती वसंत यश नाचवुनी पिसारे. ४
येतां वसंत अथवा नववर्ष, सारी
सृष्टी अशी धरि सहर्ष नवी उभारी;
उत्साह ती बघुनि उद्यमिनां जनांतें
येऊन, ते झटुनि लागति उद्यमातें. ५
विघ्नें जरी विविध उन्नतिच्या पथांत
आलीं, तरीहि नववर्ष-समागमांत
तीं तीं समस्त विसरोनि नव्या दमानें
ते पावती विजय संतत उद्यमानें. ६
उद्वेग भूमिगत निर्मल निर्झराचा,
तैसाच तो रबर निर्मित कंदुकाचा
कोणी जरी फिरविला क्षण एक मागें,
जातो वरी तरि पुन्हां द्विगुणाढ्य वेगें. ७
दीर्घ प्रयत्न बघतां शरणागताचा,
होतो दयाघन हरि स्वयमेव त्याचा;
साहाय्य तो करिल या विजयास तैसें
श्रीभारतेयतनया विजयास जैसें. ८

**प्रकाशन**—सयाजीविजय,
१८९८.
रसतरंगिणी, १९१०.

---

# मानिनी.



छी छी ! नको भृकुटिभंग करूं असा गे !
सुभ्रू ! तुझें हितचि मी तुजलागि सांगें;
भ्रूभंग निर्दय भयंकर कर्कशेतें
शोभे न हा तुजसमान सुकोमलेतें. १
फुल्लाब्जवैभव जया नयनीं लुटावें,
त्यांतून का कटु कटाक्ष असे सुटावे ?
ह्यांनीं पती, अधिपती, नृपती तुझा हा
घायाळ होय कमलाक्षि ! पहा पहा हा ! २
धिःकारयुक्त तव नेत्रकटाक्षयोगें
चंद्रानने ! तव मुखासहि डाग लागे !
तेणें घडे रुचिर कांति तदीय तैशी
चंद्रप्रभा मलिन ती ग्रहणांत जैशी. ३
सौम्ये ! तुझें यशहि आकुल हो तयांनीं;
तें पुंडरीक जणुं चंड समीरणांनीं.
भ्रूभंग, धिःकृतिकटाक्ष, तरी न वाही
ते सर्वथा अनुचित प्रियही न पाहीं. ४
वर्षाॠतूंमधिल पल्वल पावसाचें
रागजेल वदन हें तव तेविं साचें;
कीं अप्रसन्न, घन, अप्रिय लोचनांसी,
हेंही विशोभित म्हणोनि समान त्याशीं ! ५
राहील हें जंव धरोनि असाच राग
पाहील कांत तव कां तंव सानुराग ?
साहीलही नच बघूं जरि तो अशाला
वाहील तन्मति तरी अधरीं कशाला ? ६
गे ! जो तुझा पति, तुझा प्रभु, जीव दूजा,
जो रक्षिता, प्रमुख, जो अधिराज तूझा,

जो काळजी निशिदिनीं तव जीविताची
वाही तशीच तुझिया उपजीविकेची; ७
राहोनि निर्भय गृहीं स्वसुखासनातें
आराम तूं करिसि मानिनि ! शांत चित्तें,

तेव्हां हिमातपहि सोसुनि वारिधारा
जो कष्टवी तव सुखास्तव देह सारा; ८
प्राणेश तो श्रमुनि येउनिही अगारीं
न प्रार्थितो तव करीं करभार भारी;

प्रीती, सुधामधुर नेत्रकटाक्ष, आणि
आज्ञानुवर्तन, तयास असे शिराणी ! ९
देतो उदंड ऋण तो तुज जें तयाचें
आनृण्य[1] हें किति किती तरि अल्प साचें !

त्याच्या अनंत बघतां उपकार-राशी
कांहींच हा विनिमयो न गमे तयाशीं ! १०
राजासि आदर जसा सकल प्रजेनें
देणें तसाच पतिलाहि कुलांगनेनें;

उच्छृंखला, पिशुन, खिन्नमुखी सदाही
जी कर्कशा, खचित ती गृहिणीच नाहीं ११
इच्छेनुरूप पतिच्या नच आचरे जे
लोकीं ' कलत्र ' पद हें तिजला न साजे

वाटे, उदार, अनुरक्त, अशा पतीतें,
निर्लज्ज, कुत्सित, कलिप्रिय वैरिणी ते !
जेथें अहंमति झुगारुनि ऐक्यभावा
साधावयास गृहिणीजन लीन व्हावा,

तेथें विरोध करितां बघुनी तयातें
त्याच्या विमूढ मतिची मज कींव येते ! १३

---

१ उपकारांची–ऋणाची–फेड.

जेथें स्वयें वचनतत्परता धरावी,
आराधनाचि अनुरागभरें करावी,
तेथें प्रभुत्व अधिकारहि गाजवाया
कां इच्छितात न कळे अबला मला ह्या ! १४
जी स्निग्ध आणि सुकुमार तनू स्त्रियांची
पद्मांतरंग—उपमा धरि सार्थ साची,
पाषाणसाम्य हृदयांत तिच्या वसावें
ह्याहूनि लांछन निकृष्ट कसें असावें ! १५

प्रकाशन—मनोरंजन,
वर्ष ३, एप्रिल—मे, १८९८.

---

## स्वदेशप्रीति.



"Breathes there the man with soul so dead,
Who never to himself hath said
This is my own my native land ?"
—Sir W. Scott.

जिवंतमृत भूवरी कुणि असेल काहो असा ?
महाकुलकलंक, जो सकल मानवांही तसा !
स्वदेश,—निज जन्मभू,—कधिं न बापुडा जो स्मरे;
मनींहि अथवा न घे कधिं तदीय नामाक्षरें ! १
फिरोनि परदेश, जो कुशलरूप जातां घरा,
स्वदेश बघण्यास हो मनिं जरा नही हांवरा;
असेल जरि का असा नरपशू कुठें भूवरी,
अवश्य तरि जा, पहा निरखुनी तया सत्वरीं ! २
पदें उपपदें महा मिळुनि नामकंथा भली
विशालहि, खुशाल त्या जरि नराधमें वाहिली,
करीं जल भरी जरी सतत इंदिरा मंदिरीं—
तदीय, तरि ती खरी क्षणिक तत्सुखाची सरी. ३

वृथा उपपदें, पदें नवनिधीहि त्याचे वृथा !
वृथाचि अधिकार तो सकल मीपणाही वृथा !
जितां मृतचि तो असे, विमल कीर्तिला पारका,
रजामधुनि जन्मला, पुढतिंही रजांचा सखा ! ४
न शोक करण्यास तो विषय, मान द्याया न तो,
न काव्यरचनास तो विषय, गान गाया न तो !
निरर्थकचि जन्मुनी, विकिरवत् जिणें नेउनी,
अधोभुवन जोडुनी, तनुस जाय तो सोडुनी ! ५

प्रकाशन—करमणूक,
वर्ष ८, अंक ६, आगस्ट १८९८.

—

## परमेश्वरपूजा.



व्यापूनि विश्वातें । राहे नारायण ॥
तया आवाहन । करूं कोठें ॥ १ ॥
आधार सर्वांचा । आसन तयातें ॥
कोठें द्यावें मातें । समजेना ॥ २ ॥
स्वच्छ जो सदाही । अर्घ्य पाद्य त्याला ॥
व्हावें तें कशाला । समजेना ॥ ३ ॥
शुद्ध जो स्वभावें । तया आचमन
निर्मलातें स्नान । कासयाला ॥ ४ ॥
विश्व हें जयाच्या । सांठवलें पोटीं ॥
तयातें चिंधोटी । कासयाला ॥ ५ ॥
जो का निराकार । तयातें जानवें ॥
कैसें म्यां घालावें । समजेना ॥ ६ ॥
सौंदर्याचा हेतू । तया भाराभर ॥
व्हावे अलंकार । कासया ते ॥ ७ ॥

---

१. तिरस्करणीय.



कविमित्र कै. वा. दत्तात्रय कोंडो घाटे, बी. ए.

कविकुलास कलंक असे किती
धरणिधूलिमधीं खळ लोळती !
म्हणविती जरि ते कवि आपणां,
तरि म्हणूं करिती जनवंचना ! २

स्वकृतिनें परि जो जन भारती
सजवितो जणुं कीं दुसरी रती;
त्यजुनि अन्य विचार तयास मी
कवि म्हणोनि सदा शिरसा नमीं. ३

जरि तदीय समागम हो मला,
तरि म्हणेन सुरेश्वर लाभला !
परि असा कवि ह्या वसुधेवरी
झळकतो विरळाच कुठें तरी. ४

मग तदीय समागम—लाभ तो
मनसि संतत कोठुनि लाभतो ?
परि अहो ! कविरत्न असें भलें
सुकृतिनें सहजीं मज लाभलें ! ५

समजलों किति धन्य तदा मला !
अमित हर्ष किती मज जाहला !
त्यजुनियां कितिदां व्यवसायही
धरुनि ती बसलों कविता-वही. ६

विकसतांच सरोज सरोवरीं,
मधुप तो लुटितो मधुमाधुरी;
सरस दत्त कवीसह मी तसा
सतत सेवितसें कविता रसा. ७

सकल मोह जगांतिल त्यापुढें
मग अम्हां गमले तृण बापुडे !
न कविता, परमामृत-सेवनीं
न कळतां सरल्या दिनयामिनी ! ८

सुख मिळेल सदैव असें मला
ग्रह असाच मनें मम घेतला;
तंव अहा ! कटु काळ निशामुखीं
श्रवणिं दंश करी, जणुं वासुकी ! ९
समजलें विषमज्वर येउनी
कवि पडे अति निश्चल होउनी !
संवगडी विषमामधिं सांपडे,
परि तयांतिल मोह* मला घडे. १०
द्रुतविलंबित जाउनि भेटलों,
प्रकृति पाहुनि दुःखित जाहलों;
परि असाध्य न ती दिसली मला,
कवि सखाहि हताश न जाहला. ११
दिसुनि उज्ज्वल मालवतो दिवा,
दिसुनि रुग्ण बरा, मुकतो जिवा;
उतरला ज्वर यद्यपि भासला,
तरि पुन्हां अनिवारचि वाढला ! १२
कठिण लोह जरी अति तापुनी
पडतसे मृदु भस्मचि होउनी;
तरि शरीरकथा मग ती किती ?
कवितनू पडली अवनीप्रती. १३
बघुनि तें, मम देह गमे मला
क्षणभरी मृततुल्यचि जाहला !
पडुनि अंधतमीं जडभावना
जणुं घडे तनुलाहि तशी मना ! १४
फिरुनि रोम तनूवरि ऊठले,
खळखळां नयनीं जळ लोटलें;

* " तंद्रा मोहः प्रलापश्च " इ० वैद्यकांतील विषमज्वराच्या लक्षणांस अनुलक्षून हा मोह शब्द येथें योजिला आहे.

धडकला घनघाव उरावरी,
करपलें मृदु काळिज अंतरीं ! १५
सकळ जेथिल तेथ झुगारुनी,
संवगडीं विरहानलिं लोटुनी,
कविसख्या ! परलोकचि तो भला
वद कसा सदया रुचला तुला ! १६
उडुनि उंच नभीं तव कल्पना
चकित गा ! करिते मम लोचनां;
विविधशा विषयीं तुझिया कृति
मज मयूरकलापचि भासती ! १७
' बघसि अंत किती तरि राजसे, '
मधुर ' कोकिलकूजित ' ही तसें;
सरस ' मुग्ध ' अशी ' कलिका ' हि ती,
वदुं अशा मधुरा कविता किती ! १८
श्रुतिमनोहरसा कवितौघ तो
विमल गांगजलासम वाहतो;
कुणिहि जो रस त्यांतिल चाखतो
अनुभवी अमृतानुभवास तो. १९
करुनि त्यांत सदैव निमज्जना
परम हर्ष घडे रसिकां जनां;
परम वस्तु निरंतर सेवुनी
परम हर्ष कसा नुपजे मनीं ? २०
सुरवधूहुनि मंजुळ बोलकी,
तव सतार अतां धरि मौन कीं !
सवत-बोल वरी रुचले तुला,
म्हणुनि ये रुसवा जणुं कीं तिला ! २१
धरिसि तूं पदवी तरि तूजला
दुरभिमान तिचा नच जाहला;

सुजनता, रसिकत्वहि लीनता,
भरतभूविषयीं अनुरागिता; २२
गुण अमोल असे किति आठवूं ?
विरह शोक कुठें तव सांठवूं ?
अति सुखासचि जे गुण कारण,
करिति संप्रति वक्षविदारण ! २३
जलनिधी मधिं एक दुजास तें
मिळुनि काष्ठ फिरोनि दुरावतें,
बघुनि त्यासम संगम आपुला
अति हताशचि हा जन जाहला ! २४
परि असो जंव राहिन भूवरी,
तंव तुझ्या कवितेंतिल माधुरी
सतत सेवुनि मानिन धन्यता;
कवियशें मज भेटत जा अतां. २५
कविवरा ! धरिसी निज अंतरीं
प्रणय उत्कट ज्या कवितेवरी,
सुरपुरींतहि ती अधिदेवता
कविपदस्थ करो ! तुजला अतां. २६
तुजवरी कविमान–परंपरा
सतत वर्षुनि कीर्ति निरंतरा,–
सुखद शाश्वत शांति मिळोहि ती
मुनि जिला परमार्थचि मानिती. २७

प्रकाशन–सयाजीविजय,
१८९९ ( मार्च ), काव्यदोहन.
दत्तांची कविता. १९२२.

---

# चैतन्यदूत.*



गा सकळ ज्ञाननिधाना !
चैतन्या परमपावना !
ह्या देहीं होतासि पाहुणा
आजवरी. १
परी यमधर्म दण्डपाणी
होवोनि ठाकला सन्निधानीं;
उद्युक्त झालासे हननीं
शरीराचिया. २
घडीभरें हेंचि कलेवर
निश्चयें ताडील दण्डधर;
होईल तें जडतर
त्वद्वियोगें. ३
जाणोनि तुझी तुटातुटी,
खेद संचरे हृदयपुटीं;
परी जे जे होणार गोष्टी
कदाही ते चुकेना. ४
देही म्हणविती तयांची
मरण ही प्रकृतीच साची;
उक्ती ऐशी कविरायाची
रघुवंशीं प्रसिद्ध. ५
ती अन्वयें सांडोनि मोह,
ठेविलाच पाहिजे हा देह;
यामाजिं नसे संदेह
तिळमात्र. ६

* Sir Walter Raleigh ह्यांच्या The Soul's Errand ह्या वेंच्याचें रूपांतर.

आजवरी तुजसंगतीं
काळ कंठिला म्यां जगतीं;
नाना अनुभवांहीं मती
परिपाकातें पावली. ७

हा तूझा उपकारगिरी
लंघूं येईल मातें, तरी
पंगूही धवलगिरीवरी
अनायासें चढेल की ! ८

असतां इतुकाही तव ऋणी
लज्जा झुगारिली वैरिणी;
संप्रति संदेश तुजलागोनी
देतों कांहीं. ९

सोडोनि माझें कलेवर,
घेवोनि माझा निरोपभार,
तो सांगाया धरणीवर
ठायीं ठायीं विचरावें. १०

मातें आलें बोलावणें,
निरुपाय झाला याकारणें;
नातरी मीच जातों जातीनें
झडती घ्याया सकलांची. ११

जगीं राहोनि आजवरी,
खोटीं नाटीं जाणिलीं सारीं;
तीं ज्यांचीं तयांच्या पदरीं
नेवोनि घालितों साचार ! १२

परी काळें धरिले हातपाय,
तेणें अगदीच जाहलों गाय !
तरी सिद्धीस नेवोनि हें कार्य
तूंच पुरवी मनोरथ. १३

यद्यपि असला महाजन,
तथापि न भ्यावें त्यालागुन;
कीं सत्यमेव ज्याचें प्रमाण,
अभय जाणिजे तो लोकीं. १४

प्रथम जाई राजसभेतें
निरोप सांग तूं तियेतें;
कीं दावितेस अवडंबरातें,
असतां पोकळ अंतरीं ! १५

तेज मिरविसीं वर वर,
आंतोनि साराचि अंधार;
देऊं लागतां प्रत्युत्तर,
'मिथ्या !' म्हणोनि गर्जावें. १६

पुढें जावें तयांप्रती,
जे वक्ते म्हणोनि गाजती;
धिक् तुमचीं व्याख्यानें तीं
पुरे कराहो ! म्हणावें. १७

वक्तृत्वाचीं घालोनि दळणें
धर्मनीतीचीं लावितां वळणें;
उपदेशकांचा आव तेणें
व्यर्थ कीं हो दावितां ! १८

'क्रियेवीण वाचाळता,
व्यर्थ आहे' जाणतां;
पुन्हां तैसेच वागतां,
जन तेणें निंदिती ! १९

ऐसे शब्द पडतांचि कानीं,
ठिणग्या लागोनियां मनीं,
ताडूं येतां प्रतिवाग्बाणीं,
'मिथ्या !' म्हणोनि गर्जावें. २०

पुढें जे जे सत्ताधारी,
जावें तयांच्या मंदिरीं;
पाणी पितां इतरां करीं,
म्हणोनि त्यांतें सांगावें. २१
परकीयांच्या भरोनि मुठी,
प्रियता संपादितां मोठी;
भेदभाव धरोनी पोटीं
दुर्बल होवोनि बैसतां ! २२
ऐसें ऐकोनि सत्ताधारी
उलटोनि बोलती तरी,
'मिथ्या !' म्हणोनि ते अवसरीं
अंगीं तयांच्या लावावें. २३
पुढें जे जे राजपुरुष
चाळिती राज्यसूत्रें अशेष,
त्यांतें बजावोनि विशेष
निरोप ऐसा सांगणें. २४
श्रेष्ठ पदाची हाव मनीं,
द्वेषपूर्ण तुमची करणी,
यावरी बोलतां प्रतिवचनीं
'मिथ्या जल्पतां !' म्हणावें. २५
पुढें जावें तयांप्रती
जे शौर्याची शेखी मिरविती;
म्हणावें उधळोनि संपत्ती
महती तुम्ही याचितां. २६
आज्ञा चालवाया आपुली
तुम्ही निज सर्वस्वें विकिलीं !
यावरी उत्तरें त्यांहीं दिलीं
तरी तीं 'मिथ्या !' म्हणावीं. २७
आतां प्रत्येकातें वेगळा
संदेश देतां उणा आगळा,

बा चैतन्या ! तुझिया गळां
ग्रंथकंथा पडेल की ! २८

जाणोनि कथितों संक्षेपानें,
अनुभवासि आलें जें जें उणें.
तें ज्यांचें तया निर्भीडपणें
सांगणें गा उदारा ! २९

भक्तीमाजीं भाव नसे,
प्रीती विषयांधत्वेंचि वसे,
काळ केवळ धांवतसे,
देह म्हणजे मृत्तिका ! ३०

घडोघडी आयुष्यनाश,
सन्मान पावे विपर्यास,
अपाय होई सौंदर्यास,
कृपेची हो अवकृपा ! ३१

कोटिक्रमाचें भाषण,
उकरोनि काढी भांडण,
शहाण्यांचें शहाणपण
अतिरेकातें जातसे ! ३२

बलवंताठायीं अविनय,
चतुरांठायीं कापट्यविजय,
धर्मबुद्धीतें औदासीन्य,
कायदे जाहले वाग्युद्ध ! ३३

दैवें धरियली अंधता,
सृष्टीनें धरिली नश्वरता;
मित्रगणांही निर्दयता,
न्याय झाला दीर्घसूत्री ! ३४

कळाकुसरींत सार नसे,
कीं लोकीं रुचिभिन्नता वसे !

विद्यार्थी झाले निःसत्वसे,
पोपटपंची शिक्षणें ! ३५
नगरांतोनि विश्वास गेला,
जनपद अज्ञानांत बुडाला;
मानव मानभाव जाहला,
दया दूर झुगारिली ! ३६
गुणांची पारख नसे लोकीं,
जाणतीं राहिलीं थोडकीं;
बाकी सारेच गाजरपारखी,
सद्गुण तेणें लोपले ! ३७
बा चैतन्या ! जे जे आतां
निरोप झालों निरोपिता;
ते तूं लोकीं बोलतां
रहस्य-स्फोट होईल की ! ३८
तेणें चवताळोनि दुर्जन,
करूं येतील तव हनन;
परी ऐसा होय कवण
की जो तूझा घात करी ? ३९
शस्त्रें तुजला न छेदिती,
पावक न करी तवाहुती,
जळें तुजला न बुडविती,
पवनही शोषूं शकेना ! ४०
ऐसें अभयाचें वचन
जेथें बोलला सच्चिद्घन,
तेथें पामरां नरांकडोन
काय व्हावें वांकुडें ? ४१

प्रकाशन—करमणूक,
वर्ष ९, अंक १०, जून, १८९९.

---

# सुविचारसमागम.



" प्रायेणाधममध्यमोत्तम गुणः संसर्गतो जायते. "

—भर्तृहरिः

संतप्त लोहशकलावरि जो जलाचा
जातो जळोनि पडतांक्षणिं बिंदु साचा,
आकार तो धरिल सुंदर मौक्तिकाचा
होतां समागम तया नलिनीदलाचा. १
स्वातींत तोच पडला जरि शिंपल्यांत
होईल मौक्तिक तरी मग सागरांत !
येते स्थिती अधम, मध्यम, उत्तमाची,
ती ती फलश्रुतिच होय समागमाची. २
जो कां निरीक्षण करोनि सदा विलोकीं,
सिद्धांत ये दिसुनि हाच तयास लोकीं;
काव्यासही विविध—शब्दसमागमानें
येतें स्थितित्रय जलासम तें क्रमानें. ३
अश्लील, कर्णकटु शब्द जयांत येती,
मर्मज्ञ तें अधम काव्य तिरसू करीती.
पिंडान्नभक्षक अमंगल वायसाचा
दुःशब्द जेविं करिती जन तुच्छ साचा. ४
जें शब्दचित्र मधुर स्वरसंगमानें
कर्णास केवल करी वश कौतुकानें,
तें काव्य मध्यम, असार तयासमान
जैसें सुमंजु अलिपुंजक-गुंजगान. ५
किंवा जशीं असुनि पोकळ नूपुरें तीं
आकर्षिती कलरवें बहु कर्णपंक्ती,
सुश्राव्य शब्दमय नीरस काव्य तैसें
जे नादलुब्ध जन त्यांसचि रम्य भासे. ६

जें कां परंतु नटलें नवकल्पनांनीं,
ओथंबलेंहि सुविचारसमागमांनीं
शृंगार, वीर, करुणादि नवां रसांचे
साचेच ज्यांत,—नहि शब्द सुधारसाचे ! ७
किंवा जसे किरण पूर्ण सुधाकराचे
चंद्रप्रभा अमृतही स्रवतात साचे,
तैसेच शब्दहि जयांतिल ह्या जगांत
ज्ञानप्रकाश, सुरसामृत वर्षतात ! ८
ऐसें रसात्मक महोज्ज्वल काव्य जें कीं
तें मात्र उत्तम, सनातन होय लोकीं.
होती रसज्ञ बहु लोलुपही तयाला
जैसे चकोरगण शारद चंद्रिकेला. ९
पीतां मरंद अथवा कमलान्तरालीं
होवोनि रात्र कमलें जरि बंद झालीं,
तत्रापि खिन्न नच होउनि बंधनांत,
आनंदती मधुप ते मधुसेवनांत. १०
तैसेच काव्यरस तो उपभोगितांना
कालक्षितीच नसते रसिकां जनांना.
होतो न खेद लवही भवबंधनाचा
ऐसा प्रभाव सुविचारसमागमाचा. ११
शोभाच एक सुविचार न वाङ्मयाची
ह्याहूनि थोर महती दिसते तयाची.
तो नीतिबीज, नयमूलहि तोच साचा,
सोपान तो सकल राष्ट्र-समुन्नतीचा. १२
तो सार एकचि, अनेक विधर्म ह्यांचें,
तो होय तोरणकपाट महोन्नतीचें;
तो शांतिचा मज गमे रमणीय ठेवा,
सर्वार्थसाधनचि किंबहुना वदावा ! १३

प्रकाशन—सुविचारसमागम,
वर्ष २, अंक ४, ऑगस्ट १८९९.

# मोह आणि जातिलता.

( अन्योक्ति. )

अहो ! उपवनांत ह्या सहज चालतां चालतां,
किती सुमतरू किती निरखिल्या प्रफुल्ला लता !
कितेक कुसुमांवरी नयन माझिये वेधले,
कितेक सुमनांतले मधुर गंध मी घेतले. १
विलक्षणचि वास हा परि कुठोनि येतो बरें ?
जयें रसिक नासिका भरुनि चित्त हें घाबरे;
अहा ! समजलों. महा विटप तो दिसे, तो पहा !
भरी खचित तोच हो उपवनांत दुर्गंध हा. २
महा विटप मोहे, जो वरुनि फार झांपाळला,
जयें धरुनि थोरवी गगन भाग कोंटाळला,
पिवोनि मधु ज्याचिया मधुप भोंवतीं भोंवतीं,
यदीय मधुमंजरी बघुनि तीस ते झोंबती; ३
तमालतरुतुल्य जो किमपि मूळचा सांवळा,
असोनि मधुपांसवें धरि विशेष काळी कळा,
असा अधम मोह तो पसरुनी सुरागंध हा
असेव्य करितो स्वयें सकल रम्य आराम हा ! ४
अहो, परि तयावरी दिसतसे लता कोणती ?
न संशयचि; जाणिली रसिकरम्य जातीच ती !
पहा, किति विशुद्धसा प्रणय ठेवुनी अंतरीं
अनन्य गतिनें सती-सम तदाश्रया ती धरी ! ५
किती सुमनसंघ हा धवल तारकांसारखा
तिच्यावरि फुलोनियां हंसत सूटला सारखा !
कवींस जणुं सूचवी मुदित तूमचा मी सखा,
अशा मजसि पाहुनी तुम्हिहि मानसीं हारिखा. ६

१ मोहाचें झाड. २ जाईची वेल.

अये कुसुमिते लते ! विभव हें तुझें पाहुनी,
दया सुहृदयास या वितळवोनि ने वाहुनी !
अहा ! सुगुणसुंदरी ! तुज बघोनि मोहासवें,
न खेद मज सोसवे, नयनिं लोटलीं आंसवें ! ७.
तुझे सुमनगुच्छ हे विकसुनी तयांच्यावरी
जरी झुलुनि सारखा अलिगण स्तुतीतें करी,
पराग, रसबिंदुही गळति त्यांतुनी भूवरी;
तरी सुरसवल्लरी ! तुजसि घाण मद्यापरी ! ८
कसा स्वसुमनांतला मृदु सुगंध नेला लया
तुवां करुनि आसरा तरुसि ह्या सुरा—आलया ?
उदंड गुण जो तुझे सहज मद्यगंधें हरी,
अज्ञासि कर कां वृथा वद दिलास तूं वल्लरी ? ९
परंतु तुज कासया उगिच बोल लावूं बरें ?
विधीस जरि वाउगें करुनि तेंच वाटे बरें;
कसें तरि करावया अति विचित्र ह्या नाटका,[1]
वदे मधुर कोकिला, तिजसि तो विकी खाटका ! १०

प्रकाशन—सुविचारसमागम,
वर्ष २, अंक ५, सप्टेंबर १८९९.

---

## एकांतवास.



" वृक्षवल्ली आम्हां । सोयरीं वनचरें ॥
पक्षीही सुस्वरें आळवीती ॥
येणें सुखें रुचे । एकांताचा वास ॥
नाहीं गुणदोष । अंगीं येत ॥
आकाश मंडप । पृथिवी आसन ॥
रमे तेथें मन । क्रीडा करी ॥

---

१ संसाररूपी नाटकास.

तुका म्हणे होय । मनाशीं संवाद ॥
आपुलाचि वाद । आपणांशीं ॥ ”

---

( १ )

शिला मोठमोठ्या । पसरल्या जेथें ॥
तयांवरी तेथें । विसांवणें ॥ १ ॥
विसांवणें किंवा । पर्वतकावरी ॥
ओढियांच्या तीरीं । पहुडणें ॥ २ ॥
पहुडोनि तेथें । जलाचे सवेग ॥
सनाद तरंग । विलोकणें ॥ ३ ॥
निबिड छायेच्या । काननामधोनी ॥
मंद पावलांनीं । संचरणें ॥ ४ ॥
संचरणें तेथें । जेथें मानवाची ॥
नश्वर सत्तेची । वस्तू नाहीं ॥ ५ ॥
नाहीं पाय जेथें । लागला तयाचा ॥
लागलीया साचा । विरळाचि ॥ ६ ॥
ऐशिया वनाचे । देखावे पहाणें ॥
प्रवेश करणें । झाडीतोनी ॥ ७ ॥
झाडीतोनि जेथें । नाहीं पायवाट
चढणें अफाट । गिरीवरी ॥ ८ ॥
गिरीवरी जेथें । मृग वागडती ॥
तेथें स्वैरगती । विचरणें ॥ ९ ॥
धिप्पाड पहाड । भिंती ऐसे नीट ॥
वरी पाणलोट । लोटताती ॥ १० ॥
फेनिल प्रवाह । तयांचे पहाया ॥
वेंघणें त्या ठाया । एकलेंचि ॥ ११ ॥
नव्हे नव्हे हो हा । एकांताचा वास ॥
सृष्टिसहवास । समजावा ॥ १२ ॥



चं. ४

समजावा कीं हा । वनश्री सांगातीं ॥
चाललाहे प्रीति—। संवादचि ॥ १३ ॥

अथवा म्हणावा । सृष्टिसौंदर्याचा ॥
ठेवा गुप्त साचा । लाभलाहे ॥ १४ ॥

( २ )

परी जाणावा तो । एकांताचा वास ॥
तेथें आपणांस । कोणी नाहीं ॥ १५ ॥

गजबज जेथें । जनांची चालली ॥
झाली ठेलाठेली । चोहींकडे ॥ १६ ॥

बैसे कानटाळें । घाबरतो जीव ॥
चाले धांवा धांव । धनासाठीं ॥ १७ ॥

आपणही तेथें । शिणलेल्या संगें ॥
रखडोनी अंगें । कष्टताहों ॥ १८ ॥

नाहीं कोणी त्यांत । आपुल्या हिताचें ॥
किंवा हित ज्यांचें । करूं स्वयें ॥ १९ ॥

लक्ष्मीचे गुलाम । चोरिताति अंगें ॥
न देती प्रसंगें । साह्य कोणा ॥ २० ॥

खरा ममताळू । निज गोत्रजही ॥
आपणांस नाहीं । कोणी जेथें ॥ २१ ॥

लांगूल चालन । आपुल्या पुढारीं ॥
ज्यांहीं केलें भारी । स्वार्थासाठीं ॥ २२ ॥

सदा मागें मागें । आपुल्या फिरले ॥
आश्रया राहीले । आपुलीया ॥ २३ ॥

वेंगाडोनी तोंडें । प्रार्थना आपुली ॥
निशिदिनीं केली । ज्या धूर्तांनीं ॥ २४ ॥

त्यांतूनीहि कोणी । खिन्न होणें नाहीं ॥
काळें ओढिल्याही । आपणांतें ॥ २५ ॥

ऐशा ठायीं वास । एकांताचा साचा ॥
अनुभव याचा । सिद्ध आहे ॥ २६ ॥

**प्रकाशन**–सुविचारसमागम,
वर्ष २, अंक १२, एप्रिल १९००.

---

## घनाभिनंदन[1].



"जलदसमय एष प्राणिनां प्राणहेतुः"
—कालिदास.

( शिखरिणी. )

अहो आला आला ! नवजलद हा अंबरपथीं,
बसोनी वायूच्या अतिचपल-वेगोयुत रथीं;
पहा ! नानारंगी विकट धनु त्याचें विलसतें,
विजेची ती दोरी फिरफिरुनि झंकार करिते. १

महानादें त्याच्या सकलहि नभोमंडल कसें
दणाणोनी गेलें, झडुनि रणवाद्यें रण जसें;
उडे झंझावातें अपरिमित धूली दशदिशा,
तयानें त्या जैशा दिसति करिणी कोपविवशा. २

खळा दुष्काळाशीं करुनि घनघोराऽजि, घन हा
तया संहारूं ये जणु जमवुनी सैन्य-निवहा;
क्षणामाजीं त्यानें उदयगिरि काबीज करुनी,
नभोमध्य-प्रांतीं गडबड दिली कीं उडवुनी ! ३

समुद्राऐशी ही तुमुल चमु त्याची चहुंकडे
किती वेगें व्यापी गगन, लवही ठेवि नुघडें;

---

१ विक्रम संवत् १९५६ म्ह० इ. स. १८९९–१९०० सालीं गुजरात, काठेवाड, वगैरे प्रांतांत प्रलयकालासारखा महाभयंकर दुष्काळ पडला होता. तो त्या प्रांतीं 'छप्पनिया' म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्या अखेरीस पर्जन्यकाल आला, त्यावेळीं हें मेघांचें अभिनंदन केलें आहे.

प्रचंडा मार्तंडाप्रतिहि सहसा घेरुनि बळें
  तिमें त्याचें केलें हरण बहुधा तेज सगळें. ४
घनच्छायायोगें कितितरि चमत्कार घडला
  पहा ! कीं सृष्टीचा अवचित जणों नूर फिरला;
पदार्थांची कांती नयनसुभग श्यामल दिसे,
  तयांमध्यें कांहीं नवलपरिचा हर्ष विलसे ! ५
विझोनीयां आहे प्रखर खदिरांगारसम ते,
  किती आतां वाता-वरण तनुला हें सुखवितें !
जणों कीं वायूला जलदगुरुनें आज अपुली
  जगाच्या तापातें शमन करुं दीक्षाच दिधली. ६
घनाच्या ध्यानानें जग निजपणातें विसरलें,
  म्हणोनी तें भासे जलधरसम श्याम बनलें;
निवाराया आला जलद निज संताप म्हणुनी
  उडोनी ग्लानी ये सहजचि नवोत्साह भुवनीं. ७
दयासिंधो मेघा ! अघटित तुझा होय महिमा,
  नसे ठावा त्याचा कुठुनि वदवे तो मग अम्हां ?
तुझ्या छायामात्रें घडति जरि ह्या अद्भुत कृती,
  तरी वृष्टी होतां कृति मग घडेना कवण ती ! ८
विचारोनी पाहे जरि तव महौदार्य तरि, तो
  पती भूगोलाचा कृपणहि दरिद्रीच दिसतो;
तुझ्या श्रीमंतीचा किमपि मिळतां अंश नृपती
  जगामध्यें श्रीमान् म्हणुनि बहु डौलें मिरवती ! ९
धनाची धान्याची अवनिवरि होणें विपुलता,
  तसें सर्वांभूतीं कुशलहि निजोद्योगवशता,
मनःशांती, राष्ट्रोन्नति, सुख, समाधानहि जनीं,
  कृपेचीं हीं तूझ्या विलसति फळें भव्य भुवनीं. १०
बहू कां बोलावें ? सकलहि जगत्-जीवन घना !
  तुझ्या आधीनत्वें खचित असतें विश्वशरणा !

जगज्जेता, तोही जरि तव कृपापांग न मिळे,
तरी दीना मीनासमचि निरुपायें तळमळे ! ११

कृपा जेथें तूझी विलसत असे श्री जणु तिथें,
न ती जेथें ऐसें स्थळ दहनभूमीच गमतें;
असे ह्याचा घेणें अनुभवच कोणासहि जरी,
विलोकावी तेणें तरि भरतभू ह्या अवसरीं. १२

असो पाषाणानें हृदय मग त्याचें बनविलें,
स्थिती ही पाहोनी फुटतिल तया पाझर भले !
तुझ्या ऐसे मेघा असति जन जे आर्द्रहृदयी,
तयांते येईल द्रव मग न कां ह्याहि समयीं ? १३

कृपापारावारा ! तरि न लवही लाव अवधी,
अतां ओती ओती मधुमधुरसा तो जलनिधी,
पहा ! गेल्या साऱ्या सुकुनि सरसी आणि सरिता,
वियोगें भर्त्यांच्या झुरुनि झुरुनी जेविं वनिता. १४

जयांच्या पर्णांतें खुडुनिच बहू जीव जगले,
परी, आतां ज्यांच्यावरि चुकुनिही पान नुरलें,
वनांमाजीं ज्यांते रसरहित निष्पत्र बघुनी,
मुनी वाटे गेले खरतर तपानेंच सुकुनी; १५

अशा ह्या वृक्षांचे वनपवन विस्तार हलवी,
जणों त्या योगानें तरुगण असा भाव कळवी;
अगा मेघा ! ये ये, करि अमृतवृष्टी क्षितिवरी,
मृतप्रायां लोकां निववि जिववी तूं झडकरी. १६

असंख्यातें शेतें जणुं पडित भूमीच पडल्या,
नव्हे दैना त्यांनीं निज तुज बघोनी उघडल्या;
असंख्याता धेनू, वृषभ, महिषी, आदिकरुनी
पशू, जें राष्ट्राचें धन, निधन ने त्यांस हरुनी ! १७

तयांचे सांगाडे सडसडुनि वातावरण हें
महा दुर्गंधानें भरुनि जनतेला मच सहे.

किती अस्थी चर्में विकुनि परदेशीं दवडिलीं,
तरी जागोजागीं गिरिसम नवी रास पडली. १८

क्षुधेनें तृष्णेनें कळवळुनियां कर्षक किती,
परागंदा झाले त्यजुनि वतनें आणि घरटीं;
किती खेडीं गांवें विजन बनुनी तेविं दिसती
जशीं चैतन्याच्या विरहित शरीरेंच नुसतीं ! १९

किती अल्पें मोलें दिनभरि महाकष्ट करिती,
कदान्नानें तेव्हां किमपि जठराग्नी शमविती;
कितेकांहीं कांहीं तरि उदरगर्तेंत भरुनी
युगा ऐसे नेले दिवस नयनीं प्राण धरुनी ! २०

किती दारोदारीं क्षुधित फिरती थोर नगरीं,
परी त्या सर्वांचें पुरजन कसा पोषण करी ?
पती पत्नी टाकी, विकिति किति माता स्वतनुजां !
क्षुधा प्रेमाचाही खचित हरिते सर्व गमजा. २१

क्षुधा, तृष्णा, व्याधी, प्रखर रविचा ताप वरुनी
अनर्थांहीं ऐशा मरति बहु गेलेहि मरुनी;
तयायोगें आतां भरतवसुधा ही दिसतसे,
दवाग्निज्वालांहीं हुतवन विषादास्पद जसें ! २२

अशा दग्धारण्यामधिं अझुनि जे जीव जगती,
उदारा ! ते सारे निशिदिनिं तुझा ध्यास धरिती;
तयांतें सर्वांतें तशिच मजला जी दृढतरा
महोत्कंठा लागे किमपि कथितों ती जलधरा ! २३

( पृथ्वी. )

कदा नव जलें तुझीं वरसतील पृथ्वीप्रती ?
कदा नद-नद्यांतुनी उचमळोनि तीं धांवती ?
कदा तरि वनस्थली चमकतील पाचेपरी ?
जलार्द्र पवनें कदा डुलति रे तरू वल्लरी ? २४

सुतुंग गिरिच्या शिरीं सजल मेघमाला कदा
करोनि अवलंबना वरसतील धो धो सदा ?
कुडे, पळस, कंदली, विविध जातिच्या औषधी
तुवां सतत न्हाणितां हरितशा बघे मी कधीं ? २५

कड्यांवरुनियां उड्या धडधडां पयें टाकिती,
करोनि गुरुगर्जना निकट-देश नादाविती,
तुधापरि जलौघ ते मज पहावयातें कदा
उदंड मिळतील गा फिरुनियां उदारांबुदा ! २६

वना उपवनांतल्या भिजुनि भूमि वर्षाजलें
तयांवरुनि सांचती चहुंकडे कदा पल्वलें ?
यथेष्ट जल त्यांतलें पिउनि, पूर्ण आनंदुनी,
विनोदपर केधवां निघति दर्दुरांचे ध्वनी ? २७

प्रसन्न तरु-कोटरीं कुणि तदीय शाखांवरी
विहंग जणु न्हाउनी बसति हर्षुनी अंतरीं;
पिसें करिति चंचुनीं विमल, सुस्वरें कूजती,
असे खग, असे तरू, मज पुन्हां कदा दीसती ? २८

कदा बकुल, चंपही फुलुनि केतकी, मोगरे,
गुलाब, निशिगंध, तद्विविध गंध तो विस्तरे ?
प्रसन्न कमलें कदा निज पराग तीं गाळिती ?
कदा मधुप तन्मधू लुटुनि घ्यावया धांवती ? २९

कदा बहर येउनी विपुल पारिजातांवरी
तदीय मधु गंध तो दरवळेल रे अंबरीं ?
तदीय सुमनास्तरें हरित भूमि ते झांकतां
फुलें टिपुनि घ्यावया निघति केधवां योषिता ? ३०

नवीन तृण खाउनी, तव नवामृत प्राशुनी,
रवंथ करिती सुखें हिरवळीवरी बैसुनी;
सुतुंदिलवपू असे वृषभ, धेनुहि वत्सला,
फिरोनि मिळतील गा कधिं तरी बघाया मला ? ३१

अकिंचन कृषीवलां मिळुनियां तगाई-धनें,
तसें वृषभ, बीज, हीं कृषि करावया साधनें,
फिरोनि इरलीं शिरीं गरम घोंगड्या घालुनी
स्वकर्मरत ते असे कधिं बघेन शेतांतुनी ? १२

यदा मग कमोद ते लवुनि आपुल्या लोंगरें
प्रमोदकर मानसा वितरितील आमोद रे,
अनेकविध शस्य तें चहुंकडेहि जोमावुनी
तयें नयनरम्य ही फिरुनि हो यदा मेदिनी, १३

फिटेल अमुची तदा सकळ पांग, जी संप्रती
अम्हांस बहु वृश्चिकासदृश दंशुनी जाचिती;
स्वबंधुजन सर्व हा प्रगतिच्या पथा लागुनी
स्मरेल सुख सेवितां त्वदुपकार रात्रंदिनीं. १४

तरी, अयि दयानिधे जलधरा ! अता सत्वरीं
सुखप्रद अम्हांवरी सतत साउली तूं करीं;
करीं अमृतवृष्टि तूं लवकरी धरित्रीवरी,
तुझ्याविण कुणी नसे इतर, जो अम्हां उद्धरी. १५

मयूर जयघोष हे बघ तुझा करूं लागले !
अनाथ निज लोचनीं स्रवति शीतलाश्रू-जलें !
समस्त जन चातकापरि घना तुला पाहतो !
उदीरितजयस्वनें गगनमंडपीं वाहतो ! १६

प्रकाशन.—सयाजीविजय, व तत्कालीन
( ता. १० जून १९००, )
इंदुप्रकाश व करमणूक.

---

# शरद्वैभव.



गगन हें विमला सलिलापरी,
सलिलही विलसे गगनापरी;
जणुं शरद् ऋतुनें सम-मोलसे.
बनवले नवलें नव आरसे. १
सुभग शुभ्र नभांतुनि तारका,
वसुमतीवरि शेवति-मालिका,
विलसते सुरसिंधु नभोदरीं,
विमलिनी नलिनीहि महीवरी. २
विविध धान्य पिकोनि वसुंधरा;
सुवसनें सजली जणुं सुंदरा !
कुलवधूसम ह्या कुसुमान्विता
फलवती लवती विनयें लता ३
रुचिर दाडिम, जांब, सिताफळें,
कनक सुंदरशीं कदली-फळें,
अमृतपूरित नारळ, शाहळें,
पपनसें, पनसें, नव पोफळें. ४
नयनरंजक रंग खुले वरी,
सुरस ज्यांतिल दाह तृषा हरी;
जनमनोहर यापरि संतरे
पिकवले कवले ऋतुसुंदरें. ५
चतुर सुंदरशा नगरांगना
लखलखीत करोनि गृहांगणां,
वरि मनोहर रांगुळि काढिती
कुवलया-वलयादि शुभाकृती, ६
विणुनि मोळे नवा भुजगापरी,
ठळक दीपक ठेवुनि त्यावरी,

---

१ एका जातीचें गवत.

करिति गोवळि गोकुल-आरती,
नव-सुर्ती वसु ती निज कल्पिती. ७

करवटी करिं देउनि गोमटी,
ढकलुनी ऋणकोप्रति संकटीं,
करिति हे धनको धनपूजना,
धनपरा न परार्थ[1] धनाविना ! ८

झळकतात नभांतुनि काजवे,
क्षितिवरीहि असंख्य तसे दिवे.
सुरभि-वात नभांतुनि खेळती,
परिमर्ली रमली जनता किती ! ९

अरगजादि सुगंधि विलेपनें
प्रियजनांप्रति लावुनि हौशिनें,
प्रणयदृष्टिसवें जल उष्ण तें
अवनता वनिताततिं ओतिते. १०

पडति केतु नभांतुनि भूवरी,
उडति बाण सरासर अंबरीं,
अनलखेलन कीं जणु चाललें
सुर-जनीं रजनीस कुतूहलें. ११

स्वसदनीं भगिनी शुभलक्षणा
करिति बंधुसि आणुनि 'औक्षणा,'
करुनि 'औक्षण' वाटतसे सती
निज निरंजन भावचि दाविती ! १२

प्रकाशन—मनोरंजन.
वर्ष ६, नोव्हेंबर १९००.

---

१ पर अधिक अर्थ=परार्थ म्हणजे श्रेष्ठ पुरुषार्थ.

# माधवनिधन[1].



" O good gray head which all men knew,
O voice from which their omens all men drew,
O iron nerve to true occasion true,
O fallen at length, that tower of strength,
Which stood four-square to the winds that blew."
—Tennyson.

अहो ! दिन असोनि हा विबुधसूर्य कां लोपला ?
अहो ! चहुंकडे तमःपट असा कसा व्यापला ?
अहो ! विकट कंदरापरि मुखास वासोनि, हा !
अकांड करि तांडवा असुर होय कीं काळ हा ? १
विडंबुनि जगास तो भयद हास कां हांसतो ?
उगारुनिहि फांस तो कवणत्या जना फांसतो ?
अहा ! समजलेंचि, तो पतन होय मुंबापुरीं
तया सुनयपालका विबुध माधवाच्या वरी ! २
अहो ! हृदय भेदलें, बधिर कर्ण हे जाहले,
अहो ! शिथिल हो तनू, मन विमोह कीं पावलें.
अहो ! नयन ढाळिती कढत अश्रुधारा महा,
अहो ! भरतभूवरी पवि-निपात हो काय हा ? ३
जनांस नय दे सदा सरल रामशास्त्री जसा,
तया अदय काळ हा अनय दे कसा हो असा !
स्वदेश-शिवसाधनीं जणुं मृकंडुचा नंदन,
अशास धजला कसा यम करावया बंधन ? ४

---

१ कै० वा० न्यायमूर्तीच्या देहावसानाची खबर येथें श्रीसयाजीविजय छापखान्यांत तारेनें येतांच, ही कविता फार थोड्या अवकाशांत रचून विजयाच्या अंकांत सर्वांच्या आधीं प्रसिद्ध करण्यांत आली होती. न्या० मू० संबंधीं इतर सर्व शोकात्मक लेख ह्या मागून प्रगट झाले. अर्थात् ह्या विलापिकेस प्रासंगिक मोल आलें होतें.

महाधम यमा ! क्षमा तुजसि का कशाची नसे ?
हिरेहि जणुं कोळसे म्हणुनि जाळिसी तूं कसे !
अदंड्य जन दंडितो मद उदंड जो दावुनी,
न 'दंडधर' षंढ तो मज गमे म्हणावा जनीं. ५

जयें सकल जन्मही दृढ सरस्वती सेविली,
जयें न तदुपासनीं निज तनुक्षिती ठेविली,
जयें सुरगुरूपरी सरस भाषणें बोलुनी
अनेक समयीं दिले बुधसमाज आंदोलुनी; ६

पडोनि मतभेद जो प्रबल केसरी संगतीं
लढे प्रणयलीलया, बुध जया रणीं रंगती,
स्वनंदनवनास तो परततां दुजा केसरी,
कुणासह बरोबरी करिल हो अतां केसरी ! ७

स्वबांधवसुधारणा-पथ जयें सदा दाविले,
तयांस 'परिषद्' मिषें प्रणयबंधनीं गोविलें,
सुधारक-जनाग्रणी वश परास तो झालिया,
पुन्हां अवलिया तसा कवण ये पुढें व्हावया ! ८

अनाथ अबला, तसे अमित शिष्यही दीनसे,
निजाश्रय उदार जो किमपि त्यांजला देतसे,
अनेकविध पुस्तकें, सदपयुक्त संस्था तशा,
जणों सुतसुताचि जो धरि करांत सप्रेमशा; ९

स्वकीय मधुरा गिरा चलित विश्वविद्यालयीं
करा ! म्हणुनि गर्जला बुधजनांत जो अक्षयीं,
असा तनुमनें धनें प्रगतिला स्वभाषेचिया
असे सतत वाहिला, मरण हाय ! आलें तया. १०

अहो ! खळबळोनि ये हृदय, कांपते लेखणी,
गळे तरि खळे न हें जळ मदीय नेत्रांतुनी,
लिहोत लिहिणार ते बहुत ह्यावरी चांगलें,
अजाण जन बोललों किमपि जें मनीं वागलें. ११

परंतु, न सुचे मला अधिक ह्याहुनी संप्रति,
असे विनति मात्र जो सकल शक्तिमान् त्याप्रतिः—
जसें गुणनिधान भो प्रभु ! हरोनि नेलेंस तें,
तसें परत आणुनी त्वरित देइं तूं आम्हुतें. १२

भरतभुवनीं राहोनी जो स्वकीयगुणें तिला
सुरभुवनिंची शोभा द्याया सदैव झटे भला,
गुणिजन असा कां नेलासी प्रभो गुणसागरा !
सुरतरुपरी भूलोकीं तो असो शशिशेखरा ! १३

प्रकाशन—सयाजीविजय,
सुविचारसमागम,
वर्ष ३, अंक २, फेब्रुवारी, १९०१.

---

## निद्रा.



वसंतवाताहुनी सौम्यतर ऐसें काय असें तें ?
ताप तनूचा निववुनि जें दे नव उत्साह तियेतें; १
क्षणचि बसुनि जो विकसित कमलीं होउनि धुंद मरंदें,
कुंजाकुंजांतुनि गुंजारव करित फिरे आनंदें, २
त्या भृंगाच्या गुणगुणण्याहुनि शामक फार मनाला,
असा असे सदुपाय काय हो ठावा दुजा जनांला ? ३
पाचेच्यापरि हिरवळिवरि जो फुलताहे विजनांत,
अशा गुलाबाहुनी काय तें शांत नितांत जनांत ? ४
गिरिकंदर जे वनस्पतींनीं आच्छादुनियां गेले,
आरोग्याचें निधान विधिनें त्यांहूनि काय केलें ? ५
भारद्वाजगृहाहुनि भारी गुप्त असें तें काय ?
त्या प्रिय सखिच्या मुखकमलाहुनि उज्ज्वल तेंही काय ? ६

स्वप्नपूर्णही बाणकथेहुनि सुमधुर काय दुजें तें ?
निद्रादेवी ! गे, तुजवांचुनि काय असावें भलतें ? ७

प्रकाशन—मनोरंजन,
सप्टेंबर १९०१.

---

## " काळ तर मोठा कठिण आला ! "



[ सन १८९६-९७ सालीं दक्षिणेंत जो भयंकर दुष्काळ पडला होता, त्यावेळीं धायगुडे 'नामक एका दुष्काळग्रस्त कुटुंबाचें हें हृदयद्रावक गृहचित्र कै. वा. हरिभाऊ आपटे यांनीं करमणुकींतून वर दिलेल्या शिरोलेखानें प्रसिद्ध केलें होतें. तें पाहून कवीस जे विचार सुचले ते हेः— ]

कालचि नव वर्षाची आली मम करमणूक हातांत;
न मनोरंजन, परि ते करिते सुहृदय विदीर्ण हा तात ! १

दुष्काळचरित चित्रहि पाहुनि पोटांत काल कालवलें !
नवलें म्हणाल बहुधा पूर्वी मन्मन असें न कां द्रवलें ? २

ह्याचें प्रत्युत्तर कीं, कालकथा कालवरि जरी विविधा
तरि दूरूनि परिसिल्या, तेणें ऊरहि न जाहला द्विविधा. ३

परि ह्या करमणुकीचें पारायण आणि अनुविचारणही
करितां मजपुढतीं ये दुष्काळग्रस्त सर्व 'दक्षिण' ही. ४

कवि आणि चित्रकर्त्ता भाऊ भाऊ म्हणोनि जन म्हणती;
परि ह्या तद्वचनाची अयथार्थोक्तींत होतसे गणती. ५

तें बंधुद्वय नोहे अभिन्नशी व्यक्ति एक मात्र असे;
कारण, दोघांकरवीं कार्य घडे तेंहि भिन्न भिन्न नसे. ६

थोडा विचार करितां मी म्हणतों हें खरें ठरेल. पहा,
कवि चित्रकार कार्यें संकीर्ण किती परस्परांत अहा ! ७

एकचि अनेक अथवा वस्तूंचें काव्यबद्ध वर्णन तें
त्या वस्तूंचें सुंदर चित्र मनोगतचि वाचकां गमतें. ८

तैसेंच एक अथवा बहु वस्तूंचें सुचित्र तें साचें
सद्वर्णयुक्त वर्णन चित्रकराच्या सुकल्पना ह्यांचें. ९
श्रीमद्वाल्मीकींनीं कोणाच्या हृत्पटीं न रंगविलीं
श्रीरामादि सुचित्रें केवळ चरितें लिहोनि तालदलीं ? १०
अथवा रविवर्मांनीं ' कुञ्जवने राधिका ' पटावरतीं
काढुनि जयदेवाची लिहिली न म्हणेल कोण मधुरोक्ति ! ११
ऐसे प्रतिकार्यामधिं दोघांचे कार्यधर्म पूर्णपणें
जैं एकरूप दिसती त्या कार्यांलागिं काय हो वदणें ? १२
दोहीं कार्यांमध्यें जेथें दिसतो अभेद उघड असा,
तत्कारणांतही मग तेथें मानूं अभेद मी न कसा ? १३
परिणामसदृशतेस्तव कविचित्रकरैक्य म्हणुनि मी म्हणतों;
उभयां एकचि मानुनि बहुमानुनि उभयतांसही नमितों ! १४
ही कृति तुमची किंवा रविवर्मांची असा मला भ्रम हो !
जरि ह्यास काव्य म्हणतों तरि दिसतें मूर्तिमंत चित्रचि हो ! १५
भो लेखनकुशल ! तुम्ही ' धायगुड्यां ' वरिल ज्या प्रसंगाचें
जें जें वर्णन केलें, हृदयद्रावक असेहि तें साचें ! १६
पाषाणही विरेलचि पाण्यांतिल ढेंकुळापरी तेणें.
द्रवलों सहृदय वाचक आम्ही तरि नवल त्यांत मी नेणें. १७
ती साद्यंत अकृत्रिम, ती हृदयंगमहि, ती यथास्थितशी,
तुमची भाषासरणी कोणालाही न रंजवील कशी ? १८
स्वद्विषयप्रतिपादन, शिक्षणशैली, तशीच मार्मिकता,
किति म्यां वाखाणावी ? हरिभाऊ ! थक्क जाहलों आतां. १९
ऐसे शुद्ध प्राकृत-भाषालेखक न फार आढळती
थोडे असोनि, त्यांनां तरि " पण लक्ष्यांत कोणहो घेती ? " २०
स्तुतिपाठक मी नोहे, धरुनि स्तुतिहेतु हें न बडबडतों;
परि सद्गुणमधुलोलुप भृंग भवत्पादसारसीं जडतों ! २१
ही करमणूक वाचुनि जे सहजोद्गार मन्मुखीं आले,
अनिवार होउनी ते आर्यारूपें बरेच वाहवले ! २२

म्हणुनि प्रमाद येथें जो जो घडला असेल मजकडुनी,
तत् तत् क्षमस्व विद्वन् ! निज लेखें नित्य भेट कडकडुनी ! २१

प्रकाशन—करमणूक,
वर्ष १२, अंक ३०, नोव्हेंबर १९०१.

# कवीची दिवाळी.

—:०:—

चिंता दुर्दिन लयास जाउनि विमल मनोनभ झालें,
उल्हासाचा विशुद्ध वायू स्वैर तयांतुनि चाले; १
मतिवसुमतितें शारदवैभव देई प्रसन्नतेतें,
विविध विषय हीं नव धान्यांचीं विलसति तीवरि शेतें; २
विचाररूपी धवल जलांचे प्रवाह वाहति वेगें,
मनोगगन हें बिंबुनि त्यामधिं धांवे त्यांच्या संगें. ३
स्फूर्ति—दिवाळी आली दयिते कविते ! तयार होई,
सुकाव्य—पक्वान्नांतें करुनी दाखवि तूं चतुराई; ४
लावुनि माझ्या जातिस्नेहा करि तूं अभ्यंगातें,
तेणें येवो सुखकर ऐसें मार्दव तव अंगातें. ५
तरंगरूपी उंचा शालू देतों तुज नेसाया,
परोपरीचे अलंकारही रूप तुझें खुलवाया; ६
'सौभाग्यालंकार' तुझ्यास्तव केला मी प्रेमाचा,
हृदयकरंड्यामधिल रसें तो आहे ओला साचा. ७
त्याचा नमुना दावी रसिकां लावुनियां तो भाळीं,
दृष्ट न व्हाया 'तीट' करी तूं मम दोषांची काळी. ८
स्वदेशभवनीं यशोदीप ते चोहिंकडे उजळावे,
सहज तयानें जनदुःखांचें दाट तिमिर निरसावें. ९
मानधनाचा धनलोभी मी घेऊनि त्या धनातें,
पूजायातें बसतां कविते ! दे मज साहित्यातें; १०

सहृदय ऐसे स्वदेशबंधू सादर बोलावोनी,
नानाकृतिच्या पक्वान्नांची दे त्यास मेजवानी. ११
तयांवरोनी सुगुणसुंदरी ! सुवर्ण तव ओंवाळीं,
ओवाळणि तत्संतोषाची घ्यावी, न तूं निराळी. १२
ह्या रीतीनें करीं साजरी ' कविची दिपवाळी ' तूं
तव दयिताचा दयिते कविते ! याविण न दुजा हेतू. १३

प्रकाशन—मनोरंजन, करमणूक.
नोव्हेंबर—डिसेंबर. १९०१.

---

## गुणसीमा भीमा.



Sleep, little baby, sleep !
Not in thy cradle bed,
Not on thy mother's breast
Hence forth shall be thy rest,
But with the quiet dead !

*Mrs. Southey.*

उठुनि लहरी उदकास ती तयांत
लीन होते विलसोनि निमेषांत;
क्षुल्लक वायूची सुखवुनी तनूतें
स्वैरगतिनें केव्हांच निघुनि जाते; १
मेघमालेवरि दिव्य चंचला ही
क्षणामध्यें चमकोनि दिसत नाहीं;
तशिच माझी नंदिनी सुगुणसीमा
निमाली ती मधुमधुरगिरा भीमा ! २
विषादानें घेरिलें मन्मनाला,
कंठ दाटोनी करुणभरें आला;
तीव्र लागे निश्वास वहायाला,
अश्रुधारा लोटल्या लोचनांला. ३

## चंद्रिका

कुरलकेशी कुवलयानना माझी,
कोमलांगी कोकिलस्वना माझी,
काव्यकौतूहलमूर्ति सुता माझी,
यमा अधमा ! का हरिसि तिला आजी ? ४

स्तन्यपानाची प्रबल तृषा जीची
अझुनि पुरती भागली नसे साची;
बाललीला करण्यास जिनें केला
नवारंभचि हरिलेंस का तियेला ! ५

जिनें वीणेसम करुनि कलरवातें,
त्यजुनि एकातें, अन्यजनांकातें
कौतुकानें सदनांत संचरावें,
सहज लीलेनें स्वजन हांसवावे; ६

मंजुवचनें सकलांस म्हणुनि " या या–"
हस्तपल्लव लागोनि हालवाया,
तिनें कोणाही काय गौरवावें !
नसति बाळांनां स्वपरभाव ठावे. ७

हाव माझ्यासह चहा प्यावयाची,
हाव चावियला विडा खावयाची,
हाव मामाच्या घरीं जावयाची,
हाव गेली जल-केलि करायाची ! ८

वस्त्र घेउनि भलतेंच विनोदानें,
स्वमुख तेणें झांकोनि राजसेनें,
रम्य शब्दें गुरुजनां भीववावें !
बघुनि बुरख्यांतुनि खदखदां हंसावें ! ९

तदा कोमलसे दंत दोन चार
पुढिल तीचे ते दिसति मजेदार !
ह्याच दंतांहीं एकदा विदेही
मोहपाशीं टाकिला जनक तोही. १०

अहो दंतांनों ! अंत कसा केला
कष्ट दुःसह देवोनि बालिकेला !
कुंदकलिकांसम म्हणविती जगीं जे
शील दारुण हें त्या न तुम्हां साजे ! ११
दोष अथवा तूमचा काय आहे ?
असे विधिची व्यवहारविषमता हे;
तिच्या योगें सुकुमार सुमनमाला
क्वचित् कारण हो प्राण हरायाला ! १२
विमल जातीच्या लतेवरी एक
कळी यावी जणुं कोंवळी सुरेख;
तशी माझ्या कुलवती सतीला जे
प्रथमतनया गुणवती बहू साजे. १३
मनोरूपी जो आरसा तियेचा
असे चिंतामलहीन शुद्ध साचा;
म्हणुनि मुख जें प्रतिबिंब तयाचें, तें
तिच्या हासें भासेच धवल मातें. १४
बालिका ती निज जननिसभोंवार
खेळुनीयां दाखवी हर्ष फार;
तदा भासे सुरधेनुच्या सभोंतीं
जणों बागडते चपल नंदिनी ती. १५
तिची माता घे जेविं मुके तीचे,
तेविं तीही घे तिच्या माउलीचे;
बघुनि वाटे, कीं सृष्टिच्याच नेमें
प्रेमकृतिची प्रतिकृतिहि घडे प्रेमें. १६
अशा लीला ज्या सहजरम्य त्यांहीं
अम्हां घालुनि अनिवार मोह कांहीं,
वीज लवते तितुक्याच अल्प काळीं
बालिका ती विलसोनि गुप्त झाली. १७

* * *

सुतामाते ! माझिये प्रिये जाये !
तुझ्या नयनांतें अश्रुपूर कां ये ?
रुदन करिसी का स्मरुनि तुझी भीमा ?
असे आवडती जीहि सुगुणसीमा. १८

विगत गोष्टीचा शोक तो कशाला ?
वृथा आतां तूं न करिं रोदनाला;
करीं अथवा,—कीं रुदन धुवुनि शोका
पात्र करितें मन घ्यावया विवेका. १९

भार जीचा उदरांत वाहियेला,
कडे-खांद्या-वरि फिरविलें जियेला,
कोडकौतुक सप्रेम जिचें केलें,
गीत गाउनि निद्रेस जिला नेलें; २०

जिच्या तनुनें नलिनीस लाजवावें,
हाय ! तिजला का वन्हिला वहावें !
हृदयभेदक हें कर्म खचित आहे,
केविं त्याची कल्पना तुला साहे ? २१

वदन जीचें अव्याज मनोहारी
वदे मंजुल बोबड्या वचनहारी,
झरा जैसा अडखळत वाहतां तो
मधुर नादाची सतततती देतो; २२

असा मोहक वचनौघनाद साचा
श्रवण करितां त्या वदननिर्झराचा,
काय निर्झर तो—नाद तोहि झाला
स्वप्न नयनांला,—भासही श्रुतींला ?! २३

कंठ वेष्टित जणु मृदुल मृणालांनीं,
असें आलिंगन तिचें अनुभवोनी,
तुवां झोपेमधिं दचकुनि उठावें,
स्वप्न—खोटें,—जाणोनि खिन्न व्हावें. २४

अहा ! आठवणी माय-हृदयसंगें
सदा राहुनि ह्या करिति तिला जागें;
पुढिल दुःखांमधिं सुखांमधीं त्यांची
बनुनि जाते परि सरूपता साची. २५

प्रिये ! तनयावत्सले ! अयि सुशीले !
दुःख होइल हें सुखविलीन कालें;
खेददायक ह्या भवपथीं असें तो
काल विस्मयकर शमन मना देतो. २६

निंद्य कर्माचा डाग जया नाहीं,
नाहिं लिंपियलें नीच वासनांहीं,
असा होता अति विमल जीव तीचा,
कमलिं हिमकण तो जसा प्रभातींचा. २७

क्षणिक हिरकणिचा दाखवून भास,
जेविं हिमकण तो मिळतसे नभास,
तेविं रविच्या करिं करुनि जीव लीन,
गेलि नंदनवानें नंदिनी कुलीन. २८

तेज रविचें मिळतांच शशिकलेला,
जेविं पावे ती दिव्य देहतेला,
देवदेवाच्या तेविं कृपाऽपांगें
पावली ती तनुजाहि दिव्य अंगें. २९

तिथें सेवुनि मग मधुर सुधाधारा,
देवगंगेवरि करुनियां विहारा,
सुरतरूच्या मधुगंधि आसमंतीं
पहुडलीसे निज कुमरि कुंददंती. ३०

व्याधि आधीचें नाहीं भय तयेतें,
देवनिद्रा ती तेथ सुखें घेते;
जेविं कलिका वासंत गुलाबाची,
असे मीलित निज दलांमधें साची. ३१

विहित कर्मे येथील करुनि सारीं,
सून–सूनू संसारसूत्रधारी
करुनि, जाशिल सौभाग्यवैभवानें
देवसदनीं तूं यदा तदाज्ञेनें; ३२
मनीं मानुनि आनंद तदा फार,
गुंफुनीयां बहु दिव्य सुमनहार,
देवदूतांसह मोक्षपदद्वारीं
तुझें स्वागत ती करिल कविकुमारी. ३३

प्रकाशन—मनोरंजन,
ता, १ एप्रिल १९०२.

---

## अमरत्व.

—❀—

" Behold ! the Child of Life and Death
Is Immortality." *E. P. Butler.*

जीवाजिनें वरियलें मृति-नोवरीतें
हें सत्य सत्य कळलें जंव मन्मतीतें,
चिंतानलें अतनु दाह तनूंत केला,
माथा तदा करतलावरि टेंकियेला. १
आत्म्यास आत्मगत खेदभरें म्हणालों:–
" स्वामिन् ! विनष्टचि निरंतर मी जहालों !"
उद्गार हा परिसुनी मम देहधारी
देवोनि धीर वदला मज निर्विकारी. २
रे ! श्वास एकहि फुका दवडीं न शोकें;
तेणें विनाश न तुला समजे विवेकें.
जीवाजि आणि मृति नामक दंपतीतें
होईल सत्य अमरत्व अपत्य कीं तें ! ३.

प्रकाशन—करमणूक,
वर्ष १२, अंक ९, ऑगस्ट, १९०२.

---

# पृथ्वीछंद.



किती दिवस ऐकतों प्रभुवरा ! तुम्ही येतसां,
तसा सकळ हा असे जन कसा उतावीळसा;
भवद्वदनदर्शनीं निशीदिनीं धरी लालसा
चकोरगण चंद्रमा-चिरनिरीक्षणीं कीं जसा. १
प्रसन्न मुख आज हें बघति सर्व डोळेभरी,
प्रमोदलहरी महा उठति तन्मनःसागरीं.
अहो ! नृप तुम्हांपरी असति चार जे भूवरी,
जनांस दिन कंठणें बघुनि त्यांस कैसे तरी. २
न संप्रति उरे दुजें हृदयशांतिचें साधन.
तुम्हीच तरि काय तें सकल आमुचें हो धन.
करो म्हणुनि शक्तिमान् प्रभु तुम्हां चिरंजीव तो !
असेच सकल प्रजा-जनहि तत्पदीं याचितो. ३
अलभ्य पदलाभ की खचित ह्या स्थला लाभला !
भला स्मरणयोग्य हा सुदिन आजचा शोभला !
अझुनि चिरबंधुता उभयही कुलीं जागते,
बघोनि मन भावडें धरुनि आस आनंदतें ! ४
करो प्रणय साम्य हा, सतत शुक्रचंद्रासवें,
प्रकाशरविसें नटो चरित एकतावैभवें;
समुच्चयचि मूर्तिमान् प्रबल शक्ति हें गाजतें
महद्वचन जाणते विसरतील का आज तें ? ५
जिनें गतशतद्वयीं भरतखंड आंदोळलें,
असंख्य अरि पोळले, रुधिर-कर्दमीं लोळले;
यशोध्वज उभारिले, अटकपार ते सारिले,
स्वधर्म-जन तारिले, दुरित दुःखही वारिलें. ६

---

* ही कविता कै० वा० श्री० सरकार अलीजाबहादर माधवराव शिंदे ह्यांचें आगमन बडोदें येथें झालें असतां त्या स्फूर्तिदायक प्रसंगास उद्देशून केली होती; व ती त्यावेळच्या सयाजीविजयाच्या जादा व चालू अंकांतूनही प्रसिद्ध करण्यांत आली होती.

अशी प्रबल शक्ति ती म्हणति जीस एकी जनीं,
सुवीरसुतहो ! भजा समजुनी कुलस्वामिनी !
तुम्हांत मधुमाधवां-सम सधर्मताही वसो !
असोनि नयजागृती जन तुम्हांवरी ना रुसो ! ७
" सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो,
कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो "
मती जनहितीं जडो, खनि समृद्धिची सांपडो,
गदारि न कधीं नडो, हरिपदीं रती आवडो ! ८

प्रकाशन—सजायीविजय, करमणूक,
वर्ष १३, ८ ऑगस्ट १९०३.

---

## श्रीयुवराजांचा प्रतिहारि.



हे श्रीमन् युवराज ! संप्रति तुम्हां श्रीशंकराच्या कृपें
केला संसृतिचा प्रवेश उघडा श्रीमत्सयाजी नृपें;
जावें ह्या भवरूप भव्य भवनीं आतां कुलश्री सवें,
हा काव्यप्रतिहारि[1] दाविल तुम्हां सारेंच कीं तें नवें ! १
हा सोपान, जयास धर्म म्हणती, यावें चढोनी तया,
श्रद्धा, भक्ति, कराश्रयद्वयचि हें दोघांस रक्षावया;
कर्मे,–एक दुज्याहुनी वरगुणी—ह्या पायऱ्या त्याजला,
मर्यादा—मखमालिचाच जडिला ज्यांनां रुजामा[2] भला. २
चाला आपण त्यावरोनि, न तरी या पायऱ्या लागती,
आहे कोमल त्यांत ही सहचरी आयास पावेल ती.
ही येथें गुणवत्समागममिषें नानापरी दालनें,
दोघांतें उपभोग्य योग्य असती त्यांतूनि विश्रामणें. ३
हा येथें जनरोष—तोष दुसरा संगें फवारा असे,
स्नानाचें जल उष्ण, शीत हितसें दूज्यांतुनी येतसे;

---

१ मार्ग दाखविणारा. २ कठडा.

लोकस्नेह सुगंधि तैल, तनुला लावा रुचे तें जरी,
साबू ज्ञानचि, पारदर्शक ! पहा, मालिन्य हा संहरी. ४
हा लोकादर दिव्य वेश तुमचा आहे, करा धारण;
घाला सद्गुण हें जवाहिर अहो ! मोलें असाधारण !
हें नम्रत्व जगांत उत्तम असे देशीच केशांजनें,
सारासारविचारणा–फणि, करा ह्यांनीं शिरोमंडन. ५

लोकांचें मत आरसा बिलवरी त्यांत स्वरूपें पहा,
तेथें आपण फार सुंदर दिसूं, ऐसे नटोनी रहा;
जे जे दुर्जन, दुर्गुणी समजुनी जोडेच ते वापरा,
नाना उच्चविचार निर्मल हवा, ती घेत दोघें फिरा. ६
पक्वान्नें तुमचीं न होत दुसरीं, जीं पुस्तकें चांगलीं,
तीं दोघेंहि यथेच्छ सेवन करा बैसोनि एके स्थळीं;
देणें घांस परस्परांस रुचले, द्या ते तरी त्यांतुनी;
हीं आहेत कलामिषें शरबतें, व्हा शांत तीं प्राशुनी. ७

जे दुःखार्त्त तदीय दुःख हरणें, घ्यावा निजाराम हा,
पंखा सज्जनधन्यवाद मग तो चाले स्वतंत्रें पहा !
जेणें होय निजप्रजाहित खरें युक्ति अशा योजणें,
जाणाव्या गुजगोष्टि ह्याच तुमच्या; दूजें वृथा जल्पणें. ८
बाहेरील सुधारणा धरुनि ती आणा स्वराज्यामधीं,
साधावी युवराज ! योग्य मृगया ही धूर्ततेनें कधीं;
तेजी ये क्रयविक्रयास असल्या संस्थांस संस्थापिणें,
आहे केवळ हेंच सत्य तुमचें चेंडूफळी खेळणें. ९

केव्हां आवडतें तुम्हांस करणें सारथ्य, व्हा सारथी;
ते कोठें परि ? राजकारण–रथीं, जेथें सयाजी रथी;
नेती जे अधिकारिरथ्य रथ तो पथ्यावरी त्यांप्रती
लावावेहि न वाक्प्रतोद, अथवा आणी अविश्वास ती. १०

---

१ पोमेटम. २ रथाचे घोडे.

दोचाकीं[1] जणु लोक-राज-हित ही गाडी, बसा तीवरी,
तीतें चालविण्यांत जिंकुनि महा-राजांस[2] घ्या सत्वरी;
नेमानें निज लक्ष्यभेद करणें, ही गोललीला[3] करा,
सायंभोजन नान्य भारतकथा, अत्यल्पही स्वीकरा. ११
विद्युद्दीप सुनीतिचे झळकती त्यांच्या प्रकाशांतुनी,
निष्ठारूप सुखासनीं प्रियजना-संगें सुखें बैसुनी,
घेवोनी दुरबीन, मौज सहजीं तारागणाची पहा,
ती दावील विशालविश्वजनिता कोणी असे देव हा. १२
त्याचें राज्य, तदीय वैभव अहो ! सत्ता, तशी संपदा,
ही आहे अपुल्याहुनी किति किती मोठी बघा एकदा.
श्रीकृष्णें विजयास दाखवुनि हें–हें विश्वरूप स्वयें,
त्याचा सर्वहि गर्व शीघ्र हरिला; कांपे तदा तो भयें. १३
देवाचें भय मानसीं उपजतां ज्ञानास आरंभितें,
ज्ञानारंभ सुकर्म मात्र घडवी सत्कर्म दे पुण्य तें;
पुण्यें तेज चढे, अहो ! चळचळां तेजें रिपू कांपती,
सर्वा कारण देवभीतिच असे, जाणोनि ठेवाच ती. १४
आहे सर्व समुन्नतीस समजा तारुण्य हें साधन,
किंवा ये अमरत्वही मिळवितां त्यानें असें तें धन.
आहे चंचल चंचलेसम परी त्या यौवनाची गति,
तो साधोनि मुहूर्त, त्यांत मिळवा वाटेल ती उन्नति. १५
करो सकल शक्तिमान् प्रभु तुम्हां चिरंजीव तो !
वधूस वितरो दहा[4] वरगुणी चिरंजीव तो !
सयाजि नृपतीस या अमित देउ सामंत तो !
तदीय 'भगवा ध्वज' स्थिर असो रवी होय तों ! १६

**प्रकाशन**—" लग्नविधी व सोहळे"
स्वतंत्र पुस्तक; सयाजीविजयवृत्तपत्र.
१९०४.

---

१ बायसेकल. २ इच्छेत्सर्वत्र विजयं पुत्रादिच्छेत्पराजयम् । ३ बिलियर्ड-सूचा खेळ. ४ " दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि "। श्रुतिः

# एकी.

—:०:—

झालें वियुक्त जरि फोलहि तंडुलाचें
येती न अंकुर तयास कधींच साचे;
दुर्वाह्य भूधरशिला, परि चूर्ण होते
वाहे तदा कुसुमरेणुसमान वातें. १
होतां सुमिश्रित न रंग खरे खरे ते
सादृश्य दृश्य तनुचें न पटास येतें;
बेसूर होय सहजीं जरि एक तार
मर्मज्ञरंजन तरी न करी सतार. २
राष्ट्रें बहु क्षितितलावरि मोठमोठीं
ज्यांच्या अमानुष अशा इतिहास–गोष्टी,
ते देव, तीं निरवधि प्रति देवराज्यें,
ह्यांनां स्वयेंच परदास्य अहो कसें ये ? ३
विश्वस्वरूप परमेश्वर जो तयाशीं
तादात्म्य ना तरि न सिद्धिहि साधकांसी.
गोष्टींत ह्या सकल इंगित काय आहे ?
सुज्ञा मना ! करुनि नीट विचार पाहे. ४

---

*cf*:—Union, Union ! Every body feels the need of union. The myriad forces are neutralizing each other. No resultant force ! Hundreds of millions of brains and hands drifting, who can tell whither ? Thousands of sects and classes, each trying to row the boat in the pet direction of their own sweet whim. No regular steering ! Such being the present plight of India, let the oars be where they are. See your positions. Shift not, but row in one direction. This kind of harmony, unity in diversity, ensures progress. Thus working at your posts, sing on and move on. The national interests demand it, and the interest of each unit as well.

—Swami Rama Tirtha.

वाटे मला म्हणति जीस जनांत एकी,
जी दिव्य वस्तु वसती करि मर्त्यलोकीं,
निःसार कार्य करितात तदीय योगें
साधे न जें प्रबल त्यांसहि तद्वियोगें. ५

निःसार ज्यांस तृण जें उपमान झालें,
त्यानें प्रमत्त करिही स्थलिंचा न हाले;
येते तृणास इतुकी महती कशानें ?
रज्जूंत तें धरुनि ऐक्य वसे तयानें. ६

होतां अभाव परि ऐक्य—महाबलाचा
येना कधींहि वरि अंकुर तंडुलाचा;
वाहे शिला दशदिशा सहजींच वार्ते,
चित्रास कांतिहि तनूसम ते न येते. ७

एकीविणें रुचतसे न सतार कानां,
एकीविणें प्रबल राष्ट्र न राष्ट्र माना;
एकीविणें खचित सिद्धि न साधकांही,
एकीविणें खचित एकहि साध्य नाहीं. ८

हे देवि ! वस्तुमधिं ज्या स्पृहणीय साचा
होतो विलास भुवनीं त्वदनुग्रहाचा,
दिव्य प्रभाव दिनरात्र तिच्यांत राहे,
ती वस्तु सत्य धरणीवरि धन्य आहे ! ९

हा हा ! परी भरतखंड—सुतांवरी गे
कां आज तूं रुसुनियां बसलीस सांगे !
झाले पहा तुजविणें किति दीन दीन !
येवो तयांवरि तुझा करुणानदीन ! १०

आलिंगनें दृढ सगद्गद केधवां ते
होवोनि एक करितील परस्परांतें ?
गे ! सांग सांग दिन येइल काय माते !
ज्यातें बघोनि पर जाय दिगंतरातें. ११

प्रकाशन—करमणूक व
आर्योन्नतिमंडळाचें ( गिरगांव, मुंबई. )
हस्तपत्रक; ऑक्टोबर १९०६.

# जगन्नाथप्रार्थना.



बलिष्ठ व्याधी हे सतत तनुला क्षीण करिती,
तसे नाना आधी अनुदिन मना जाळिति किती !
जगन्नाथा ! आतां गति तुजविना अन्य न मला,
दयाळा ! याला दे अभय, चरणीं दीन नमला. ध्रुव० १
सदा आयुष्याचे दिन जणु मणी ते गणुनियां
हंसे मृत्यू दाढा विचकुनिच नाचे थयथयां ! जगन्नाथा ! २
विनाशी देहाचा सतत घडताहे क्षय पहा !
सदा खेदा पावे विषयविषलोभी मन महा. जगन्नाथा ! ३
मनासंगें बुद्धी सतत रमते बाह्य विषयीं,
न ती अंतर्भोगीं कधिंहि भगवच्चिंतनमयी. जगन्नाथा ! ४
स्थिरावेना किंचिन्निशिदिनिं ममायुष्य सरतें,
अपक्का कुंभांत स्थित जल जसें नित्य झरतें; जगन्नाथा ! ५
अहा ! विद्युल्लेखे-सम नववयश्री चपळ ती
जशी वाढे तैशी अधिक जणु सिंहीच पळती; जगन्नाथा ! ६
घडे आयापेक्षां व्यय अधिक माझा अविनया,
बळी षड्वैरी ते यमनियम गेले गळुनियां. जगन्नाथा ! ७
अकाळीं काळानें जरि मम गळां फांस कसला,
तरी बोलायाही अवसर मिळे यास कसला ! जगन्नाथा ! ८
न केलें वाणीनें तप, तप न केलेंहि तनुनें,
असत्याच्या ठायीं रमुनि तप केलें नहिं मनें; जगन्नाथा ! ९
पळे सैरावैरा मन निमिषही सौम्य नसतें,
तुझें विश्वव्यापी तरि न नयनां रूप दिसतें ! जगन्नाथा ! १०
न जिव्हा केव्हांही मृदु मधुरसें भाषण करी;
परी तेजाबाची इतर हृदयीं धारच धरी ! जगन्नाथा ! ११
सदा जेथें लाटा रजतम गुणांच्या उसळती,
अशा माझ्या चित्तीं गति कुठुनि सत्त्वास मिळती ! जगन्नाथा ! १२

सुखें सत्कर्मानें मिळति इह, जन्मान्तरिं तशीं,
कथा सत्कर्माची करुं तरिहि सत्त्वाविण कशी? जगन्नाथा! १३
घडेना पूजाही न हि तव जपे नाम रसना,
करीना हें चित्त स्मरण तव लागोनि चरणां; जगन्नाथा! १४
दयादातृत्वांनीं यजन नहि तें माहित कसें,
विवेक, ज्ञानाचें प्रमुख मज तें साधन नसे. जगन्नाथा! १५
कशी ज्ञानप्राप्ती नसुनि पदरीं साधन तिचें?
मला पाषाणाला पद कुठुनि मोक्षादि गतिचें! जगन्नाथा! १६
जडे सत्संगानें अचल तव भक्ती परिसतों,
स्वयंविद्वानाला मज परि न लाभे परिस तो; जगन्नाथा! १७
स्वयें सत्संगाला विमुख जरि झालों तरि मला
मिळाया बोधाचा अनुभव सुधातुल्य कुठला? जगन्नाथा! १८
प्रभो! सर्वां भूतांविषयिं मम दृष्टी सम नसे,
तिच्या वैषम्यानें मन विषयजालीं पडतसे; जगन्नाथा! १९
कशी शांती यावी जरि न मम दृष्टींत समता?
अभावीं शांतीच्या भयदचि भवाची विषमता. जगन्नाथा! २०
समानांशीं मैत्री कधिं नच अनाथांवरि दया,
मनीं ये पुण्याचा नहि कधिंहि उल्हास उदया; जगन्नाथा! २१
उपेक्षा पापाची कधिं न करितां त्यांत रमतों,
मिळे आनंदाचा रस मग मला का परम तो? जगन्नाथा! २२
असे नेत्रांदींतें अतिशय रती बाह्य विषयीं,
न होती तीं अंतर्मुख विषय सोडोनि समयीं; जगन्नाथा! २३
उपेक्षेनें अंतर्मुख न धरिलें इंद्रियगणें,
सुखाची आशा ही तरि मग वृथा केविं करणें; जगन्नाथा! २४
भवाच्या तापातें निववुं न गृहादि त्यजियलें,
तुझ्या मायेनें हा! प्रियजनहि माझे हरियले! जगन्नाथा! २५
तुझी माया आतां अधिक करिते काय न कळे,
अशा चिंताग्नीनें मन सतत पोळे,—तळमळे! जगन्नाथा! २६

जरी राजेन्द्राचें विभव सगळे भोगहि तसे
मिळाले, ते सारे क्षणिक तरि नाहींत हितसे; जगन्नाथा ! २७
कधीं प्राणायामां करुनि विधिनें योग न करीं,
वियोगें योगाच्या स्थिर मन कसें होइल तरी ? जगन्नाथा ! २८
स्थिरावोनी ज्याचें मन निमिषही जाय न लया,
तया चक्रभ्रांती ! नहि लवहि शांती सुखमया. जगन्नाथा ! २९
कृपेनें ज्ञानातें गुरुवर मला देतिल अशी
न तत्सेवा केली जरि विदित तो मार्ग मजशी; जगन्नाथा ! ३०
जया स्नानें—पानेंकरुनि मन संशुद्ध बनतें,
अशा तीर्थादीतें कधि मम घडेना गमन तें; जगन्नाथा ! ३१
न दिव्य ज्ञानाचा अविमल मनीं लेशहि शिरे,
जसा काळ्या भिंगामधुनि नहि सूर्यांशु उतरे; जगन्नाथा ! ३२
परब्रह्मात्मा हो अवगतहि वेदांतमननें,
परी वेदांताला क्षम न मन हें साधनगणें;
जगन्नाथा ! आतां गति तुजविना अन्य न मला,
दयाला ! याला दे अभय चरणीं दीन नमला. ३३

हो प्रार्थना प्रभुपदास सदा नमोनी
केल्यास, हा भव विषासम ना गमोनी,
राहील शांत मनही परमात्मठायीं
भक्ती जडेल, लव संशय यांत नाहीं. ३४

प्रकाशन—मनोरंजन, १९०६.

---

# अतिरेक.

—०—

करणें अहो ! मुलामा नामी बावनकशी सुवर्णाला,
कमलास रंग देणें, अत्तर कीं फासणें गुलाबाला; १
मार्दव नवनीताला खलांत घोंटून आणणें, अथवा
इंद्रायुधांत मिळवूं जाणें शोधोनि रंग अन्य नवा; २

कीं काडवात लावुनि पाजळणें विश्वनेत्र सूर्याला,
हे सर्व दुर्व्ययाचे अतिरेकचि पात्र मात्र निंदेला ! १

प्रकाशन—मनोरंजन,
वर्ष १२, अंक १० वा, एप्रिल १९०७.

---

## कविसंदेश[1].



( १ )

देवी सरस्वतीच्या प्रिय नंदनहो ! तुम्हां असो नमन.
हा देह दूर आहे तुमच्या संमेलनीं असोन मन.
प्रत्यक्ष तूमच्या हा समागमाच्या सुखास अंतरला,
हरला उपाय यद्यपि, याचा वाटे महा विषाद मला.
संसारांतिल कोडीं सोडवुनी युक्तिनें तुम्हीं आलां,
एकत्र पुण्यनगरीं—सरस्वतीच्याच मंदिरीं—झालां.
संमीलित विदुषांनीं खचित महाराष्ट्रदेश—भाषेला
न्यायास उन्नतीतें बहु दिन यत्न—प्रयत्नही केला.
आतां तिची समुन्नति व्हावी, करितां म्हणून आयास,
हेतु प्रशंसनीयचि अनुमोदन हें मदीय हो त्यास.
स्वीकृत कार्यामाजीं असणारीं संकटें निवाराया
योजालचि सदुपायां, सांगूं अल्पज्ञ काय मी वायां ?
तरि जो चिटनीसांच्या विनंतिपत्रें मनास आठविला,
संदेश एक तो हा, विनयप्रेमासमेत पाठविला.
तो सावधान ऐकुनि होइल कांहीं विचार त्यावरती,
तरि मग आनंदाची भरती येइल मना अनावर ती.

---

१ हा संदेश पुणें येथें कै. वा. विष्णु मोरेश्वर महाजनि, एम्. ए. यांच्य अध्यक्षतेखालीं मराठी लेखकांचें ३ रें वार्षिक संमेलन ता. १८ व १९ मे १९०७ रोजीं भरलें, त्यावेळीं सभेंत वाचण्यासाठीं परिषदेच्या चिटनीसांकं पाठविला होता.

( २ )

अर्वाचीन कवींचा आदर नाहीं. नसो ! परी लोकीं
  त्यांच्याविषयीं संप्रति अनुकंपाही नसेच अवलोकीं !
संभावना तयांची दुसरी ऐकूं न येतसे खास;
  परि गरलासम टीका, व्याजस्तुति, वा यथेष्ट उपहास !
प्राचीन कवींपासुनि कोणी लागति पिळ्याच तोडाया
  अर्वाचीन कवींच्या, पिळ्या न वाटे उरेंच फोडाया !
वर्तविताते भविष्यहि कोणी जोशी असें खुलाशाचें
  कीं, कवि सांप्रतकालीं पूर्वींच्या सारखे न व्हायाचे !
अर्वाचीन कवींवरि साक्षर वर्गांतले अभिप्राय
  यापरि सांगुनि, वदतों तद्विषयीं मजसि वाटतें काय.

( ३ )

कवि, तत्त्वज्ञहि पंडित, कलानिधी, राजकारणी, वीर,
  धर्मज्ञ आणि योगी ह्यांचें हें भरतखंड माहेर.
गुण भूमिचाच ह्या कीं, नरमणि हे तिजमधूनि निपजावे,
  त्यांनीं निज किरणांनीं अन्यांचे नयनसंघ दिपवावे.
निर्मुनि कुसुमित वन तें, भ्रमर जरी घातला न जन्माला,
  फुलवुनि रसाल, कोकिल न निर्मितां दोष ये विधात्याला.
माझा समानधर्मा होइल निर्माण भूवरी कालें,
  सिद्धान्तवाक्य ऐसें कानीं भवभूतिचें न का आलें ?
भासादि कवि पुरातन, ह्यांच्या कृतिचा धरोनि अभिमान,
  जन मम नव वस्तूचा बहुधा करितील आज अवमान;
प्रारंभीं ही शंका आली ज्या तरुण कालिदासाला,
  तोच महाकवि,—नोहे सर्व कवींचा शिरोमणी झाला.
तोच पुरातन नूतन काव्यांविषयीं अपक्षपातानें
  काय अभिप्राय पहा लिहितो निज नाटकांत हातानें:—
प्राचीन म्हणुनि जितुकें तितुकें नामी न सर्व मानावें,
  केवळ नवीन यास्तव न काव्य लोकांत निंदिलें जावें.

अर्थात् परंपरेनें पूर्व कवींची धरोनियां कांस,
    एकसहा नव कविंचा न करावा केधवांहि उपहास.
कविराज, राजयोगी, राजगुरू, हे स्व-‘ दासबोधां ’-त,
    “ आतां आहेत, पुढें होणार, ” कवी तयांस नमितात.
ह्यावरुनि सिद्ध होतें, स्वामींच्या मानसा विकार नसे,
    समकालीनहि भावी कविंविषयीं तन्मनांत मान वसे.
“ होणार ” पदावरुनी स्वामींची निश्चयोक्ति समजावी.
    ‘ कवि होणें शक्य नसे ’ भ्रामक वचनें अशीं न बोलावीं.
यत्काव्य-गायनानें सारा बंगाल आज हालविला,
    अर्वाचीनचि कवि तो मग कां पंक्तींतुनी न घालविला ?
जरि वंगांत निपजला, न महाराष्ट्रांत काय निपजेल ?
    ‘ कवि होणें शक्य नसे ’ अविचाराचेंच वाक्य साजेल.
आशीर्वाद समर्थें दिला न तेथें कदा निराशा हो;
    तद्वचन सिद्ध, तैसा सिद्ध न होईल आमुचा टाहो.
पाश्चात्य कल्पनांनीं नवकाव्या लागलें नवें वळण,
    मुरल्या न कल्पना त्या, गमेल नवकाव्य तोंवरी दळण.
जेव्हांहि कल्पना त्या कविहृदयांमाजि पूर्ण पचतील,
    तेव्हां अधिक मनोहर नवीन रचना कवीहि रचतील.
संप्रति भाषावृद्धी, होत असे नव्य-कल्पनापचन;
    ऐशा स्थितींत कविंला कां बोलावें उगीच कटु वचन ?
ज्या काव्यानें लोकीं तुडुंबुनी स्वाभिमान राहील,
    ज्या काव्यानें त्यांच्या देहीं देशाभिमान वाहील,
ज्या काव्यानें द्वैतें जन-हृदयांतून शीघ्र ओसरती,
    ज्या काव्यानें येते ऐक्यरसाची तया महाभरती,
ज्या काव्यानें मोठे मोठे प्रतिबंध तेहि फोडून
    ती संघशक्ति धो धो वाहे सीमा स्वकीय सोडून;
ज्या काव्यानें उसळति त्या शक्तीचे तरंग मोठाले,
    देशोद्धार-सुधाकर मग आकर्षी तया उचित काळें.

ऐशीं उदात्त, उज्ज्वल, काव्यें केवल अहो ! समाधीनें
साध्य कवींना होती; परि नच ते प्रासल्यास आधीनें.
कविचा आधी दुसरा अठराविश्र्व्यांशिवाय काय असे ?
तो जन्मसिद्ध त्याचा ! कविताशक्ती जशी तयांत वसे.
निरसन ह्या आधीचें राजाश्रय एकला करूं शकला;
परि त्या समाश्रयाला कविजन हतदैव आजला मुकला !
आतां, रचावया कवि बसेल केवलसमाधिची कविता,
तोंवरि लोकाश्रय तरि आहे कांहो तयास वांचविता ?
नुसती सहानुभूती नाहीं ! आश्रय कशास बोलावा ?
टीका उपहासांनीं उलटा तत्पृष्ठभाग सोलावा !
कावाड कष्ट दिनभर करोनियां रुक्ष अन्न जेवावें,
रात्रींहि जागुनी निज कवितांनीं देशबंधु सेवावे,
आणि तयांचा विनिमय घ्यावा पूर्वोक्त बांधवांकरवीं;
किति कठिण ही कसोटी ! तुमच्या हृदया न काय पाझरवी ?
बोलाहो ! बोलाहो ! स्थिति ही अनुकंपनीय का नाहीं
अर्वाचीन कवींची ? ऐकुनि सोडूं नकाच कानांहीं.
संप्रति अवर्षणानें, तापानें, कोळपून जे गेले,
त्या पारिजातकांवरि फुलतिल वर्षाऋतूंत हो झेले !
जांयां करूं नकाहो ! हिमकालीं खुंट हे प्रहारांनीं;
लवतिल हेच वसंतीं द्राक्षांच्या गोड गोड भारांनीं !
शैलोशैलीं माणिक, गजोगजीं जरि न जाहलें मोतीं,
सर्वत्र साधु, चंदन नसले, तरि ते मुळीं न का होती ?
ह्याच कवींतुनि कोणी प्रभुसत्तेनें लिहील हो कविता;
काव्यासह विजयध्वज निज देशाचा दिगंत फडकविता.
यास्तव सहानुभूती ठेवा, कांहीं करा अशी सोय,
कीं कविंची, भाषेची, देशाचीही समुन्नती होय. ४८

प्रकाशनें—तत्कालीन इंदुप्रकाश, व
‘ काव्यदोहन ’ नामक स्वतंत्र पुस्तकद्वारा.

---

## राष्ट्रीय मंगल.



" Men who their duties know,
But know their rights, and knowing, dare maintain;
Prevent the long-aimed blow,
And crush the tyrant, while they rend the chain;
These constitute a state;
And Sovereign Law, that with collected will
O'er thrones and globes elate,
Sits empress, crowning good, repressing ill.
Smit by her sacred frown,
The fiend Dissension like a vapour sinks;
And even the all—dazzling crown
Hides his faint rays, and at her bidding shrinks. "

—*Sir William Jones.*

दिनकर दूती उषा उदेली, वदे निरोपाला,
भरतवर्ष हें हर्षविण्याला मंगल दिन आला. १
पूर्वगिरीवरि उभी, वदे ती शुभ संदेशातें,
हळूहळू तम दूर करी जें झांकी देशातें; २
तम नोहे तें, मज वाटे कीं, पटल निराशेचें,
तिनें काढितां प्रसन्न झालें वदन तदाशेचें. ३
क्रमा-क्रमानें लहान मोठे तारे मावळती,
तशा व्युत्क्रमें भूवरि वस्तू थोर, सान, दिसती. ४
वाटे कीं, ते सारे तारे मावळुनी वरतीं
देशोद्धारक तारक नर या भूवरि अवतरती ! ५
कीं रविरूपी दीप लावुनी पूर्वपटामागें
प्रभु मायावी इंद्रजाल हा करावया लागे. ६

काढुनि त्यानें ‘ तारामंडल ’ चित्रफलक नेलें;
आतां ‘ भारतवर्षविभव ’ हें दृग्गोचर केलें. ७
झिमझिम अमृताऽभिषेक करुनी मेघावलि गेली,
पहा तिनें वनदेवी केवीं मंगलमय केली ! ८
बागबगीचे, कुरणें, शेतें माळ, मळे हिरवे,
हिरवें जंगल, मंगलमय हें भूमंडळ हिरवें ! ९
हिरवा शालू पाच मण्यांचे अलंकार हिरवे,
घालुनि वर्षालक्ष्मी जणु ही हर्षानें मिरवे. १०
सतेज हिरवा प्रतिपल्लव, हा जलबिंदू ढाळी,
आनंदाश्रुच कीं हे वाटे वनदेवी गाळी. ११
हिरव्या हिरव्या गार गिरींच्या तटावरुनि खालीं
स्थूल धबधबे धब धब पडती जाती पातालीं. १२
अमित पल्वलें, तळीं भूतळीं जळें उचंबळती,
झर झर निर्झर वाहति, ओढे वेगें खळखळती. १३
दुथडी भरल्या धांवति धो धो नद्याहि नादानें,
स्वमुखें रत्नाकरास देती जणु चुंबनदानें ! १४
रत्नाकरही आस्थातकरें तन्मुख कुरवाळी,
उत्कंठित तीं कंठालिंगनिं दिसती या काळीं. १५
यापरि जिकडे तिकडे भूतल जलमय हें झालें,
प्रसाद करुणाकर वरुणाचा बघुनि जीव धाले. १६
कळंब फुलले, कुडेहि खुलले, चंपक हंसताती,
स्मित करिती जणुं विस्मित होउनि नानाविध जाती. १७
मुकुलित बकुली-मृदुगंधातें जिंकुनि या काळीं,
उन्मादानें परागधूली किति केतक गाळी ! १८
गुलाबास गुलबास सुवासें लाजवितो भासे,
निजधर्मच्युत कुलीनासही भलता जन हांसे. १९
लाल, धवल, वा सुनील कमलें कासारीं फुलती;
धुंद मरंदें मंगल गुंगुनि भृंगसंघ झुलती. २०

---

१. फुलत असलेल्या.

पुष्पवृष्टि ही भूवरि, परिमल गगनान्तरिं भरिला,
पारिजातकें सर्व फुलांचा गंधगर्व हरिला ! २१
अमरकार हे वसंतऋतुला ' पुष्पसमय ' म्हणती,
वर्षाकालें परि उपहासा नेली ती भणिती[1] ! २२
दिगंगनेनें केशरचंदनलेपें लिंपियलें,
जणुं म्हणुनिच कीं गगनांगण हें स्वर्णवर्ण सजलें. २३
किंवा स्वागत दिनराजाचें करण्या करितां हें
देवेन्द्रानें छतचि जरीचें जणुं दिधलें आहे. २४
शुद्ध दुधापरि अभ्यन्तरिं ह्या किंवा कालवला
विशुद्ध ऐशा प्रेमाचा हा रंग मला गमला. २५
झळझळ झळके क्षितिजावरती रविच्या किरणांचा
समूह, जैसा तुराच कीं तो सुरेन्द्र-मुकुटाचा ! २६
विशाल तेजोनिधी निघाला, उदयाला आला,
ब्रह्मांडाचा करंड पिंवळा मंगलमय झाला ! २७
पृथिवी मंगल, आपहि मंगल, मंगलरूप रवी,
मंगल वायू वाहति, मंगल आकाशहि मिरवी. २८
जल, हें ज्या ज्या आकाराचा आश्रय करिताहे,
अविलंबानें तदाकार तें होउनियां राहे; २९
बाष्प होउनी अवकाशाचा आश्रय तें करितें,
आकाशाची निराकारता स्वयें तदा धरितें; ३०
यापरि जल तें भिन्नाऽकृति, वा निराऽकृती जैसें,
जगदाऽकारहि निराऽकार वा मंगल हें तैसें. ३१
निजाश्रयाशीं एकरूप तें होउनि जरि भरलें,
तरि मग मंगलनिधान तेंही मंगलसम, ठरलें. ३२
विश्वरूप तें असे कसें त्या मंगलधामाचें,
हें कळताहे बघुनि जसें हें रूप निसर्गाचें; ३३
तसेंच मंगल राष्ट्राचेंही यथार्थ जाणाया
खुणा कोणत्या लागति सांगा मनांत बाणाया. ३४

१. वचन, उक्ति.

मोठे मोठे बुरूज जेथें उभारिले असती,
अवाढव्य बहु दुर्गम ऐसे दुर्ग जिथें दिसती, ३५
सखोल खंदक, तट बळकटसे, विशाल दरवाजे,
ज्यावरि फडके ध्वज विजयाचा, जयदुंदुभि वाजे, ३६
घुमट, मनोरे, यांहीं जणुं कीं मुकुटित जीं झालीं,
ऐशीं नगरें असती जेथें बहु वैभवशाली, ३७
विशाल सुंदर अशीं बंदरें उपसागरिं असती,
प्रभंजनाला जिथें विडंबुनि रणनौका वसती, ३८
उरें जयांचीं दडपुनि गेलीं अनेक पदकांनीं,
असे विराजति राजपुरुष ते जिथें सभास्थानीं, ३९
अधमपणा, जो हीन कुलांतचि जन्म सदा घेतो,
तत्सहवासें अभिमानाला वांस[1] जिथें येतो, ४०
स्वरूप ऐसें ज्या राष्ट्राचें, मंगल तें काय ?
नव्हे !—तयाला मंगल म्हणतां होइल अन्याय ! ४१
लाजविती जे पाषाणांतें, कीं निवडुंगांतें,
वन्य पशूंहुनि अशा विशिष्टा शक्ति असे ज्यांतें, ४२
असे महात्मे-थोर मनाचे जन—जेथें वसती,
पाहुनि ज्यांनां देवहि विस्मित सुरलोकीं असती, ४३
निज कर्त्तव्यें, निज सत्ताही[2] जाणति जन जेथें,
जाणुनियां ती रक्षायाचें धैर्य तयां असतें, ४४
प्रहार, जो का बहु दिन अपुल्यावरि येऊं पाहे,
जागृत होउनि तत्प्रतिकारहि ज्यांहीं केलाहे, ४५
छल करणारी अजिंक्य सत्ता लत्ताऽघातांनीं
लयास नेली, छिन्नहि केली, स्वबंधनें ज्यांनीं, ४६
एकमतानें दिग्जय करुनी देवी न्यायाची
जेथिल सिंहासनीं विराजे अधिराज्ञी साची, ४७

१. दुर्गंध. जेथील अभिमान अधमपणानें दूषित झालेला असतो, हें तात्पर्य.
२. हक्क.

दुष्ट जनांचें नियमन करिते, सुजनां आदरिते,
द्वैत जियेच्या दिव्य कटाक्षें धुक्यापरी गळतें, ४८
अधिराजाचा किरीट दिपवी सर्वहि जगताला,
दिव्याज्ञेनें तोही जीच्या मंदावुनि लपला; ४९
असेल ऐसें राष्ट्र तेंच हो मंगल मानावें,
गोड किती बहिवार तयाचे वानावे गावे ! ५०
राष्ट्र जयांचें नसेल मंगल, ऐशा पुरुषांनीं,
मंगलमूर्ती हीच धरावी राष्ट्राची ध्यानीं. ५१
स्वरूप अपुलें तिच्याच ऐसें त्यांनीं साधावें,
कीटकभृंगेन्यायें[1] लोकीं मंगलमय व्हावें. ५२

प्रकाशन—मनोरंजन,
वर्ष १३ सप्टेंबर १९०७.

---

## स्तोत्र.

—:*:—

हवन कां ? जप कां ? तप कासया ?
करिसि सेवन तीर्थहि कां सया ?
शिणसि कां तरि शास्त्रविलोकनें ?
शरण जा प्रभुला तनुवाङ्मनें. १
नरतनू अति दुर्लभ भूवरी,
सुरहि वांछिति; जाणुनि हें तरी
विषयलंपटता त्यजि सोडुनी
शरण जा प्रभुला कर जोडुनी. २
प्रिय सती, सुत, बंधु न बांधव,
जनक वा जननीहि नसे तव;

---

१. स्वतःला टोंचणाऱ्या भृंगाच्या निदिध्यासानें किडा हा स्वयमेव भृंगरूप होतो. त्या न्यायानें.

कुणि न येइल यांतुनि संगतीं,
त्वदनुकर्म तुला मनुजा ! गती. ३

जग पहा भरलें चलतागुणें,
चपळ तीं पळती धनयौवनें;
मग जना ! गजनाथविमोचना
शरण जा. न करीं निजवंचना. ४

विविध रोग जिच्यांतुनि राहती,
मल नवांहि पथांतुनि वाहती,
परवशा तनु भंगुर हीवरी
धरिं न लोभ जना ! भजना करीं. ५

प्रकाशन—मनोरंजन,
वर्ष १३, फेब्रुआरी १९०८.

---

## युवराजवियोग.



ज्यानें युवराजाच्या शुभ गीतें गाइलीं सुलग्नाचीं
त्यानेंच का लिहावी अशुभ कथा तद्वियोग-विघ्नाची ?
परि हा सगळा आहे खेळ–विपर्यास–खास काळाचा.
विधिनेंच लेख लिहिला चुकतो तो केविं हो कपाळाचा !
पांच दिनांपरि झालीं पांचचि वर्षें तदीय लग्नातें,
तों भवबंध तयांनीं युवराज्ञीचेंहि तोडिलें नातें.
भावी राज्यसुखाची नाहीं तिळमात्र ठेविली परवा,
परवां परलोकीं ते गेले, करितात लोक शोकरवा.
नवल न जनशोकाचें, प्रजाच कीं राजनिष्ठ ती आहे;
परि ही निसर्गदेवी उदास झाली ! न वातही वाहे.
काळानें कपटानें वाटे युवराजघात केल्यानें
दिनराज खिन्न झाला, मुख झांकी अभ्ररूप शेल्यानें.

मंद प्रभा तयाची नोहे, सारा विषाद हा पसरे;
तरुवेली, नरनारी, दिसती पांडुर उदास एकसरें.
राजपथीं त्या कालीं असति उभे त्यजुनि हालचालीला;
वाटे तटस्थ झाले दुर्दैवाची बघोनियां लीला.
किलबिल न करिति पक्षी, सारा व्यवहार जाहला शांत;
जनताशब्द निमाला, राजमहालांत होय आकांत!
सूचवि कूच कराया स्वार शिपायांस दहनभूमिकडे;
तों करुणगीत-वादन करी उराचे शतावधी तुकडे!
शस्त्रें उलटीं धरिलीं, आदरिली मूकता शिपायांनीं,
चालति मंदगतीनें स्वारांचे हय, पदाति पायांनीं.
वाद्यसमूह सभोंतीं करुणरवें गाढ शोक विस्तारी;
ये पालखींत मागुनि युवराजाची अखेरची स्वारी.
जो युवराज गजावरि विलसे उदयाचलीं जसा इंदू,
तो न उठाया निजला! खेदाचा खवळला महासिंधू!
हे राजचिन्हहो! हा पाहुनि निस्तेज ह्यास दूषवितां?
जरि गादीवरि बसता, हाच तुम्हांला स्वयें विभूषविता!
×प्रख्यात भोंसल्यांची तनया सौभाग्यमंडिता चिमणा,
गुजराथराजलक्ष्मी, त्या देवीचाच बाळ हा चिमणा!
जननीमुखचंद्राचें शोभे प्रतिबिंब याचहो वदनीं!
खग्रास हाय झालें! न दिसेल श्रीसयाजिच्या सदनीं!
उन्मत्त, लीन, राजा, रंक, यमा! शरण तो तुझ्या चरणां,
मरणास पावतां तो जातो किति दीन होउनी सरणा!
वेश अमंगल करुनि स्मशानयात्रेस थोर जन आले,
युवराजाच्या मार्गें भासे कीं शोकपूर हा चाले!
त्या पूरासरसा तो मृत्यूच्या नृत्यभूमिला गेला!
गेला! परतुनि येना, सयाजिनें मारितांहि हांकेला!
न हयारोहण आतां न गजारोहणहि त्या चितावहना!
क्रव्यादग्निस्थापन झालें! आरंभ हाय हो दहना!

× ही आर्या युवराजाच्या अतीव सुंदर चित्राखालीं घालण्यांत आली होती.

गर्जे तोफ धडाडा, कडकडती बंदुकांचिया रांगा,
बधिर श्रवण जहाले, आले रोमांच तेधवां आंगा.
वैधव्य-व्यसनानें नाडुनि पद्मावतीस भार्येला,
गेलास राजपुत्रा ! करुनि पदाघात काय आर्येला !
ध्वज नृपमनोरथाचा, भगवाझेंडाहि ' मांडवी ' वरला,
पाडुनि फत्तेसिंहा ! पथ न तुवां हाय, हा बरा धरला !
वणवा सुतशोकाचा तव जनकाच्या उरःस्थलीं भडके;
क्रव्यादग्नि भयंकर तुझ्या चितेचाच हा जसा धडके.
राग, द्वेष, तसे मद बहुपरिचे, कोणतीहि मोठाई,
विरघळते, गळते गे, जळोनि जाते चिते ! तुझ्या ठायीं.
दिसती तवप्रतापें दोष मृताचे हरोनि गुण तितुके;
सोन्यास आंच मिळतां जळोनि मळ, कांति तेवढी झळके.
सुखशीतल छत्र शिरीं राज्यधुरंधर सयाजिरायाचें
असतां, युवराजांनीं विशेष तें काय हो करायाचें ?
अश्वारोहणपटुता तथापि संपादिली असे यांनीं;
कौतुक नृपास झालें अनेक वेळीं तदीय मृगयांनीं.
दिधली प्रथम परीक्षा, केला अभ्यास आंग्लदेशांत,
भिन्नाचार-विचारहि ह्या देशीं पाहिले विदेशांत.
नाना खात्यांतुनि ते शिकले जाऊनि काम सरकारी;
अक्षर असें असे, कीं पाहुनि हो लेखकांस लाचारी.
आर्यांग्लपद्धतींचे नानापरि खेळ खेळती नामी;
आटोपुनि खेळ परी गेले देऊनि दुःख परिणामीं !
कुठवरि खेद करावा आतां ? होणार गोष्ट ती झाली;
नित्यानित्य विवेकें सुज्ञ नृपा ! धैर्य ठेव या कालीं.
सांत्वन युवराज्ञीचें सोडोनी धीर केविं करिशील ?
धरणें संकट समयीं धैर्य, असें हेंच थोरजन-शील.
पद्मावतीस मानीं दुसरे जणुकाय इंदिराराजे.
सांभाळ बाळकातें प्रतापसिंहास. हेच युवराजे.

विश्वनियामक शक्ती फत्तेसिंहास उत्तमा गतिला
देवो ! संप्रति याविण न सुचे हितवाद माझिया मतिला. ३५

प्रकाशन—मनोरंजन, बडोदें, ता. १६. ९. ०८.
ऑक्टोबर १९०८.

---

## श्रीसोमनाथाच्या वास्तुपुरुषाचें दर्शन.*



" सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः " ।
—भर्तृहरिः

गंभीर अंभोनिधि पश्चिमेचा
भासे निधी केवळ शांततेचा;
विस्तार, नीलद्युति ही तयाची
स्पर्धा जणो कीं करिती नभाची. १
अस्तोन्मुखाची रविची प्रभा, ही
नीलोदकीं त्या विलसोनि राही;
वाटे दिली शीतनिवारणाला
सिंधूस मित्रें पिंवळी दुशाला. २
होता जरी सागर शांत भारी,
तत्रापि, तीराजवळील वारी

---

* काठेवाडांत प्रभासपाटण येथें श्रीसोरटीसोमनाथ हें अति पुरातन व इतिहास–प्रसिद्ध देवालय आहे. तें पहावयास कवि गेला असतां, त्यास अकस्मात् त्या उद्धस्त देवालयाच्या वास्तुपुरुषाचें दर्शन होऊन उभयतांत कांहीं प्रास्ताविक भाषण झालें. अशा काव्यकल्पनेनें 'सोमनाथ' महाकाव्याचा आरंभ करण्यांत आला होता. ह्या 'वास्तुदर्शन' नामें पहिल्या, व 'विभूतिवर्णन' नामें दुसऱ्या सर्गाच्या मसुद्याचा कांहीं भाग रद्दींत आढळून आला! सबब, तो जिज्ञासु वाचकांसाठीं येथें चिरस्थायी केला आहे.

हेलावुनी स्थूल तरंग त्याचे
प्रक्षालिती भाग सदा तटाचे. ३
जाती समुद्रामधिं ओसरून
सोत्कंठ ते येति किती फिरून.
घो घो असा घोष तदीय चाले,
अन्यध्वनी त्यांत विलीन झाले. ४
गंभीर ह्या संतत सिंधुनादें
गांभीर्य नैसर्गिक जेथ नांदे,
ऐशा प्रभासाभिध पत्तनांत
होता स्वयंभू प्रभु सोमनाथ. ५
धर्मच्छलें नीच अहं-मदानें
उच्छेदिलें त्यास महंमदानें;
जाणोनि तें स्थान पहावयाची
तृष्णा जहाली द्विगुणा मनाची. ६
सोत्कंठ मी शीघ्रगती निघालों,
क्षेत्रास मित्रासमवेत आलों;
सिंधूतटीं प्रांगणमध्यदेशीं
पाहें तदा एक विशाल राशी. ७
कांहीं शिलांचीं शकलें अहो तीं
त्या अंगणामाजिं विकीर्ण होतीं;
सायं प्रवातें घन भिन्न होतां
तत्खंड जैसे पडती सभोंतां. ८
ते ते शिलाखंड तया स्थलींचे
एके प्रसंगीं असतील साचे
अंगें उपांगें शिवमंदिराचीं
कीं भव्य गात्रें जणुं दिग्गजांचीं. ९
आपापुल्या योग्य अशा स्थलांतें
ते जोंवरी गाढ धरोनि होते,

शोभाच आणीत न तोंवरी ते
देती निजाधारहि मंदिरातें. १०

आधार त्यांनांहि परंतु ज्याचा,
तो धर्म पावे क्षय आज साचा;
होवोनियां यास्तव वेगळाले
आधार खेदास्पद ते गळाले ! ११

त्यांच्याकडे पाहुनि खिन्नतेनें,
स्वर्गाकडे पाहुनि दीनतेनें,
मी चाललों त्या मग मंदिरांत,
कीं कूर्म जैसा गिरिकंदरांत. १२

जों पाहतों, तो न कुठें निवारा;
वाटेल तेथोनि शिरोनि वारा
वाटेल त्या त्या स्थलिं संचरावा,
वाटेल तेथोनि निघोनि जावा. १३

तो दीर्घ हुंकार करीत येई,
सो सो असा नाद करीत जाई;
येथें जणों आगमनिर्गमांनीं
वायूच 'सोऽहं' जपतो निदानीं ! १४

वायू न निश्वास शिवालयाचा
हा टाकितो वास्तुपुरूष साचा;
माझ्या मुखीं हें सहजींच आलें,
आश्चर्य तों काय पहा जहालें ! १५

तेथें 'शिवोऽहं' सहसा निघाला,
हा नाद तैसा पडसाद झाला;
होतों कुठें, कोठुनि ये कळेना,
आम्हांविना मानव आढळेना. १६

आयात–वात–ध्वनि होय जों 'हुं'
तों हुं–रवाशीं मिसळे 'शिवोऽहं;'

त्याचा प्रतिध्वान उठे ' शिवोऽहं '
एवं ' शिवोऽहं रव ' हो ' शिवोऽहं. ' १७

आकर्ण–नेत्रावधि वेरझारा
जिज्ञासु घाली मन हें भरारा;
तों ये जरा हीच विभूति ज्याला,
वास्तू असा पावक तो निघाला. १८

त्याचें तनू नम्र धनूसमान,
मानेसवें ते शिर कंपमान,
पाहोनि, मानी जन व्हावयाचा
दंडायमान स्वयमेव साचा ! १९

आधार दे वामकरें कटाला,
साहील आतां किति संकटांला ?
तो सव्य हस्तांतिल धैर्यदंड
टेंकी तरी हालतसे उदंड. २०

अंगावरी केश न राहियेला,
भंगावली ह्या पडल्या त्वचेला,
जीं दिव्य होतीं वसनें यशाचीं,
तीं जाहलीं जीर्ण विदीर्ण साचीं. २१

कालाख्य जो दर्पण वांक त्याला
दोन्हीकडेही जणु कोयत्याला;
त्या मार्जि हें मंदिर हाच वास्तु
हा हा ! किती दीसति भिन्न वस्तु ! २२

ऐश्वर्य गेलें, सरला प्रभाव,
भासे तरी दिव्य महानुभाव;
होवो स्वकीयोदय वाऽवसान
लोकीं महात्मा, रवि, हे समान. २३

अस्ताचलीं जें गुरु शुक्र यांचें
तें तेज त्याच्या नयनद्वयाचें;

तो वृद्ध कीं हंसचि मंद येतो ?
योगी, कसा हंस म्हणूं नये तो ? २४

दे भार दंडावरि दो करांहीं,
राही उभा घेत उसंत कांहीं;
माझ्याकडे तो वळवोनि मान
साशंक पाही मग सावधान. २५

तेव्हां प्रणामादिक सत्क्रिया ही
कांहीं मला आठवलीच नाहीं.
मी सिंधुसंगें पुतळा मिठाचा
लागे द्रवायास तसाच साचा. २६

स्वाभाविक प्रेम तयावरींचें
जाणोनि ह्या कोमल अंतरींचें,
आलें बघोनी नयनांस पाणी,
हेलावला तो जरि दंडपाणी ! २७

क्षेमार्थ घाली वळसा भुजांचा,
कीं भूतवात्सल्य-निबंधनाचा;
त्यानें असें हें शिर हुंगियेलें,
कीं प्राण तत्काल निरोधियेले ! २८

मी त्यास, तोही मजलाच पाही,
पातें न हाले जरि बाष्प वाही;
एवं प्रकारें मित काल तेथें
आह्मांमधें शांत निशांत होतें. २९

अन्योन्य जे प्रेमळ त्या जनांचा
कालान्तरानें जरि दर्शनाचा
आला महायोग, तरी तयांत
ऐसेंच आधीं असतें प्रशांत. ३०

ही शांति—हें मौन—परी तयांचें
राहे अहो तोंवरि मात्र साचें,

आकंठ वृत्ती भरतां स्वभावें
पावे न ती जोंवरि हेलकावे. ३१

जी चंद्रलेखा दिसते लहान,
दे तीहि सिंधूस उचंबळोन;
प्रच्छन्न वह्नी धुमसे भला तो
फूत्कारयोगें भडकोनि जातो. ३२

उद्वेग माझा न मनांत मावे,
तो सांयमानें उलटा दुणावे;
तो शेवटीं स्वैर मुखास आला,
संबोधनाकार असा निघालाः— ३३

हे ज्योतिर्लिंगांतिल आदिधामा !
हे रम्य सौराष्ट्रशिरोललामा !
हे जीर्ण धर्मांतिल जीर्ण चिह्ना !
हे भिन्नवर्णाश्रित तूं अभिन्ना ! ३४

हे आर्यवीरांतिल वीर्यहेतो !
हे धर्मधीरांतिल धैर्यकेतो !
हे घोर संसारसमुद्रसेतो !
हे दुर्जनध्वंसक धूमकेतो ! ३५

हे साधु—तापत्रयहारि मेघा !
हे भारताच्या सुकृता अमोघा !
हे मृत्युलोकीं सुरलोकभूता !
भूतार्थसंगा ! अथवाऽवधूता ! ३६

हे आर्यभूनंदन-नंदनीया !
हे वंद्यवंद्यांसहि वंदनीया !
वंदोनि धूली तव धूलिदास
हा वंदिताहे तुझिया पदास. ३७

ही धूलि जे शैव महान् महान्
प्राचीन मार्कंडमुनीसमान,

त्यांच्या सुतीर्थासम पावलांनीं
झाली असे पावन पावनांनीं. ३८

माझ्यापरी जे जड पापराशी
नाशील ही तज्जनपातकांसी;
धूलिप्रभावें जरि पाप जावें
तूझ्या कृपें काय तरी न व्हावें ? ३९

हे सोमनाथाविण तूं अनाथा,
माझा तुला नम्र विनम्र माथा.
मृत्युंजयाच्या भवना ! तुला ही
आली अशी दीन दशा कशांहीं ? ४०

ऐकोनि ऐशा मम भाषणातें
तो बोलला वास्तुपुरूष मातें.
घुमे तयाचा रव मंदिरांत
पंचाननाचा जणु गव्हरांत. ४१

हे आर्यवंशीय सुता नवीना,
कालार्णवाच्या रमणीय फेना,
आली अशी जे कुदशा मला हे,
हेतू तिला केवळ तोच आहे. ४२

जो काननांतील वसंतशोभा
नाशोनि दे त्यास हिमें विशोभा,
जो चंड मार्तंडकराभिघातें
दे दैन्य विस्तीर्ण महानद्यांतें, ४३

जो इंद्रनीलासम अंबराही
मालिन्य आणी मलिना घनांहीं,
जो धूमकेतूसम चंड तारे
टाकी झुगारोनि करप्रहारें, ४४

निस्तेज तेजोनिधिला कराया
जो पाडितो त्यावरि भीम छाया,

प्रत्यक्ष जो पूर्ण सुधानिधीला
लावी क्षयानें कृश व्हावयाला; ४५
क्रोधें जयांच्या रिपु भस्म व्हावे,
आज्ञा दिगंतास यदीय धांवे,
ऐसे महादुर्धर मंडलेश
जो जाहलाहे करिता अशेष, ४६
लंकापुरी, हस्तिन-राजधानी,
ती उज्जनी मंडित पंडितांनीं,
ह्यांची करी केवळ धूळधानी
जो आपुल्या घातक तांडवांनीं, ४७
वर्षें, मनू, वा युग तेवि कल्प,
न स्वल्पही आणुनियां विकल्प,
चावूनि जो चूर्ण करी तयांचें,
हेला रवंथें जणुं कीं तृणाचें; ४८
सारांश चक्रापरि विश्व सारें
जो राहिलाहे फिरवोनि वारे,
वस्तू म्हणोनी वश ज्यास नाहीं,
नाहींच ऐशी जगतांत कांहीं, ४९
त्या विश्वजित् विश्वभयंकराचे,
कालासुराचे अति कर्कशाचे
लागूनि आघात शतावधी ते,
मी पावलों यापरि दुर्दशेतें ! ५०
येथें तदीय सहसा स्वरभंग झाला,
आणि क्षणैक वदवे न पुढें तयाला;
ऐश्वर्य जाय विलया, स्मृति केधवांही
जाई न, दुःख दिधल्याविणही न राही. ५१
( वास्तुदर्शन नामें सर्ग १ ला समाप्त. )

---

# विभूतिवर्णन.



त्यानंतरी मी वदलों तयातें
खेदासवें दावुनि विस्मयातें:—
अशाहि कालास किती प्रयास
हो लागले ही स्थिति द्यावयास ! ५२
त्यालाहि जें दुर्जय फार व्हावें
तें त्वद्बलैश्वर्य कसें असावें ?
तुझ्या मुखानें इतिहास त्याचा
गा ऐकवीं तो श्रवणीय-साचा. ५३
सारस्वताच्या जरि मंथनांनीं
तो काढिला शोधुनि शोधकांनीं,
न संभवे तो तरि यासरीचा;
जीवंत कीं हा तव अंतरींचा. ५४
जें प्रश्नकाच्या निघतें मुखानें
तें ऐकती कोण न कौतुकानें ?
गतं न शोच्यं वचनानुसारें
तूं शोक सोडीं, वद वृत्त सारें. ५५
ज्ञानी, मनाचे बहु थोर, साधे,
यांचें समाधान सुखेंचि साधे.
तदन्वयें सान्त्वन होय त्याचें,
वर्णी असें वैभव तो भवाचें:— ५६
अशेषसंहारकरा कराला
कालास त्या कारण जो जहाला,
ज्यानेंहि झालें जग हें सनाथ
मन्नाथ तो मंगल सोमनाथ, ५७
विशिष्ट रूपास धरोनि जेव्हां
येथें असे जागृत फार, तेव्हां

होतें महावैभव या स्थलाचें
श्रीशैल कैलास--समान साचें ५८

*       *       *

अप्रसिद्ध, सन १९०८-०९.

---

## कारंजें.

—※—

हें अवलोकुनि कारंजें
  गा हृदया रसिका रंजें ॥ ध्रु० ॥
रविप्रकाशा-माझारीं
याचें तेजोमय वारी
चमके, मुकेच गगनाचे
ध्याया थैथै जणु नाचे; हें. १
पडुनि चंद्रिका यास करी
धवल हिमाहुनि नवलपरी;
विलसति किति ह्या जलधारा
शुद्ध रुप्याच्या जणु तारा. हें. २
ह्या बिंदूंचे तों होती
गोल अमोल विमल मोती.
हंसोत अथवा जवाहिरे
मी तों म्हणतों यांस हिरे! हें. ३
होतां जल पवनाकुल तें
फूलचि जणु डुलतें झुलतें.
न दिसो तमांत तारांनीं
उमगे मंजु तुषारांनीं. हें. ४
सततोत्साहें, आनंदें,
उडतें पडतें निज छंदें;

पहुनहि उंच उडायाला
याला श्रम न कदा झाला. हें. ५

सुदिन-दुर्दिनीं उल्हासें
हांसे सम सुंदर भासे;
खालीं वरती सतत गती,
गती विराम तया मग ती. हें. ६

शील करी जें तद् घटना,
ना तें शक्यचि आकलना;
शाश्वत अशाश्वती ज्याला,
तीच शाश्वती मग त्याला. हें. ७

स्पृहावंत जरि निरंतरीं
तरीहि निस्पृह निरंतरीं
तमें तमोमय हें असतें,
तेजें तेजोमय दिसतें. हें. ८

अभिनव, सतत, जरी लहरी,
उन्नत, चिंताजाल हरी;
गुणगुणुनी गुणगण हे तूं
तूंहि असें हो हा हेतू. हें. ९

प्रकाशन—मनोरंजन व
रसतरंगिणी, १९१०.

---

## कुंजकूजन.

—*—

( दिंडी. )

कृष्णपक्षींचा चंद्र कलाहीन
पश्चिमेच्या क्षितिजांत होय लीन,
भागलेला जणुं जरठसा प्रवासी
लागलाहे खालतीं बसायासी. १

दीर्घसूत्री ती रात्र चंद्रजाया
पूर्वगोलातें त्यजुनि निघे जाया;
उदयसंधी येतांच आळशातें
स्वयें तंद्रा सोडोनि जशी जाते. २

बाल-दिनकर तो उदयगिरिशिराला
प्रयासानें आरूढ जणों झाला;
मृदुल दुलईसम धवल धुकें त्यानें
निज करांहीं सारिलें आळसानें. ३

अरुण किरणें मंदोष्ण तयाचीं तीं
पडुनि आकाशीं लाल छटा देती;
प्रेमरंगें जणुं बाळरवि-चितारी
किरणकलमांनीं गगनपट चितारी. ४

सुखद त्याचें तें उष्ण पसरताहे,
तरिहि कमती हेमंतशीत नोहे;
असुनि अर्थोष्मा जेविं लोभियाचें
दैन्य म्हणुनी कधिंही न जावयाचें ! ५

अझुनि ठेवुनि निज गाल गालुशीतें
बिछान्यांतचि असतील आळशी ते;
अशा समयीं मधुमधुर ह्या रवानें
आळवितसे हा कोण गौरवानें ? ६

कुठुनि येते ही शब्दसुधा धारा ?
हिनें भरिला कीं निकट भाग सारा !
अहो ! बघताहें चकित लोचनांहीं,
उगम ह्रीचा तरि दिसत मला नाहीं. ७

कोण तूं गा कोठील कवणियाचा ?
कुठें आहे तव वास वसायाचा ?
कुठें केला अभ्यास गायनाचा ?
कोण झाला गुरुराय तुज तयाचा ? ८

अससि कलरव कीं काय सतारीचा ?
दिव्य सुस्वर कीं अमर-सुंदरींचा ?
मूर्तिमंतचि कीं सामवेद साचा ?
सांग मजला तें सांग सुधावाचा ? ९

जिच्यामाजीं प्रतिबिंब तुझें राहे,
वस्तु लोकीं कोणती अशी आहे ?
सरसहृदयी मेघ तो स्वातिचाही
तुझ्या सरिचा जरि म्हणूं तरी नाहीं. १०

कर्णरूपी उघडिल्या शिंपल्यांत
वचनावळू जे तुझे उतरतात,
अमित सोज्वलसें तयांचियें पाणी
रुचिर मोत्यांसहि गौणताच आणी. ११

वेणुनादें माधवें मधुवनांत
ब्रह्म बिंबवुनी प्रणयिजनमनांत,
परमहर्षाचा परमलाभ त्यांतें
करुनि दिधला, ऐकोनि ठाउकें तें. १२

परी त्याची अनुभूति मला नाहीं.
न हो किंबहुना मना कल्पनाही.
आजि तूझ्या परिसोनि गायनातें
किमपि त्याचें अनुमान मला होतें. १३

काळसर्पाहुनि जे महा विखारी
असे दुर्जन, त्यांनांहि जिंकणारी,
चंद्रमणिसम रसिकांस झरविणारी,
होय वाणी तव अमृतगर्वहारी. १४

पहा ! विस्मय चहुंकडे प्रसारीत,
गाढ जिज्ञासा रसिकमनिं भरीत,
उष्णसंगें अनुराग संचरीत,
गिरा विचरे ही पवन-लकेरींत. १५

उदासांचें औदास्य-तम हरोनी,
निराशांचें नैराश्य निवारोनी,
व्यथितहृदयांची व्यथा शांतवोनी,
विलसते ते उल्हास उपजवोनी. १६

तरी, अद्भुतरस असा निर्मिणारा,
सरस मानस उचमळुनि आणणारा,
हेंच नंदनवन करुनि दाविणारा,
कोण असती तूं दिव्य गुणागारा ? १७

गुच्छ जैसा काश्मीर-गुलाबाचा
हरित पर्णांमधिं गुप्त असे साचा,
तरी, परिमल चहुंकडे तयाचा तो
दरवळोनी रसिकांस मोहवीतो. १८

लपुनि कोठें तरि विहंगमा तैसा,
नादसंगम वितरोनि मधुर ऐसा,
गड्या, मजला तूं वेड लावियेलें;
तरी सांगें त्वां गेह कुठें केलें. १९

असाधारण गुण असुनि असा अंगीं,
कासया तूं बससी गूढ जागीं ?
वसत असतां कीं नित्य विजनवासीं
येत आहे थोरवी गुणिजनांसी ? २०

दिव्य तेजोवलयांत विचारांच्या
लीन होउनियां कवी, सुधावाचा
वदे नैसर्गिक काव्य, तसा तूंही
गासि गायन हें विस्मयप्रवाही.

काव्य तूझें ज्यांतोनि उगम पावे,
विषय लोकीं ते कोणते असावे ?
लोल सलिलें, कोणतीं उपवनें तीं ?
माळ किंवा कोणत्या शैलपंक्ती ? २२

रम्य देखावे नभोमंडलाचे ?
प्रेम किंवा तूझिया प्रिय जनाचें ?
अपरिचय कीं संसारविपत्तींचा
उगम आहे ह्या काव्यनिर्झरीचा ? २३

अगा गंधर्वा ! अगा विहगराया !
चित्तचातक हा आत्मवश कराया
तुझ्या हृदयीं कोणते तरि विचार
असति हृदयंगम जेहि काव्यसार ? २४

ठाउका जो आनंद तव मनाला,
लेश त्याचा देशील काय याला ?
शिकवि शिकवी तव शब्दमोहिनी ते
ह्याहि जिव्हेतें सहजकर्कशेतें. २५

अरे इतुक्यांतचि मौन असें कां हें
तुवां धरिलें ? हें उचित तुला नोहे.
असुनि कवि मी तुज करित विनंती ही
अविनयें कां अवमानितोस तीही ? २६

होय तूझा व्यवसाय-बंधु गा मी,
सतनुवाझ्मन मी रसिकजन-लगामीं;
बघुनि तूझा गुण दिव्य, निरभिमानी
करी विनती, ती सुजनपणें मानीं. २७

गुणविहीना गुणमणी गमति कांचा,
गुणी हेवा करितात गुणिजनांचा;
परी गुणवान् गुणिजनांचा चहाता
विरल विरलचि तो सरल जन पहातां. २८

लक्ष पक्षी लक्षिले आजवेरी
रंगरूपें शब्देंहि मनोहारी;
परी करणारा यापरी बहारी
नाहिं नाहीं कुणि कुंजवनविहारी. २९

अगा गांधर्वा ! तरी लताऽगारीं
छेडिं छेडीं तूं फिरुनि रागदारी;
तिच्या श्रवणाचा, तुझ्या दर्शनाचा
लाभ झाल्याविण मी न हलायाचा. ३०

हाच वाङ्मधु हृदयांत साठवीन,
काव्यरूपें रसिकांस पाठवीन;
तरी, तव ते बहुमोल बोल बोल !
देइं दर्शन दृष्टीस या विलोल. ३१

अहो, परि हा भ्रम काय मला झाला !
प्रार्थिताहें मी काय हें कुणाला ?
वनेचर जो स्वातंत्र्यसुधास्वादी,
कासया तो साहील मम उपाधी ? ३२

काय म्हणुनी शिकवील मला हो तो ?
आणि शिकवोनी काय कवी होतो ?
कदा नोहे ! रससिद्ध कवी जो कीं
स्वयंभू तो अवतरत असे लोकीं. ३३

स्वयं काव्यस्फूर्तीस पावणारा,
स्वयं नादब्रह्मांत गुंगणारा,
शब्दसृष्टीचा चतुर विधाता तो
जगन्मोहन या खगापरी गातो. ३४

कुठें वाणी या कुंजकूजनाची !
कुठें माझी वैखरी खरतराची !
कुठें निर्मल जीवंत झरा तीचा !
कुठें कर्दम मत्काव्यपल्वलींचा ! ३५

कुठें त्याचें निश्चिंत अंतरंग !
कुठें माझे दुर्मनो-मनोभंग !
कुठें त्याचा स्वातंत्र्यवनविहार !
कुठें जीवित परतंत्र हें असार ! ३६

निराशेनें जाहलों उदासीन,
कवित्वाचा मद होय मनीं लीन;
गमे सारें जग जीर्णवन मला हें,
ज्यांत एकचि मी जीव वृथा आहे! ३७
अहो, इतुक्यामधिं काय नवल झालें
प्रेम-बिंबचि कीं भानुचें-उदेलें !
आणि तेणें निमिषांत उपवनाला,
नव्हे, आलें चैतन्य या जगाला ! ३८
हृदयरूपी जो प्रेमकोश, त्यातें
व्यक्त करुनी जणुं सर्व सहृदयांतें,
जडांलाही चैतन्य द्यावयाला,
कुंजकूजन लागला गावयाला. ३९
जसा त्याचा रव कर्णमनोहारी,
तसा होई प्रतिरवहि सभोंवारीं;
जणों उपवनही कुंजकूजनाचे
असुनि नादब्रह्मांत लीन नाचे. ४०
धन्य असती तूं कुंजकूजना गा !
गाइं गाईं निज गान महाभागा !
तुझ्या गानें होईल खलभुजंग
वशहि तरि तो मग कां न रमारंग ! ४१
पंचमांतिल आलाप कोकिलांचे,
नादसंयोगहि तंतुवादनांचे;
काव्यमकरंदहि महाकविजनांचे,
वृथा येथें जाहले वृथा साचे ! ४२
परमसीमा ही दिव्य माधुरीची
मनुजवाणीनें कधिं न कळायाचीं;
स्वाद हीचा रसिकांस जरी व्हावा,
तरी त्यांनीं रव हाच आयकावा. ४३

वसंततिलका.

जें जें निसर्गरमणीय म्हणोनि कांहीं,
निर्माण होउनि जगीं विलसोनि राही,
सौंदर्य तें नयनगोचर होय साचें,
अज्ञेयशा भुवनसुंदर ईश्वराचें. ४४
विश्वास ठेवुनि मनांत असा विवेकें,
विश्वास जे निरखिती प्रणयातिरेकें,
तद्वैभवीं असति लीनहि कौतुकानें,
त्यांनांच ही कृति समर्पण आदरानें. ४५.

प्रकाशन—१ मनोरंजन. २ काव्यरत्नावली १९०४.
३ रसतरंगिणी १९१०.

---

## तारातरंग.



" Ye many twinkling stars who yet do hold
Your brilliant places in the sable vault
Of Night's dominions !–Planets, and central orbs
Of other systems; * * to you I raise
My lowly orisons; " &c. &c.

—*Kirke White.*

स्रग्विणी.

माझिया नेत्रहो ! हा पहा कीं पहा !
श्रीनिशेचा महा-राष्ट्रसंसार हा !
केवढा थोर हा, आणि भव्याकृति !
ईश्वराची किती ही अगम्या कृति ! १

कृष्णरात्रीचिया कृष्णपीठावरी,
कृष्ण आकाश हें कृष्ण छत्रापरी;
त्यांत कोट्यावधी तारकांचे हिरे
लाविले, ज्यामधीं दिव्य तेज स्फुरे. २

कृष्ण तें जीतुकें, शुभ्र हे तीतुके,
स्थूल तें जीतुकें, सूक्ष्म हे तीतुके;
अंबरें तारका शोभती सुंदर,
तारकांही दिसे शोभिवंतांबर. ३

ज्यामधीं शांतसा कांतिचा संग्रह
दीसताहे, असे हे अनेक ग्रह;
अन्यतारावली-केंद्र ह्या तारका,
स्वप्रकाशें कशाहो मनोहारका ! ४

चंड मार्तंडशा त्या प्रचंडा, तरी
भासती अल्पशा काजव्यांच्या परी !
बाह्यरूपास ह्या पाहुनी लोचनीं
वस्तुचें वास्तव ज्ञान नोहे मनीं. ५

हे असंख्यातशा तारकावृंदहो !
काय हीं आमुचीं लोचनें अल्प हो !
वृंद हे तूमचे पाहतां पाहतां,
होतसे त्यांजला भ्रांति कीं तत्त्वतां. ६

नीच धूळींतले जंतु जे मानवी,
त्यांस कैशी कळे तूमची थोरवी ?
ही असंख्यातता, ही अमर्यादता,
दिव्यता, भव्यता, नेणवे तत्त्वतां. ७

ज्ञान हें तूमचें व्हावया व्यक्तसें
ज्ञानवंतापरी बुद्धि आम्हां नसे;
ती महा नीचशा तर्कटें गंजली,
क्षुद्र जाल्या असे मंद तैशी भली. ८

नम्रभावें तुम्हां वंदुनी प्रार्थुनी,
तूमच्या प्रेक्षणें नेत्र हे तर्पुनी,
योजितो कल्पना मी तिथें संप्रति,
दृष्टिचीही जिथें कुंठताहे गति. ९

उंच उंच स्थलीं,–फार उंच स्थलीं,
ती भरारी पहा ! मारुनी चालली;
शैल तों लंघिले, वातही लंघिले,
तारकासंघही सर्व उल्लंघिले. १०

ये अतां ती तया पुण्यलोकाप्रति,
तत्त्ववेत्ते परं–धाम ज्या बोलती.
ज्यास निर्वाण वा बोलती सन्मुनी,
उन्मनी पावती ज्याचिया चिंतनीं. ११

निर्मिला हा जगद् व्यूह ज्या नायकें
तेविं विश्वें अशीं कोटिशः मायिकें,
तो विराजे तिथें दिव्य सिंहासनीं,
विश्वकर्मा समाधी महा लावुनी. १२

सर्व तारांगणांतूनि देवांगना
दिव्य वीणांवरी बैसल्या गायना;
रम्य गंभीरसे तंतु ते वाजती,
भैरवीचे ध्वनी अंबरीं गुंगती. १३

आळवीती किती हो जगत् कारणा !
वानिती अप्सरा त्याचिया त्या गुणां.
वाङ्मनातीत त्या निस्तुला ईश्वरा
पूर्ण वर्णू म्हणे कोणती हो गिरा ! १४

गा विभो ! आमुचा नाथ तूं एकला,
सर्व सामर्थ्यवान् सर्वसाक्षी भला;
तूंच सर्वोत्तमा ! थोर सर्वांहुनी,
वैभवातें तुझ्या दीपलों पाहुनी ! १५

गूढ लीला तुझी मूढशा बालकां
जाणवेना अम्हां गा जगत्-चालका !
गोल एकैक हा अद्भुतांचा निधी !
ह्या परी निर्मिले गोल कोठ्यावधी ! १६

काय ही कल्पना ! काय कौशल्य हें !
काय औदार्य हें ! काय गांभीर्य हें !
ह्याच तर्कांमधीं गर्क झाली मती;
हे अगम्या ! असो तूजलागीं नती ! १७

ह्यापरी चालतां गान देवांगनीं
नाद विस्तारला तो दिगंतांतुनी;
जाय एका ग्रहाहूनि दूज्या ग्रहीं,
येरिती संचरे तो ग्रहोपग्रहीं. १८

दूर दूरांतरीं च्याहि तारांतुनी
नादसंयोग तो राहिला गुंगुनी.
शेवटीं व्यापला सर्व दिव्यांगणीं,
लीन तेणें जगत् श्रीजगज्जीवनीं. १९

नादसंयोग तो स्वर्गलोकांतला
कर्णरंध्रीं गमे माझिया पातला.
सेवुनीयां सुधातुल्य तन्माधुरी
अंतरात्मा अहो ! नृत्य माझा करी. २०

ह्यापुढें लोक हा व्यर्थ निःसारसा
दग्ध चिंतानळें भासताहे जसा !
सौख्य होणार जें स्वर्ग लोकीं मना
होय त्याची इथें अल्पशी कल्पना. २१

मानवांचें जिणें मानवी श्रेष्ठता
कः पदार्थांपरी येथ झाली अतां !
ह्या प्रचंडप्रभा-गोल-संख्येपुढें
सार्वभौमासही दैन्य ये रोकडें ! २२

हे परंज्योति ! हे सर्वसामर्थ्यवान् !
वस्तुमात्रांत जो तूं सदा दृश्यमान्,
आदिहेतूहि जो भीमकर्मास या,
ये प्रभो ! त्या तुला काय माझी दया ? २३

सर्पटे भूतलीं दीन जंतूच हा.
एकदाही तया तूं दयाळा पहा !
गा पहाशील का ? कां न तूं पाहसी ?
सार्थ संज्ञा तुला ' सर्वसाक्षी ' अशी. २४

भूतवात्सल्य जें तूंत देवा ! वसे,
ह्या नभासारिखें तेंहि निःसीमसें;
जेविं निःसीमसें, तेविं निःसंगसें,
राव कीं रंक, हा भेद त्यातें नसे. २५

तत्कृपालेशही हे कृपासागरा !
स्वेच्छया अर्पिसी तूंच ह्या पामरा.
तत्प्रसादप्रभा लाभलीयावरी
दैववान् कीटहि काय मौजा करी ! २६

अहो ! तत्त्वें सारीं असति किति हीं उन्नत तरी !
तयांसंगें जातां मन उडुनि उत्कर्षशिखरीं,
अहंभावाचें तें घनपटल त्याचें वितळतें,
द्युति ज्ञानार्कांची मग सतत त्यातें उजळते. २७

कळे नित्यानित्य त्वरित मद जावोनि विलया,
भयानें ईशाच्या मन धरितसे तें सुविनया,
नया उल्लंघाया कधिं नच धजे कीं उपरमे
रमेशाच्या पायीं, भवविभव त्यातें भ्रम गमे. २८

वृथा संसारींच्या मृग-सलिलशा सौख्यलहरी !
वृथा शृंगारांनीं तनु सजविणें ही वरिवरी !
वृथा सन्मानाचा प्रसर, सगळे संभ्रम वृथा !
महत्त्वाकांक्षाही क्षणिक इहलोकांतिल वृथा ! २९

कळे हें सारेंही तरि जडमती मी किति पहा !
रचाया काव्यातें जडित बसलों शब्दनिवहा;
सुखें निद्रा घेतां सकळ जन, मी काय शिणतों !
अहा ! विश्रांती जी हितकर फुका तीस मुकतों ! ३०

कृती माझी सारी सरसरमणीया उतरुनी
मला संतोषानें वरिल कविकीर्ती बुधजनीं;
अशा आशापाशामधिं अडकुनी मी तडफडे,
यशःप्राप्ती ? तों ती विधिवश; घडे, वा नहि घडे ! ३१

असे गंजीफांचे धडधडित वाडे वसवितां,
दंवांच्या बिंदूंचे नवलपरिचे हार करितां,
दिगंतीं धांवोनी रजनिकर–चेंडू कवळितां,
मनातें, देहातें, घडति परिताप श्रम वृथा ! ३२

अनाद्यंता ईशा ! बहु बहकतों मोहतिमिरीं,
मला सन्मार्गातें करुनि करुणा ने झडकरीं;
मिळे शांती जेणें क्षितिस असतां आमरण ती,
परंधामीं नामी तव निकट अक्षय्य वसती. ३३

कितीहो तृष्णा ह्या विफल मरणाधीन मनुजां !
किती दीर्घोद्योग, प्रबलतर आशा तदनुजा !
परी सारीं मिथ्या ! शिव शिव ! अहो मोहमय तीं
ठकाचीं कालाचीं अघटित भुतें की भुलविती ! ३४

प्रकाशन—कुसुमगुच्छ, रसतरंगिणी.
बडोदें. ता. ९-९- ई. सन. १९१०.

---

## कालार्णव.



तव ठाव कळे न विराटा !
वर्षे ह्या तुझिया लाटा. सागरा ! १

हें गहन शोकजल सारें
अश्रूंच्या लवणें खारें. सागरा ! २
ये तुला ओहटी, भरती,
मर्यादा नहि तुज परती ! सागरा ! ३
तूं नश्वरतेचीं तीरें
व्यापिसी स्वैर निज नीरें. सागरा ! ४
जरि विटसी कवळ गिळाया,
तरि गर्जसि अधिक मिळाया ! सागरा ! ५
नहि भूतदया-लव जेथें,
अवशेष ओकिसी तेथें ! सागरा ! ६
ठकविसी शांत असतांना,
क्षोभलिया प्रलय जनांना ! सागरा ! ७
तुजवरुनि तरुनि जाणारा
मग कोण असेल अपारा ! सागरा ! ८

प्रकाशन—मनोरंजन,
पुस्तक १५ वें एप्रिल. १९१०.

---

## कवितारति.

—:०:—

अये कविमनोभवे, सहजसंभवे, स्वामिनी,
सुवर्णमयदेहिनी, नवरसात्मके, भामिनी,
प्रसादमयजीविते, अनुविचार-संचारिणी,
चमत्कृतिविलासिनी, रसिक-सन्मनोहारिणी. १
यदा भगवती गिरा परम मंजु वीणागुणां
स्वयें चलन देउनी करितसे तवाऽवाहना,
यदा मधुर साम तो म्हणति सर्व गंधर्व ते,
मनोहर सुरांगनावलय तें यदा नाचतें. २

अशेष तव वैभवें करुनि वेदपारायणा
यदा स्तवितसे विधी किमपि आदिनारायणा,
यदा स्वरतरंग हे मिळुनि एकमेकांमधीं
प्रसार बहु पावतो तव अनन्य नादांबुधी, ३
यदाहि कविते ! तुझी परम माधुरी यापरी
उचंबळुनि राहते सकल देवलोकान्तरीं,
तदा त्यजुनि आपुली सहजयोगनिद्रा हरी
प्रसन्न नयनीं सुरांवरि सुधाभिषेका करी. ४
अगम्य तनुवाङ्मनाप्रति असे जगन्नायक,
असा निगम गाति ते सुरपुरींतले गायक;
तथापि कविते ! प्रभू वशहि कीर्तनें जाहला,
न कीर्तन तुझ्याविणें, म्हणुनि साध्य तो तूजला. ५
तुझी पडुनि मोहनी अवतरेहि साकार तो,
स्वदासजन तारितो, खल अशेष संहारितो;
अये सकळही भयें चळचळां जया कांपती
करी वश अशा शिवा तुजमुळेंच लंकापती. ६
न मोहबल चालतें लवहि ज्या त्रिमूर्तीवरी,
वशीकरण त्यांजला करिसि तूं जरी यापरी,
तरी मग अम्हां जनांप्रति अनेक मोहाकुलां
तुवां स्ववश केलिया नवल काय ? सांगे मला. ७
प्रसाद घडतां तुझा सहज नाभिमूलांतुनी[1]
अनन्य लहरी उठे, तनुसि टाकि ते व्यापुनी;
तिच्या प्रसरणासवें सकल देह हेलावतो,
क्षणैक चपलौघ कीं जणुं शिरांतुनी धांवतो. ८
मुखांमधुनि एकदां गदगदा तदा ये ध्वनी,
स्वयें उचमळोनि ये हृदय, नीर ये लोचनीं;

---

( १ ) ज्या वेळेस प्रतिभावान् कवीला काव्यस्फूर्ति होते, त्या वेळेस त्याला होणाऱ्या संवेदनांचें हें वर्णन आहे.

न काव्यविषयाविना इतर भानही राहतें,
रसात्मक पदावली मग मनोहरा वाहते. ९

करोत करणार ते किमपि जल्पना यावरी,
रसज्ञ कविबंधु तो अनुभवील हें अंतरीं;
परंतु अनुभूति ही मजसि तीन वर्षें नसे,
अहा ! प्रियजनावरी प्रियजनें रुसावें कसें ? १०

तुझ्यास्तव उपेक्षिल्या बहुविधा सुविद्या कला,
तुझ्यास्तव न तीं पदें, उपपदें, मिळालीं मला;
तुझ्यास्तव हुजूरचा जरि गुलाम झालों स्वतां,
तुझ्यास्तवचि गांजलों तरि निबंधनातें अतां. ११

तुझ्यास्तव न लोभतां विभवमार्ग मी टाळले,
तुझ्यास्तव सखे ! मला स्वजन तेहि कंटाळले;
तुझ्यास्तवचि हेलना मम गृहावधानीं घडे,
तुझ्यास्तव जनाहुनी विजन हा मला आवडे. १२

तुझ्यास्तव तुझ्यापरी मृदुल देहिनी गेहिनी
अनेक समयीं दिली ढकलुनी, अये मोहिनी !
तुझ्यास्तव जुमानिलें नहि सुबंधु नारायणा,
सदा न सदुपासिलें किमपि सूर्यनारायणा. १३

निशा दशदिशांसही गवसणी यदा घालिते,
सुषुप्ति निज मोहनी स्थिरचरांवरी टाकिते,
प्रशांत समयीं अशा भ्रमसि जेथ लीलावती,
अतंद्रितचि तेथ हा अनुसरे तुझा सोबती. १४

मुठींत नवतीमिषें कनकवाळुका वाळिली,
परंतु तुजसंगतीं रमुनि तीहि म्यां गाळिली;
अशाहि अहितामुळें मन न भंगलें, रंगलें
सदा तव समागमीं गमलिं जंगलें मंगलें. १५

शरीरसुख सोडुनी, विभवपाश ते तोडुनी,
निजाप्त मन मोडुनी, अहित सर्वथा जोडुनी,

तुझ्या प्रणयबंधनीं सतत गुंतुनी जो बसे,
रुसोनि कवितासखी ! विमुख त्यास व्हावें कसें ? १६
तुझें स्मरण होतसे मजसि राहुनी राहुनी,
उदास मन जाहलें विरह साहुनी साहुनी;
तुझें श्रवण मी करीं, मनन, घेतला ध्यास ना !
त्वदन्य हृदयेश्वरी ! मम जिवास ना वासना. १७
किती दिवस आणखी तळमळूं तुझ्या कारणें ?
वियोगविष पाजुनी उचित कां मला मारणें ?
नको, करुं नको असें, सकल संग मी त्यागितों,
प्रसन्न परि हो मला, वर अनन्य हा मागतों. १८
तुझा प्रणयभानु हा प्रखर या क्षणीं जाहला,
मनोधन तयामुळें सरसरां स्रवूं लागला,
सतेज रसबिंदु ते हृदयशुक्तिनें झेलले,
जिवा म्हणुनि धीवरें मज दिलीं सुमुक्ताफळें. १९
फिरे कलमवज्र हें वचनमौक्तिकांच्या वरी,
ममायुगुण गोंवुनी बनवितों तयांच्या सरी;
अशा सरस घालितों तुजसि मी सरीच्या सरी,
प्रसाद परि सुंदरी ! मजवरी करीं गे करीं. २०
अहा ! भ्रम—परंतु हा भ्रम अगाध—कांहो मला ?
न पूर्व-कवि, तत्कृती, स्मरति कां मला सोज्ज्वला ?
तया कृतिमिषें पहा किति अलंकृतींनीं भलें
सुरम्य कवितावपू नखशिखान्त हें शोभलें. २१
कचांवरि तिच्या पहा कविवरेण्य मुक्तेश्वरें
किती वचनमौक्तिकें रुचिर गुंफिलीं हीं बरें !
भ्रमें—प्रणयसंभ्रमें मणिललाम हा मानुनी
समर्थकृत बोध ती निज शिरास घे बांधुनी. २२
प्रसिद्ध रघुनाथ ह्या रसिक पंडितानें तिला
नवादिरस घोंटुनी तिलक लाल हा लाविला.

सुनील कमलप्रभा, अलिविलास हीं वामनें
दिलीं नयनमंडनें रचुनि कृष्णलीलांजनें. २३
श्रुतींमधुनि घातलीं परमदिव्य देवद्वयें[1]
स्वकाव्य–मणिमंडनें, झळकती किती तीं स्वयें !
नथ प्रथुनि घालितां वचनमौक्तिकें श्रीधरें
किती सरल नासिका विलसते मुखश्री बरें ! २४
स्वकीय परमामृतें–नहि परंतु–मंद स्मितें
मुकुंद कवि भूषवी विशद कुंदसे दंत ते;
सुवर्णमणि, पोतही मधुनि कृष्णभक्तीमिषें
गळेसरचि बांधिले अढळ एकनाथें कसे ? २५
विराजति गळ्यांत ह्या किति अभंगचंद्रावली
जयांतुनि तुका–यशोधवल चंद्रिका फांकली.
न संतचरितें महीपति हिला भरी कंकणें
सुवृत्त मणिबंधनीं असुनि कां तयां शंकणें ? २६
अहो, सगनभाउनें, रसिकराज होनाजिनें,
दिली इजसि मंदिली विरल कंचुकी प्रीतिनें.
सुवर्ण जरिचीं बुटें, यमक गोलकल्लोलसे,
मयूर कविचा न हा कृतिकलाप, शालू असे. २७
कटीस कटिबंध ही जडित मेखला आयती,
यतींहि झुलवावया अमृतराय दे काय ती ?
किती श्रुतिमनोहरा रसिक रामजोशी–कृती
कृती न कविते ! तुझीं करिति नूपुरें झंकृती. २८
पुरातन अतां कुणी असति जे मराठी कवी,
तदीय रचनांस मी समजतों मुद्या जोडवीं;
अशा कविगणें जिला सजविली स्ववाग्भूषणें,
तिला वचनभूषणें मम नव्हेत, हीं दूषणें ! २९
असोत; जरि दूषणें, तरिहि तीं करीं धारण;
पुराण कविंनीं तुला नटविली असाधारण;

1 ज्ञानदेव, नामदेव.

म्हणोनि वरवर्णिनी ! तुजसि दृष्ट लागेल की !
न ती वचन-लांछनें मम कदापि होई सखी ! १०

प्रकाशन—मनोरंजन—रसतरंगिणी
१९१०.

---

## वसंतमाधव.



( १ )

आला वसंत कवि-कोकिल हाही आला,
आलापितो, सुचवितो अरुणोदयाला;
हा ‘ ऊठ ऊठ ’ ! म्हणतो जणु भारताला,
ऐका ! पहा उठुनि ह्या प्रतिभारताला. १
वाल्मीकि हा जणु दुजा दिसतो न कांहीं,
आलाप मात्र निघती अमृतप्रवाही !
वाङ्मोहनी किमपि साधियली जयांनीं,
कोठें वसोत मग ते नहि मानहानी ! २
ही दिग्वधू तदनुरूप पतीस लाजे,
झाली सुवर्णरसतुल्यचि, काय साजे !
आरक्त ही बघुनि हो अनुरक्त भानू,
हा प्रेमरंग उभयांतिल काय वानूं ! ३
तेजोनिधान पद ‘.देव’ यथार्थ ज्याला,
दिव्यासनास रवि तो अधिरूढ झाला;
आहे तदीय नववर्षसखा सवें तो—
दृष्टींत सख्य असल्यास दिसोनि येतो. ४
हे सारखे वरद, मंगल अन्तरंगें,
आले जगांत उदया उभयानुषंगें;
जे कां समान हृदयें अथवा स्वभावें,
त्यांना अभिन्न गणिती जन एक भावें. ५

आहेत दोन मधु माधव तुल्य मास;
केला वसंतऋतु एकचि तत्समास;
हेही सखे मिळुनि ' मित्र ' पदांत तैसे
नारायणीं नर, विराजति एक ऐसे. ६

जे सारखे असति सुंदर आकृतीनें,
त्यांहूनि पूज्य सम सुंदर जे कृतीनें;
हा मित्रयोग रुचिराऽकृतिचाच नोहे,
तत्तुल्य–चारुचरितांतहि योग आहे. ७

येतांच एक उदया करितो दिनाचा—
प्रारंभ, अन्य करितो तरि मंगलाचा;
एकें प्रकाश परिपूर्ण दिशे दिशेला
आनंद तोंच इतरें जगतांत केला. ८

वृक्षांवरी किलकिलाट वनोवनाला—
झाला ध्वनी गजबजोनि जनीं निघाला;
कांहीं विहंगम टिपेवरिच्या सुरांनीं
गातात तों गुरव हे सनया सुरांनीं. ९

कोठें घुमोनि असती जंव पारवे, तों
कोठें मृदंगरव साम्य तदीय देतो;
हे आम्र जों कुणि फळें, कुणि मोहरांनीं,
तों शोभती जनगृहें ध्वजतोरणांनीं. १०

हीं पावनें उपवनें पवनें, हिमानें,
हीं अंगणेंहि जन–मार्जन–सिंचनानें;
पुष्पें अनेकविध गाळिति रम्य वल्ली,
गेहांगना विविध घालिति रंगवल्ली. ११

या कोंकरांस, करडांसहि वासरांना
येतात हर्षलहरी लहरी मुलांना;
चेंडूसमान कुरणांतुनि तीं उडाया
हीं लागलीं परि घरांतचि बागडाया. १२

वन्यस्थलें, हिमगिरी, बहु निर्झरांनीं
न्हाती तसेच जनही विपुलां जलांनीं;
आपापुलें करिति ते जरि धर्म–कर्म,
कांहींत यापरि दिसे तरि तुल्य मर्मः— १३

कुंजांत गुंजन घुमे बहु बंभरांचें,
देवालयांत इकडे उदरंभरांचें;
हे ध्यान-मौन धरिती बक भक्ष्यसाधू,
लोकीं असे बहुत हंत ! महंत–साधू ! १४

यांच्या वरोनि अपुली फिरवोनि दृष्टी,
अन्यत्र हीच निरखूं निमिषैक सृष्टी;
सारे हिच्यांत भरले नहि कार्यसाधू;
कोणी खरेच असती गुरु आणि साधू. १५

आहे अशेष-जनजीवनहेतु जो कां,
सर्वप्रबोधक नियामक सर्व लोकां;
जो एक अंतिम गती, गुरु राघवाचा,
तो सूर्य हा तळपतां गुरु अन्य कैंचा ! १६

सर्वत्र जें भरुनियां उरलें अनंत,
खंब्रह्म जें निगम गाउनि घे उसंत;
निःसंग, निर्मल, निरंतर अंतराला–
वांचूनि त्या गुरु कुठें बघतां निराळा ? १७

जो स्पर्शतां त्रिविध ताप लयास नेतो,
घ्राया प्रसन्न मन भिन्न सुगंध देतो,
जीवांस सर्व जगतासहि जो जिव्हाळा,
तो संत संतत असे कसला उन्हाळा ? १८

वर्षाव हो ! कडकडाट उडो विजांचा !
ज्यांचा न निश्चय म्हणोनि ढळावयाचा;
दिव्यौषधी किमपि ते रस संग्रहाला,
दावूं अशा किति तरी सुमहंतमाला ? १९

कष्टोनि तिष्ठति कुठें तरि काननाला,
बोलाविती निज विहंगमुखें जनांला,
छाया करोनि अनुकूल फलांस देती;
या सज्जनीं चहुंकडे भरलीं वनें तीं ! २०

विश्वंभरा, जननि, दैवत जानकीचें,
आहे क्षमा किमपि हें व्रत-शील-जीचें,
आम्हांस जी धरितसे मरणान्त उर्वी—
अंकास, ती नहि सती ? न हि काय गुर्वी ? २१

दोन्ही तटें करुनि अन्नमयें अम्हांला,
पाजावया धरुनि धांवति संभ्रमाला;
आम्हांस ज्या करिति पावन आणि शांत,
दावूं सती किति अशा निज भारतांत ? २२

हा तों गभीर, अति शांत अनन्तपार,
औदार्य हें उचमळे न जलप्रसार !
लक्ष्मीपिता, उगम जीवन-जीवनाला,
हा सिद्ध आणि गुरु बोधक शोधकांला. २३

क्षारोदकें पिउनि यांतुनि मेघमाला
ज्या ओतिती अमृतरूप निधी अम्हांला,
त्याही सती, न दिसती परि वर्तमानीं
वासंतवेष धरिला असतां वनांनीं. २४

वेली, तरू, विलसले नव पल्लवांहीं,
हे झोंकदार बहु लोक नवांबरांहीं;
पुष्पेंच भूषण लता वनवासिनीतें !
रत्नें, सुवर्ण, गजरे—हि सुवासिनीतें ! २५

आला गुलाब—सुमनांप्रति जो विकास,
उल्हास तोच इकडे रमणीमुखांस;
एकैक त्यांतुनि जसा निघतो सुगंधी—
उद्गार यांतुनि तसा प्रणयानुबंधी ! २६

देती लताभ्रमर तों नयनभ्रमाला,
रामाकटाक्ष परि हे भवसंभ्रमाला;
या संभ्रमांतचि अहो, पडले,–बुडाले,–
ज्ञानी, यमी, समरसिंह तळास गेले ! २७
हे भृंग दंग दिसती मधुसेवनांत,
नानाविधें वनचरें चरती वनांत;
पक्ष्यापुढें अलगलें फल ये स्वयें तें,
पूर्णत्व आज अमुच्या पुरणास येतें ! २८
जे कां पलाशकुसुमांतिल रंगराग,
ते अंगराग जनतेंतहि रंग-राग !
या उत्सवें सुदिन आज तदीय गेला,
गेला सहस्रकर भेटुनि पश्चिमेला. २९

( २ )

संध्या न ही, परि गुलाल रमे वसंत,
वायु न, ये अभिनयें नट हा वसंत;
तारे ? जवाहिर ! कसा झळके वसंत,
हा कोहिनूर ! नहि शुक्र तुझा वसंत ! ३०
हें वारियंत्र नच, नाचतसे वसंत,
हा मल्लिकांस न विकास हंसे वसंत;
हा भृंगनाद नहि गुंगतसे वसंत,
नोहे पराग अनुराग भरी वसंत ! ३१
नाहीं सुधाकर, सुधा वरसे वसंत !
सारा निसर्ग मजला सजला वसंत !
वेड्या ! अरे, तुजसि जो दिसतो वसंत,
तो हा अनंत ! भरला, उरला अनंत ! ३२
कस्तूरिचा असुनि कंद निजान्तरालीं
जैसा तिला हुडकितो मृग भोंवतालीं,
तैसाच तूं ! नहि मनोगत माधवाला,
तद्बिंब जें बघसि त्या मधुमाधवाला ! ३३

योगी मनांत सुमनोहर हा पहाती,
प्रेमासवें खळखळां नयनीं वहाती !
कीं, बिंब रम्य दिसतें इतुकें जयाचें,
प्रत्यक्ष वैभव असेल कसें तयाचें ! ३४

तें पाहणें तुज असे, तरि नेत्र झांकीं,
झांकीं तुझें श्रवण, चिंतन अन्य टाकीं;
तूं शांत हो, मन तुझें चळवूं नको तें,
अभ्यंतरीं नवल हें बघ काय होतें ! ३५

येथें नसोनि मुरली रव रम्य चाले !
येथें न चंदन तरी वपु गार झालें !
येथें नसोनि रवि, तेजचि तेज आहे !
मध्यें मनोनयनहो ! बघवे न साहे ! ३६

लागे रसाल नसतां रस गोड येथें !
येथें सुगंध सुटले सुमनांविणें ते !
कार्यें कशीं घडति ? कारण जेथ नाहीं,
शंका इथें धरूं नको सुजना मना ! ही. ३७

आहे विधान तव संशयवारणाचें,
येथें वसे सकल कारण कारणांचें;
येथें म्हणोनि जितुकेहि निविष्ट झाले,
ते संयमी मग इथेंच सदा रिझाले. ३८

माझ्या मना ! सवंगड्या, थिजलास कांरे ?
गेली कुठें चपलता तव चार सारे ?
फेंकोनि दे गवसणी तव मूर्च्छना ही,
हो सावधान ! रसिका, निरखोनि पाहीं ! ३९

आनंदसिंधु ! नहि अंत न पार याला,
नानाविधोपनिषदें श्रुति गाति याला;
आनंद, यास दुसरे न तरंग तात !
तेजें जयांवरि असंख्य तरंगतात. ४०

देदीप्यमान जलधी वडवानलें तो,
तैसाच हा मजसि दिव्य दिसोनि येतो;
हा चित्कलामय कलाप अनंत ज्याचा,
तो नाथ हा बघ अनंत जगांयुगांचा. ४१

कोटी विजा गरगरां फिरतात भोंतीं,
ज्योती मधें किमपि एक नमो नमो ती !
येथें मना ! विरमली जरि वेदवाणी,
वाणी तरी मग किती मम दीनवाणी ! ४२

येथें नसे बल, नसे गति वा तियेतें,
येथें महामनहि उन्मनतेस येतें !
येथें असें किमपि हें तरि काय आहे ?
येथेंच तें बघ मना ! न हि अन्यथा हें. ४३

येथें अगा ! उगम त्या निगमागमांचे,
येथें रहस्य उघडे स्थिरजंगमांचें;
हो राम–धर्म–सुमनोघटनाहि येथें,
गाण्डीवशक्ति मिळवी नर पार्थ येथें. ४४

येथोनि आदिकवि कोकिलसा अगा, तो
रामायणासम मनोरम काव्य गातो;
'संगीत' सर्व जगतांतिल एक गीता,
ये तीहि येथुनि पुराणपतिप्रणीता. ४५

येथें गुरू विसरले परकेपणाला,
जाणोनि जाणविति आपण आपणांला;
विद्या, कला, कुशलता, सकला गुणांचें
माहेर हेंच तव पूर्वज नैपुणांचें. ४६

सारांश, जें म्हणुनि आज तुझ्यांत नाहीं,
येथोनि तें मिळविलें तव पूर्वजांहीं;
गेलेंच तें; जरि पुन्हां मिळवावयाचें,
या ज्योतिरूप करिं साधन माधवाचें. ४७

रे, या दयाघन रमा–धव साधनाला
वेंचावया तुज नको ऋणको ! धनाला;
लावोनि नित्य लय एक अनन्यभावें
ध्यावेंच, यामधिं निरंतर लीन व्हावें. ४८

जैशी मधांत गढते मधुमक्षिका ही,
तैसाच तूं सतत यांत निमग्न राहीं;
हें केलियास मग किंबहुना वदावें—
होशील हाच दुसरा प्रकृतिप्रभावें ! ४९

तूं शिल्पकार तुझिया भवितव्यतेचा,
घे लाभ या करुनि वास्तव दिव्यतेचा;
अक्षय्य हो नखशिखान्त नवा वसंत—
हा जेविं माधव वसंत अनाद्यनंत ! ५०

रे, हा पुरातन वसंत जया शरीरीं
खेळेल तो नर कदा न करील ‘री री !’
त्याला असेल जडला क्षय दैवयोगें,
हा घालवील तरि तोहि निजप्रयोगें. ५१

आहे जशी किमपि ऐच्छिक शक्ति याला,
राहील होउनि तशी वश ती तयाला;
तो वास दिव्य–बलवंत करील जेथें,
वासंतवैभव सदैव वसेल तेथें. ५२

संवत्सर–प्रतिपदा सुमुहूर्त आज,
आरंभितां त्वरित यावरि होय काज;
प्रेमानुपान तरि लावुनियां पसंत,
तूं घे म्हणोनि “जय माधव !” हा वसंत. ५३

**प्रकाशन**—करमणूक,
जादा वसंत अंक, १ एप्रिल १९११.
अभिनव काव्यमाला, भाग २ रा १९१४.

---

## हिंदवंदना.



(१)

जिच्यावरि वितान हें गगन इंद्रनीलापरी,
जिच्या तळपतो शिरीं हिमगिरी किरीटापरी,
जिच्यावरि नद्या, झरे, नहि जवाहिरें गोमटीं,
जिच्या घन वनस्पती, परि न पैठणी पोपटी.
जिचें पदकपीठ हें, जन म्हणोत लंका रिते,
सुवर्णकलशापरी पदतलें अलंकारितें;
अशा सुकलशावरी, विपुल मुक्तरत्नासनीं,
जिला विधि विराजवी, किमपि धन्य तो या जनीं !
जिला जलधिरूप हा वरुण अर्घपाद्यें करी,
जिलाहि अभिषेकितो वरुनि मंत्रघोषें हरी,
जिला सजविते उषा, अरुण मंगलें दे महा,
जिला रवि निवेदितो बहुविधान्न-नैवेद्य हा;
पलाश फुलल्यामुळें सकळ रंगतां जंगलें,
रसाल-फल-तोरणें डुलुनि राहतां मंगलें,
वनीं झुलुनि राहतां ध्वनि सरंध्र वंशांतले,
जिला मधु निवेदिती मधुपयक्ष कोशांतलें;
जिच्या खुलति केशरी फुलमळे ललाटास ते,
गुलाब-सुविकास, तें स्मित जिचें मला भासतें,
जिचीं अमृतमंडलें मृगमदें सुगंधी किती !
किती भरतबालकें जननि वत्सला धन्य ती.!
अनेक वनदेवता करिति वायनें, श्रीफळें,
समर्पिति उपायनें, बहु विडे, फळें, पोफळें;
जिच्यावरुनि चामरें मिरवतात गंगावनीं,
जिला मलयवात हे करिति विंझणे चंदनीं;
फुलें वरुनि वर्षती सुरतरूच गंधर्व कीं !
मयूर-नट नाचती अभिनयें लता-नर्तकी,

जिला रमविती महाकवि-विहंग संगीतकीं,
जिचें हृदय होतसे ध्वनितरंग-रंगीत की !
जिचे विजयदुंदुभी करिति गर्जना केसरी,
अशेषजनवंद्य जी जननि राजराजेश्वरी,
जिला बघुनि संभवे किमपि काव्यसंवेदना,
तिलाच ' उदयोऽस्तु ते !' म्हणुनि ही असे वंदना.
अतीव मधुराश्रुनें पद धुवोनि देवी ! तुझे,
तयांस निज मानसा-मधिल वाहिलीं अंबुजें;
शराव न शरीर हें, घुमति धूप हे प्राण तों,
तुझ्यावरुनि जीव हा रुचिर दीप ओंवाळितों.
अये जननि ! माझिया हृदयरूप कुंडांतला
न भाव परि हव्यवाट् धगधगाट हा पेटला;
न काव्य तव हव्य हें, तुज दिली तदीयाहुती,
अशेष निज ओज ही वरुनि आज्य-पूर्णाहुती.
फिरोनि ' उदयोऽस्तु ते !' म्हणुनि ही असे वंदना,
मिलिंदनयने ! पहा जननि हिंद ! बंदीजना;
तटस्थ कर जोडुनी तुजपुढें उभा राहतों,
अशेष मम भावना नयनिं योजुनी पाहतों;
अये भुवनसुंदरी ! दिससि गे जशी जानकी.
तिलाहि उपमान तूं, तुजसि ती, नसे आन की,
तुला बघत राहतां हरपते क्षुधा वा तृषा,
तुझी शपथ सांगतों. वचन हें नव्हे गे मृषा.
जसें किमपि रूप हें, गुण तसेच. वानूं किती !
जणों गगनदीप ते झळकतात, मोजूं किती !
तटस्थ मन होतसे, जणु अनन्तपारापुढें
पयोनिधिपुढें नवें जनित बाळ तें बापुडें.
तुझे गिरि, तुझ्या शिला, बहुपरी तुझ्या वालुका,
तुझें खनिज, सम्मणी, रस तुझे, तुझ्या मृत्तिका,

महार्णव तुझा, तुझे विविध धाकुटे सागर,
तयांतुनि कितेक तों दिसति मुक्त-वैरागर.
मुखें, नद, नद्या तुझ्या, धबधबे तुझे कालवे,
झरे, अमृत पाझरे ! रजतरूप ओढे नवे,
सरें, कमलपल्वलें, विपुल कूप, वापी किती,
रुची गुणहि भिन्न ते; प्रकृति भिन्न तैशा कृती.
अनेक गवतें तुझीं, विविध कंदमूलें तुझीं,
तुझे तरु, तुझ्या लता, गुणनिधान पत्रें तुझीं,
अनेक-गुणगंधिनी तव सुरम्य रंगी फुलें,
किती रसगुणाढ्य तीं तव अनेक रंगी फलें !
अमोल गुणवंत तीं असति भिन्न बीजें किती !
अनेकविध धान्य तें तव वदूं वदान्ये ! किती !
अगाध गुणवर्णनीं भरुनि राहिल्या संहिता !
हितार्थ अमुच्या किती असति देवि ! भारांकिता !
अनंत कृमिराष्ट्र हें ! नृपति रेशमाचा किडा,
न शेष दिसतो तिथें अजगर प्रभू रोकडा !
अनेकविध मक्षिका, मधुकरीच राणी असे,
पतंग सगळेच तों मिरवतात राजे जसे !
तुझीं जलचरें अहो ! किमपि सृष्टि ही दूसरी,
तिमी, मकर, हे प्रभू करिति राज्य हीच्यावरी;
विशाल मृगराष्ट्र हें ! असति सिंह सिंहासनीं,
विशाल खगराष्ट्र हें ! गरुड नेमिले शासनीं;
तुझीं निबिड काननें, नभ जिथें दिसे ना दिसे,
भयाण दिनरूपही, रजनिरूप तेथें कसें ?
विशाल कुरणें तुझीं, कळप, ज्यांत खिल्लार तें
चरोनि गळघंटिका विचरतां टणत्कारितें;
खळीं, तव जिराइतें, तव समृद्ध बागाइतें,
जयांमधुनि धांवती उदकपाट सैराट ते,

सुमंगल मनोहरा झुलति दाट आम्रावली,
विशाल वट ते तुझे, सुखद सर्वदा सांवली;
निरामय, निवांत तीं तरुततींत खेडीं तुझीं,
अनेक–रचनागुणान्वित अनेक गांवें तुझीं,
तुझीं लघुपुरें परो-परि अनेक पेठा तुझ्या,
महानगर–बंदरें, विविध राजधान्या तुझ्या;
स्थळें कितिक यांतलीं अति पुरातनत्वामुळें
महत्व तरि पावती कितिक देवधर्मांमुळें;
प्रसिद्ध असती जरी कुणि निजेतिहासामुळें,
तरी धरिति थोरवी कुणि निजोद्यमांच्या बळें;
कुणांत धनधान्यता तरि कुणांत वाग्देवता,
कलाकुशलता वसे तरि कुणांत लावण्यता;
निसर्गरमणीयता, तरि कुणांत आरोग्यता,
तुझ्या बहुविध स्थलीं बहुविधा अशी योग्यता.
तुझे विविध जातिचे, प्रकृति–रीतिचे लोक ते,
तदीय पुरुषार्थ ते, विविध मौज वा शौक ते,
मदीय नयनांपुढें बहुत चित्रमेघांपरी
कलाप पसरोनियां करिति मन्मती बावरी !
युगानुयुग चालली तव असंख्य राजावळी,
प्रचंड घटयंत्रशी गुणजलें उणी आगळी;
स्वकीय गुणकर्म जें जल तिनें तुला वाहिलें,
सतीर्थ इतिहास ते भरुनि अंबुधी राहिले.
युगानुयुग जे तुझे मुनि उपासुनी भर्ग तो,
कुशाग्र मतिनें इथें वसविती महास्वर्ग तो,
सुदिव्य निज दर्शनीं दश दिशांतुनीं ते स्वतां
बघोनि, म्हणती जनां भरियली गुणातीतता !
तदीय उपनेत्र तें सहज ठेवितों नेत्रकीं,
क्षणैक अवलोकितों धरुनि भाव सर्वत्र कीं;

खरेंच ! दिसतें अतां सकल एक चैतन्य तें,
तुझें सकल रूप हें दिसतसे परंब्रह्म तें.
इथें गुण अनन्य हा उरतसे गुणातीतता,
इथें परमकाव्य हें धरुनि राहणें मूकता;
इथें उटजवास हा सुखद वैजयंतापरी,
इथें मज निजैकता गुणवती, सती, सुंदरी.
इथें लवणभाकरी अमृत हेंच माझें मला,
इथें मखमला मला गमति माझिया कंबला;
इथें त्रिविध ताप ही मलयचंदनाची उटी,
इथें बिकट संकटें सुमनमाळ ही गोमटी.
इथें परमतत्त्व ही निज अजिंक्य संपन्नता,
इथें सकळ लाभलें दिसतसेच तें लाभतां;
इथें तनुनिपात हा किमपि योग सर्वांगसा,
इथें तनुवियोग हा सहजसा समाधी जसा.
तनूस परमा गती विलय झालिया भारतीं,
मनास परमोन्नती विलय केलिया भारतीं;
सुकीर्ति जरि भारती तरि कशास रंभा, रती ?
अशेष भुवनें, सुखें, वसति भारतीं भारतीं.
तुझ्या उदरिं जन्मलों, मज नसो पुन्हां जन्मणें,
परं च असलें, तरी जननि हिंद हो ! मी म्हणें.
फिरोनि 'उदयोऽस्तु ते !' म्हणुनि हिंद ! ही वंदना;
अशेष तव नंदनां करिं कृतार्थ बंदीजना.
तुझा प्रणयपाश हा कसुनि राहिला सारखा,
न मुक्त जगतांतही मनुज माझियासारखा;
अये जननि हिंद ! हा किमपि इंद्रजालापरी !
कसे जसजसा तसा अधिक मोचनातें करी ! ३४

प्रकाशन—करमणूक दिल्लीदरबार—जादा अंक.
ता. २३-१२-१९११.

# राजनीतिगीतिका.



[ चाल—करतालचंचलकंकणस्वनमिश्रणेन मनोरमा. ]

गणना नसे भुवनांस ज्या अधिराज्य त्यांवरि जो करी,
अनुशासनें निज चालवी निजतंत्र जो तितुक्यांवरी;
महिमा यदीय न जाणवे, बल, कर्मकौशल, योजना,
स्वकृपेंचि तो प्रभु योजितो तुज सार्वभौम नृपासना.
वरतोनि तो तुज पाहतो, अवनम्र हो प्रभुला, नृपा !
करसंपुटीं तव आदरीं वरसाह्य ती महती कृपा !
प्रणमोनियां गुरुतात हे निज राजधर्म समाचरीं,
प्रभुचेंच आसन थोर !—हें अति थोर !—मंडित तूं करीं.
अवधान दे ! जयगान हें सुरसप्तकांतुनि वाजतें,
सुरसंघसें दरबार हें मनुजेंद्र ! आज विराजितें !
क्षितिमंडलांतुनि लोटिलीं अधिराज ! हीं अभिनंदनें,
करितो पुरातन जाणता तुज हिंद हीं अभिवंदनें.
तव मांडलीक नृपाल हे, अधिकारधारक हे पहा !
बहुतारकावलयांत या जणुं चंद्रमंडल तूं महा !
गुणरूपमंडित ही तुझ्या सहजासनीं अधिरोहिणी
तव देवि मेरि विराजते सहचारिणी जणुं रोहिणी !
निज मंडलेश्वर तूं ! तुला जगदीश देउ चिरायुतें !
निज मानसें प्रभु तो करो उभयोदधीसम संयुतें !
करभार थोर, अमोलशीं तुजला मिळोत उपायनें !
जन भारतांतिल गातसो तव कीर्तिचीं मधु गायनें !
असती अलंकृत आज ज्या अधिराज ! धर्मपदावरी,
गुण त्या नृपांतिल वेचके रुचतील घे तरि अंतरीं;
परतोनि तूं बघशील का अभिराम रामपदाकडे ?
नमुनाच तो नृपनीतिचा धरिशील का तुझियापुढें ?
जरि पाहिजे नृप जॉर्ज ! ती तुज रामकीर्ति निरंजनीं,

तरि योज सर्वेंहि साधनें जनरंजनीं ! जनरंजनीं ! !
जनरंजनीं रममाण हो ! निज जॉर्जनामक राम हो !
अधिराज्य हें तव रामराज्यसमान मंगलधाम हो !

× × ×

अनुरागबंधन बंधनीं ! सकलांस तें प्रिय आयतें,
न तयापुढें जगतांतले तगतात अन्य उपाय ते;
तरि, ठेव बांधुनि हिंद त्या अनुपम्य रम्य निबंधनें,
मग आर्यवंश करील हा तव मूर्तिपूजन-वंदनें.
जितुकें नृपा ! परलोकिंचें तव राज्य निर्भय बैबलें,
तितुकेंच होइल येथलें जनतोष ह्याच महाबलें;
तरि, तें महाबल बैबलासम मानुनी मिळवीं सदा,
समतोल येथिल तेथली करि तूं तुझी यश-संपदा.
समयास या प्रभुरामरीति न साजली पटली तरी,
निज कार्यधोरण ठेव तूं स्वपित्याचिया जननीपरी;
इतिहास येथिल पाहतां, तव नाम त्यांत ‘ सुजॉर्ज ’ हें,
अमृताक्षरीं लिहिलें दिसो ! मम सूचना शत अर्ज हे !
अधिराज ! बीजचि आज त्वां जणुं पेरिलें हित-बोल ते,
कृतिचीं पिकें पिकतांच हो प्रकृतींस अन्न अमोल तें !
स्वहितार्थ तूं करिं गा, सदा कृतिनें प्रजाहितपोषणा,
जगतांतही मग पावसी अभिनंदनें जयघोषणा !
व्यवहार जाणिसि; वेष्टिलें तुज राजकार्यधुरंधरीं,
परि राजनैष्ठिक काव्यकारहि आज मौन कसें धरी ?
तरि, आर्जवें नृप जॉर्ज ! ही सुचवावया हितनीतिका,
कवि ‘ चंद्रशेखर ’ गातसे तुज चारुचामरगीतिका. ५

प्रकाशन—मनोरंजन,
१९११.

---

# बालबोध.



[ ही कविता कै. वा. डायरेक्टर रा. ब. सीताराम विश्वनाथ पटवर्धन यांच्या खास सूचनेवरून अगदीं लहान मुलांसाठीं करण्यांत आली होती. हींत जोडाक्षर नाहीं. ]

दिशा रंगवीतो रवी तो चितारी,
जणो कोंबडा वाजवीतो तुतारी;
' उजाडे, उठा ! ' हेंच सांगावयाला
पहा लागलीं पांखरें गावयाला. १

गुणाची मनी; ही धुते तोंड कैसें !
बघोनी धुवावें मुलांनींहि तैसें.
सदा ठेवितो साफ सारेंच कांहीं,
निरोगी, सुखी, आवडे तो जनांही. २

असे गोबरा, बैसवी कानटाळीं,
असा कावळा कोण आणोनि पाळी ?
गुणी चोखटे छान राघूहि मैना
न दैना तयां; भोगिती काय चैना ! ३

शिका पोपटापासुनी बोध साधे
कसा बोलतो गोड " गोविंदराधे ! "
कळेना जरी भाव याचा तयातें,
तरी घोकितां पाप जातेंच जातें. ४

जिथें मंगलें आणि आनंद सारे
सदा नांदती देव आहे असारे !
तयाला सकाळीस आधीं नमावें,
नमावें गुरू—मायबापास भावें. ५

सुधेसारखें देतसे दूध गाय,
नमाहो तिचे पाय जाणोनि माय.

जियेकारणें देव गोपाळ झाला,
तिची थोरवी ये न वानावयाला. ६
खुळें कोंकरूं जें न आईस मानी,
तयाची करी लांडगा हाय ! हानी.
गुरूंना कथा ती कथायास सांगा,
जसे सांगती थोर तैसेच वागा. ७
अरे जोर काढा, करा बैठकाही,
तयांवांचुनी राम अंगांत नाहीं.
नसे राम आराम तेथें वसेना,
छळी पामराला बळी रोगसेना. ८
दिसा गोजिरे बाळ सारे नरांचे,
नका रे करूं चार हे वानरांचे !
असे लांडगा फार खादाडखाऊ,
तसा पोरगा तो तयाचाच भाऊ ! ९
इमानी टिपू ! खाउनी भाकरी तो
कशी चाकरी मालकाची करीतो.
चलेना कधीं नीट, खोडाळ घोडें,
तया बैसती काय चाबूक थोडे ? १०
न गुंगे न पेंगे करी काम मुंगी;
सदा येतसे आळशालाच गुंगी,
शिका रे शिका ! वेळ नाहीं फुकाचा.
अतां खेळतां काळ येना सुखाचा. ११
जगाचें असे ज्ञानभांडार भोतीं
वयें आपुलीं हें शिकायास कोतीं.
तरी का निराशा धरोनी निजावें ?
पहावें, शिकायांत रंगोनि जावें. १२

अप्रसिद्ध—बडोदें,
ता. २९-१-१९१३.

---

# ( नवयुगाचें ) स्वागत.



[ आज तागाईतच्या पाश्चात्य संस्कृतींनीं युक्त आणि सर्वांग सुंदर असें 'नव-युग' नावांचें मासिक पुस्तक मुंबईमध्यें नोव्हेंबर १९१३ पासून निघूं लागलें. त्याचा पहिला अंक भेटीदाखल कर्त्यांनीं मजकडे पाठविला असतां मी त्याचें स्वागत केलें तें येणेंप्रमाणें:—]

येउनि सामोरा मी स्वागत हें नवयुगा ! तुझें करितों;
सानंद साभिनंदन वंदुनि हृदयास या तुला धरितों.
दरबार भारतीचा ! शारदचंद्रप्रभा जणों पडली !
विविधासनांस तींतुनि योग्यांची योग्य योजना घडली.
विद्यातपोवनांतिल सिद्ध महर्षीच. हे स्वलेखांनीं
करिती येथ मनाचें संजीवन कीं सुधाभिषेकांनीं !
कविगंधर्व जणों हे करुनि इथें मंजुतान गानांला
वसुधेवरिल सुधेच्या या या म्हणती जनांस पानाला.
निजराष्ट्र आणि भाषा यांवरिचें प्रेम ज्यांतुनी भरलें,
त्या कवितामंत्रानें भारुनि मन, हें समंत मंतरलें !
तो जयनाद न, जादू ज्या शिंगांतुनि नभांत फैलावे,
पडसाद हा तयाचा प्रेमें परतोनि त्याकडे धांवे.
चकवायास निसर्गा चित्रकलेंतील जे धुरंधर ते
बैसोनि मूर्त येथें कलम विधीचेंच जाहले धरते.
आर्याङ्ग्ल—वाङ्मयांनीं मज वाटे मांडिला मजेदार
गुणरूपसाम्यतेनें हा दुसरा 'भ्रांतिकृत चमत्कार.'
कीं पूर्वपश्चिमेच्या भरती येउनि महामनोदधिला
परिरंभ हा तयांनीं लंघुनि सीमा परस्परांस दिला ?
किंवा सुधारलेल्या राष्ट्रांशीं एकतानता झाली,
तेणें हिंद ! तुला ही सरूपता येत चालली—आली !
किंवा वाग्वीणेशीं पावुनि लय अर्थ-हृद्वीणा ते
नादब्रह्म तयांचें लीन करूं हे निघे प्रवीणांतें ?

ध्येय अनुत्तम, धोरण सात्विक, भाषा प्रवाह रेवेचा,
रूप मनोहर, हेतू संतासम एक लोकसेवेचा;
नित्योपयोग, रंजन जनरुचि असली जरीहि भिन्न तिचें,
लाभ विशेष जयांतुनि नीतिज्ञानादि इहपरोन्नतिचे;
इतकें व्यापक, मोहक, हें तव बाह्यान्तरंग पाहून
तनु-वाङ्मनोधनांनीं तुला न घेईल कोण वाहून ?
लक्ष्मीसरस्वतींनीं चिरायु, चातुर्य नवयुगा ! द्यावीं;
सद्भिरुचिज्ञानाच्या विस्ताराचीं यशें तुला यावीं. १५

प्रकाशन–नवयुग,
वर्ष १, अंक ३, जान्यूआरी १९१४.

## अद्भुत वीणा.

—:०:—

( चाल—केशवकरणी अगाध लीला. )

( १ )

विश्वामाजीं सात चमत्कृति म्हणती पंडित, कवी,
असे ही परि वीणा आठवी. १
खोंटुनि कर्कश तर्क-वंश तो, दोन तया जोडिले
भोपळे द्यावा-पृथिवी भले. २
बहु भुवनांच्या पडद्यांवरुनी सु-मनोगुण धांवती,
इथुनि ते स्वर्गाला पावती. ३
वाजवुनी ते गायन करिती वाग्देवीच्या सख्या
स्वरांनीं गंधर्वांसारख्या. ४
तदंगुलींतुनि खेळतसे जणु सुधाच कीं साच ते–
ब्रह्म तैं थै थै कीं नाचतें ? ५
वीणेसंगें संगम पावति, दिव्य स्वर धांवती
सभोंतीं अनंत नादाविती. ६

( २ )

शांत गभीरहि उदात्त ऐसा मध्यम लावुनि महा
गातसे करुणकुमारी पहा ! ७

सचिंत चर्या या देवीची न हि ती दुःखामुळें
तिच्यांतिल तत्त्व असे वेगळें. ८
परमेशाच्या कारुण्याचा मनीं पडोनी ठसा,
ठशाचा होय मुखीं कवडसा. ९
हिच्या स्वराच्या प्रतिध्वनीपरि ही वीणा बोलते,
नादलय गगनीं आंदोलतें. १०
गान नव्हे हा करुणरसाचा सागर हेलावला,
असें हें परिसुनि भासे मला. ११

( ३ )

अनुतापाच्या नेत्रांतुनि जीं ठळक महा सोज्ज्वळें
गळालीं खळखळ मुक्ताफळें, १२
हार तयांचा हृदयीं झळके निटिलावरि बिजवरा
जियेच्या इंदुकलेचा खरा. १३
ती ही देवी सहानुभूती प्रेमाश्रू गाळिते,
रुणझुण वीणागुण चाळिते. १४
जगताचीं सुखदुःखें हीच्या मनोगतांसंगतीं
मिळोनी ध्वनिचित्रें रंगती. १५

( ४ )

अनंततरुचीं फुलें सुगंधी कधीं न कोमेजती,
कचांतुनि तीच जिच्या साजती, १६
शुक्रासम ती संतत कांती नयनांतुनि धांवते
विसांवा निरंतरीं पावते. १७
तिथेंच जीच्या मुखबिंबाचा प्रसन्न दिसतो ठसा,
चंद्रमा आदर्शांतुनि जसा. १८
हीच हिच्यापरि मनोमोहिनी आशागौरी दिसे,
लाविते ही जगताला पिसें ! १९
सारे तारे ऐकुनि हीचा अमृतध्वनि सारिखा
पावती अति संभ्रम हारिखा. २०

( ५ )

नायक संख्यातीत जगांचा बघते तितक्यांतुनी
किती ही तृषार्त्तशा लोचनीं ! २१
परमानंदीं विलीन झाली ही आपुलिया मनें,
मुखानें करिते हरिकीर्तनें. २२
अनंत हस्तीं अनंत जीवां अनंत वर दे सदा
वाहवी उदारतेच्या नदा, २३
तदौदार्य कीं ब्रह्मपुत्र तो या देवी मानसा
सोडुनी मुखगामी हो जसा. २४
गाते, दृढतम भावतंतुतें संतत ही वाजवी
भाविनी ब्रह्मांडें गाजवी. २५
या गानाच्या तुंग तरंगीं विभुवैभव तळपतें,
चंद्रिका जणु सागरिं झळकतें ! २६

( ६ )

विरल धवलसें विलसे जीचें वसन धुक्यासारखें,
कांतिही व्याधासम लखलखे, २७
हृदयामाजीं स्फुरण पावुनी नयनांतुनि ते प्रभा
जियेच्या झळके विद्युन्निभा, २८
तया प्रभेच्या झोतासरशीं प्रकाशमय ही क्षणी
घालिते जगताला गवसणी ! २९
थरकति तारे, किरणमिषानें पुलकित दिसती मला
मंगल गातां ही प्रेमला. ३०

( ७ )

मेरुगिरीचीं मणिमय शिखरें अरुणवर्ण जी करी
शाश्वत उषःप्रभा सुंदरी, ३१
पाहुनि तीचें महैश्वर्य तें सदैव वैभव महा
तयांची ही करिताहे स्पृहा, ३२
दिसे हिला कीं, उदयोन्मुख त्या दिव्य अनंतामधीं
आपुल्या परमहिताचा निधी, ३३

म्हणोनि ही त्या उषेलाच घे श्वासें आकर्षुनी
योगिनी देवी उत्कर्षिणी. ३४
यत्नांतिल जी रत्नचारुता, प्रभाव इच्छेंतला,
तयांचा घोष हिनें घेतला. ३५

(८)

सरस्वतीच्या दक्षिण चरणीं सहा देवतांवरी
जी निज अधिकारासन धरी, ३६
मणिमुकुटानें मुखचर्येनें उपासना ती दिसे
बिंबचि वाग्देवीचें जसें. ३७
साहींचेही गुणौघ तीच्या मनांत लय पावती,
नद्या जणुं महार्णवीं मावती. ३८
तिच्या मनाचे तरंग मिळुनी वाग्देवी मानसा
होतसे सागरसंगम जसा. ३९
झणि वीणागुण झणत्कारिते किती निपुण ती पहा!
दैवी संगीतच हें महा! ४०
भूलोकाहुनि सुरलोकीं तें दिव्य लयें धांवतें,
तिथेंही प्रतिध्वनी पावतें. ४१
स्थिर-जंगम जे ऐकुनि गाती हृदयंगम गान तें
करूं या! उपासना–गान तें. ४२

(९)

त्या गानाचे प्रतिध्वनी ही अद्भुतवीणा करी,
संतत झडते अभ्यंतरीं. ४३
कधीं न हीचा नाद ऐकतो, कधीं न ही पाहतो,
वृथा तो नर नरता वाहतो! ४४
शुद्ध नसे तो, पूर्णहि नोहे; सदैव दैवी कला
तयाची गेली सागरतला. ४५
अज्ञानाच्या घनांधकारीं ठाव नसे जेथला,
समाधी तेथ तिनें घेतला. ४६

शार्दूल०

प्याला आणि पितोहि जो सतत ही वीणासुधास्यंदनें,
त्याला सर्व जनें तशींच विजनें झालीं वनें नंदनें;
त्याला वत्सल देवता लगबगां देतात आलिंगनें,
त्याला सर्व परिस्थितींत मिळती तीं दिव्य आनंदनें. ४७

प्रकाशन—नवयुग, पु. १, अंक, ५,
मार्च १९१४.

---

## अश्रुकरभार.

—०—

अर्वाचीन कवींच्या विलससि अग्रेसरांत तूं आर्या !
आर्या तव रसिकांना आवडल्या—जाहल्या शिरोधार्या. १
साधी प्रसन्न सुमधुर तव भाषेची अनन्य ती शैली
गंगाधरा ! विराजे धवलगिरीतुल्य कीर्तिच्या शैलीं. २
कादंबरी—कथानक निरूपितां ठेविलीस जी सरणी,
कथितिल कथा कवी ते धरोत ती आपल्या सदा स्मरणीं. ३
लिहिती ग्रंथ मराठी त्यांना जी "प्रार्थना" तुवां केली,
गेली न ती वृथा तद्-हृदयीं आहे करोनियां केली. ४
सप्रेम "मोगऱ्याचीं फुलें" दिलीं त्वां मदीय हातांत,
तीं लाटिलीं कुणी तरि, मजपाशीं नसति आज हा तात ! ५
गेलीं ! तरी स्वकीय स्नेह सुगंधी करोनि तीं गेलीं;
दिसती न मोगरे तरि बहार त्यांनीं मला गमे केली. ६
निज काव्यवाङ्मयाचीं केलीं सिंहावलोकनें ज्यांनीं,
तुजसि गुणी गुणरागी गौरविती ते यथार्थ अभिमानी* ७
साधा रे साधा तूं साधो ! स्नेहाळ आणि उपकारी,
कृत्रिम तुला न ठावें साह्य तुझें जाहलें मला भारी. ८

---

* कै. वा. न्या. मू. म. गो. रानडे; रा. सा. गो. वा. कानिटकर इ०.

भेटेन केधवां तरि, पंत ! अशी धरुनि मी असे खंत,
होते भेट कशाला ? पंतांचा हाय जाहला अंत ! ९

आतां दिवंगताशीं स्नेहाच्या विनिमयास आधार,
एकचि उरला; तो हा दिला तुला केवलाश्रु-करभार. १०

अश्रूंवांचुनि दुसरें येथें स्वर्गीयसें दिसेना तें;
ह्यांनींच तेथल्यांशीं बांधव येथील बांधिती नातें. ११

कीं दंहिवरेंच साचीं करुणरसाचीं सुदिव्य निर्मळ तीं,
मुखकमलावरि गळती, प्रणयरवीच्या प्रभेंत झळझळती. १२

घेवोनि हृद्गताला जंव नेत्रांतूनि चालती धारा,
तंव निर्वाणपदींही तारेवांचून पोंचती तारा. १३

प्रेमाचें, काव्याचें, सुखदुःखांचें असेल जरि कांहीं
पर्यवसान अनुत्तम, तरि तें अश्रूंविना दुजें नाहीं. १४

नाहीं स्पृहा कशाची, माझें रडणें नसेंचि मोलाचें,
कविमित्रा ! तुजवरिच्या प्रेमाचें, हें तया अमोलाचें. १५

गेलेच मोगरे कवि ! नेले नंदनवनांत दूतांनीं;
येती परत कशाचे ! पिउनि सुधा रंगले दिवंगांनीं. १६

आतां रिक्त तयांची येथिल मंडित करावया जागा
येतो पुढें कवण तो ? पाहूं द्या मज तया महाभागा. १७

प्रकाशन—नवयुग,
वर्ष २, एप्रील १९१५.

---

## महाराष्ट्र-दर्शन.



नित्यं ब्रह्म यथा स्मरन्ति मुनयो, हंसा यथा मानसम्, ।
सारङ्गा जलदागमं, वनगजा ध्यायन्ति रेवां यथा; ॥
युष्मद्दर्शनलालसा. प्रतिदिनं युष्मान्स्मरामो वयम् ।
धन्यश्चिन्तितवासरोऽयमुदितो यत्रावयोः संगमः ॥ १ ॥

पृथ्वी

सचेतन सुमूर्तिमान् मजपुढें महाराष्ट्र हा,
द्वितीय मम जीव हा, हृदय हा, जिव्हाळाचि हा;
रसाल कवितेस हा उगम, तींतलें ओज हा,
तुडुंब भरला दिसे प्रणय हा, महानंद हा. १
सबाष्प नयनें, उभा जवळ, पाहतो यास मी,
निघे न परि शब्दही, मन जणो भ्रमे संभ्रमीं;
अति प्रणय ज्यांमधीं, सुचिर दर्शनीं त्यांमधीं
असाच घडणार हा मधुर मुग्धतेचा विधी. २
अहो नयन चांगले असुनिही दिसेना मला,
मुका नसुनि तोतरा सहज बोलवेना मला;
मतीहि ढळली नसे, तरि कसें सुचेना मला ?
किती मन उचंबळे ! परि न दावितां ये मला. ३
तयांतिल तरंग हे थडकती तरंगांवरी,
उभे पुलक राहिले स्फुरणशील अंगांवरी;
मृणाल–बिसतंतुला मृदुल बंध जो लाजवी,
तयें नखशिखान्तसा जखडिला इथें हा कवी; ४
कुणी न बघती तया किमपि बंधना कोमला,
विमुक्त दिसतो जरी, तरि न हालवे हो मला !
महा प्रबल शृंखला दगड घालुनी तोडवे,
कसोनि परि बंध हा मज न तोडवे सोडवे. ५
बऱ्या निगड बंधनीं घडति ज्या मना वेदना,
महा कठिण ह्या परी प्रणय-बंध-संवेदना !
किती सुखद दुःख हें ! अमृतही फिकें यापुढें,
गमेल मज मुक्तिचें सुखहि यापुढें बापुडें. ६
किती दिवस भेटलों न हि मदीय राष्ट्रा ! तुला
खरेंच ! न विचारलें कुशलही सुराष्ट्रा ! तुला;
अगा ! वद खुशाल तूं असिसि का जिवाच्या जिवा !
तुझ्यासह न बोललों म्हणुनि रोष केला तुवां ? ७

परी क्वचित् मौन हें प्रवचनें करी प्रीतिचीं,
 तयांत हृदयंगमें असतिही प्रमेयें तिचीं;
मुकें कमल बोलतें, मधुर काय उद्गार ते !
 किती भ्रमर ऐकती हितगुजांतलें सार तें ! ८

न येति परिसावया हृदय जेधवां कांपतें,
 रसाल फुलल्यावरी घुमति पंचमालाप ते;
तरी, करुं नको असें, धरुं नको मनीं कितुला,
 तुला समजतों किती प्रिय, नसे तयाची तुला. ९

तुला कधिं बघेन मी म्हणुनि नित्य खंतावलों,
 तुलाच मम वाङ्मनें परिकरावया धांवलों;
स्वबंधु, अभिराम तूं, मजसि भेटसी राम तूं,
 तुला बघुनि येतसे भरत-भाव माझा उतूं. १०

विराज झणि माझिया हृदयरूप सिंहासनीं,
 स्वयेंच अभिषेकितों नयनसिंधुच्या सिंचनीं;
इथें प्रणयमंत्र हे प्रणवमंत्र घोषापरी,
 इथें सु-कवनें तुरें, भरिति मंगलें, माधुरी. ११

स्वराज्य मन आमुचें तदुपरी महाराष्ट्र ! तूं
 प्रभामय विराजसी, असिसि राजसा राम तूं;
बघोनि उदयाचलीं मदभिराम-चंद्रा ! तुला
 चकोर कवि हा तुझा उडुनि आज आलंबला. १२

अनंत विमलान्तरीं तरति कल्पनेचीं पिसें,
 अखंड तव मंडला-विण मला न कांहीं दिसे;
सतेज अनुराग दे तुजसि आकुलनामा रवी
 पिशंग तुज रंग ये उदयकालची थोरवी. १३

अशेष घडतील ह्या तव कला त्वरें सोज्ज्वला,
 विशेष दिसशील तूं प्रिय सुराष्ट्र-चंद्रा ! मला;
अनंत अवधी-मधीं तव कृपा सुधास्यंदिनी
 जणों धवल चंद्रिका अनुभवीन आनंदिनी. १४

अगा जिवलगा ! तुला त्यजुनि सांग जाऊं कुठें ?
वनांत कवनास या रुदनतुल्य गाऊं कुठें ?
तुझ्यास्तव भवांतले प्रबल पाश तोडीन मी,
परी कधिं न मोडिलें मन तुझें न मोडीन मी. १५

तुझ्यास्तव शरौघही हृदयवज्र साहील हें,
परी दुखवलास तूं कुसुम तों न राहील हें.
असें–अदय अंतकें–हृदय भेदिलें, छेदिलें
तरी, प्रणय तत्त्व हें तुजसि मी दिलें तें दिलें. १६

मला तव उपासका व्रत तुझीच आराधना,
करुनि साधतां सकल साधली साधना;
सुराष्ट्र ! तुजकारणीं विधि मला असा जन्मवी,
प्रसन्न न करी तुझें मन तरी कशाचा कवी ! १७

परेमधिल शब्दहो ! क्षणि उभे रहा की रहा !
वसंतपवनावरी झुळझुळां वहाहो वहा !
म्हणा प्रणयगान या मदभिरामचंद्रास या !
न ये परत वाल्मिकी ! हटुनि बैसतां कासया. १८

चारुचामर.

जड भाव पार्थिव राहिले बहु खालती पृथिवीवरी,
नुसतें अनंत सभोंवती दिसतें महा जलधीपरी;
विलसे तयावरि चिन्मयी तव चंद्रिका अमृतोपमा,
बघ रामचंद्र ! तुझीच ही प्रिय जानकी अथवा रमा. १९

श्रुति, तत्त्व, शास्त्र, कला, तसे इतिहास, वाङ्मय जाणते
तव लोक हे अवलोकितों ग्रह-तारकादि-समान ते;
अयि राष्ट्र, ह्या जनतेंतुनी तव तत्त्व एकचि वागतें,
स्थिरजंगमांतुनि ज्यापरी परमात्मतेज विभागतें. २०

परमात्मतेज तसें तुझें अधिकोन तत्त्व वसे जसें,
जय, वंदनें, अभिनंदनें जन पावती सहजीं तसें;
परि तन्निधी यतिनां जसा, कविंनां तसा गमनीय तूं,
कमनीय तूं, रणमीय तूं, जगतासही नमनीय तूं. २१

प्रकाशन–नवयुग, पु. २ रें,
अंक ८ वा, जून १९१५.

# स्नेहाची थोरवी.



आरोग्य निज वयाचा जरि दुःखाच्या बहु प्रकारांनीं
व्यापुनि गमे यमाच्या अंध तमाच्याच गवसलों रानीं, १
जरि बिकट संकटांचे भेदुनि विव्हळ, विलाप, कानांला
आपण थिजोनि गेलों जणु कीं नाहींच देहभानाला; २
तरि आपणांस असतां कोणी स्नेही खरा जिव्हाळयाचा,
संजीवनास देतो अमृतानल तो जणो हिंवाळयाचा. ३
हें स्नेहरूप शामक दुःखाच्या वेदना लया नेतें,
खवळोनि शोकसागर जातां त्यालाहि शांतता देतें. ४
सुख आणि दुःख असतें दैवाच्या ताजव्यांत समतोल,
स्नेहलवासहि लावा, कीं आले समतुलेस आन्दोल. ५
किंबहुना मग त्याची विशेषता ज्या असेल बाजूला
आनंदाचें अतिशय झुकवितसे वजन त्या तराजूला. ६
स्नेहापासुनि पावे जन्म अहो गोड गोड कळकळ ती
जी कालभार हलका करिते त्याची गतीहि वेगवती. ७
प्याला दुःखविषाचा प्याला केवळ परार्थ जो त्याला–
त्यालाच जाणतों मी ‘ स्नेही ’ पद थोर हें न भलत्याला. ८
स्नेहीच दुःखिताचा असतो दुसरा तसा न कनवाळू;
तेल तिळांतुनि मिळतें, मिळेल गाळूनि काय तें वाळू ? ९
अन्य-गुणादर करणें स्वभाव हा ज्या मनांतुनी वागे,
स्नेहज्योति तयांतचि दिव्य विजेच्या दिव्यापरी जागे. १०
करितात जे मनोलय आकाशांतील सुप्रकाशांत,
म्हणतात ते मुनी कीं स्नेहसुखाचें पदैक तें शांत. ११
तरि खिन्न मृत्युलोकीं निज दिव्योत्साह खेळवायाला
स्नेहावतरण झालें; वाटे अभिमान मौज गायाला. १२
येथें येउनि त्यानें हीं हृदयें किति पसंत मंतरिलीं !
ह्या नयनीं त्या तारा–नाथें स्वानंदचंद्रिका भरिली. १३

वाटे तो परमात्मा जीव इथें पाठवी तया कालीं
विमल स्नेहसुखाचें दिव्य असें कवच त्याजला घाली. १४

प्राणी प्राण जरी हें येतो घेऊनि येथ येतांना,
तेज, प्रभाव, त्यांतिल नेतो मृत्यू* तयास नेतांना. १५

स्नेहाविण गुण सारे फिके ! भयानें सळून पडतात;
शांतिस्तव ममतेच्या ठायीं जाउनि पळून दडतात. १६

त्याविण धर्म दुरावे, कृष्ण कुहू-रात्र होय त्या भंवतीं;
आनंददीप लोपे, हृदय गमे शून्य झोंपडें गवती. १७

जवळून आपणांतें धरिती जीं बंधनें समाजाचीं,
स्नेहावांचूनि भंगुर तींच तटातट तुटोनि जायाचीं. १८

मग असिपत्रवनासम दिसति जगांतील घोर देखावे;
केवळ भाऊ-गर्दी ! तेथें कोणी कुणास लेखावें ? १९

स्नेहावांचुनि मानव, हे होती श्वापदांहुनी झोड;
करिती परस्परांची ढवळ्या दिवसांहि लांडगेतोड ! २०

स्थिति किति कठिण असेना स्नेह जणो भारुनी तिला फिरवी;
अस्मानी चस्मा तो चंडातप चंद्रिकेपरी मिरवी. २१

क्षारोदधी खवळतो, प्रलयघनातुल्य गर्जना करितो,
तरि तो सुधाकराच्या उदयानें मौन शांतता धरितो. २२

स्व-दिवंगत-मित्राच्या शोकें मनिं भाव ये विरक्तीचा,
उजळे हृदयीं नंदा-दीप स्नेहाळ देवभक्तीचा. २३

---

* हें दिव्य स्नेहकवच, म्हणजे जीवात्म्याभोंवतीं असलेलें मायेचें आवरण. तें झांकोळून टाकण्यास किंवा त्यावर आपली सत्ता चालविण्यास मृत्यूशिवाय कोणीही समर्थ नाहीं. मृत्यू म्हणजे ? सृष्टि-स्थिति-लयाला कारण असलेला **सूर्य-रथदेव**. दुसरा नव्हे. जीवांस इहलोकीं तोच पाठवितो, तोच येथें त्यांचें पालन करितो, आणि तोच त्यांना आपल्या ठायीं लयास नेतो. अर्थात् जीवात्मा त्यांत लय पावतांना त्याच्या भोंवतींच्या मायेंतील, किंवा कवितेंत म्हटलेल्या स्नेहकवचांतील तेज व प्रभाव, हीं सूर्यतेजांत विलीन होतात असें मी मानितों.

भक्तीनें ही पृथिवी स्वर्गाला जरि कदापि नर नेतो*
स्नेहें तरि तो स्वर्गचि पृथिवीला झेंप घालुनी येतो.† २४
ह्या स्नेहदीपकांची आरास न हृदयमंदिरीं केली,
तीं माणसें अभागी, दुर्मुखलेलीं, जिवंत मेलेलीं ! २५
प्रारब्धाच्या चात्या ह्या विश्वाच्या विशाल गिरणींत
कालगतीनें फिरती त्यांची संख्याहि कल्पनातीत. २६
जीवनचरित्रसूत्रें त्यांपासुनि उकलती परोपरि तीं,
इष्ट जगत्-शेठातें वस्त्रें क्रियमाण तींच तीं करिती. २७
जीव मजूर बिचारे ! या व्यवसायें न काय हो दमती ?
स्नेहाच्या गमतीनें दमतां आयास भासती कमती. २८
ज्या खडकावरि जमलें स्वार्थाचें बुळबुळीत शेवाळें,
भोंतीं खलवृत्तींच्या जलवेलींचेंच माजलें जाळें, २९
पाषाणहृदय ऐसे जे जन दुर्धर ममत्व-मायेतें,
शीतल परदुःखातें पाहुनि ज्यांचें हंसें उता येतें. ३०
त्यांचें अगत्य आदर विनयी स्नेहास कोठुनी राहे ?
स्नेहें दूरुनि त्यांना सदा नमस्कार ठोकिला आहे. ३१
स्नेह कधींहि तयाशीं नहि सरकतवांटणी करायाचा;
प्रांजल सहानुभूती दावुनि त्यांना न आर्जवायाचा. ३२
स्नेही, स्वार्थपरायण, ह्यांचें आहे वियोग हें नातें;
स्व-स्वगुणाधिक्यानें हें नातें मात्र लांबलें जातें. ३३
रत निज-हितांत झाले, जे गेले बोंथटून गोठून,
ठेवा स्वानंदाचा देइल हा स्नेह त्यास कोठून ? ३४
नवनीतकोमलांना हितगुज सांगे विमुक्त हृदयानें,
त्यांवरि सहर्ष वर्षति या स्नेहाची अमोल वरदानें. ३५
पुंड नरांस निवारी, लेशहि मधु, सुमन हें न दाखवितें,
परि निज मधमाशांना सुरसकुतूहल यथेष्ट चाखवितें. ३६

प्रकाशन. नवयुग पु. ३ रें
अंक ३ रा, जानेवारी १९१६.

---

* तुकाराम. † गजेंद्रमोक्ष.

## धन्यवाद.

[ कै. वा. सौ. रमाबाई काटदरे, यांस. ]

देवी ! तुझा पति कवी रस जाणणारा,
येथें परंतु चतुरे, चकला बिचारा !
तो काव्य अंतिम तुझें ह्मणतो अपूर्ण,
गेलीस तूं करुनि तें परि पूर्ण पूर्ण. १
जें पूर्ण होय सहजीं स्वयमेव त्याला
द्यावा विजोड मग जोडुनि कासयाला ?
जाणोनि तात्विक तयांतिल आशयातें
सोडील माधव रमा-धव संशयातें. २
ठेवावयास्तव सदा निज नांव मागें
जो ध्यास, वेड अथवा तुजलागि लागे,
उद्विग्न त्यांत असतां तुज नीज येते,
तों स्वप्न तूं बघसि, अन्य ह्मणूं नये तें. ३
होतें खरोखरचि तें लटिक्या जगाचें,
ज्यांतील नाम अथवा नहि रूप साचें;
तें आज ना तरि उद्यां जरि जाय नाशा,
आशा तदीय करणें ह्मणजे दुराशा. ४
हा स्वप्न-भास लटिका, सगळा पसारा,
यांतील यत्नहि असाच असार सारा;
तत्वार्थ हा करुनि सूचित थांबलेलें
तें लीलयाच तव काव्य इतीस गेलें. ५
मृत्कुंभसंभृत जरी असलें, असेना !
पीयूष ! यास मज दोष मुळीं दिसेना.
मानोनि देशभगिनी ! तव हा प्रसाद
प्यालों, तुला कळवितों बहु धन्यवाद. ६

प्रकाशन—नवयुग.
जानेवारी १९१६.

# समजूत.

—:०:—

( राग—असावरी. )

राग नको आणूं ॥ कुमारा ॥ राग० ॥ ध्रुव० ॥

मन्मन सागर वात्सल्याचा,
अंत न लागे तुजला याचा,
यांत अनल तो तव वचनाचा
विझला परमाणू । कुमारा ॥ राग० ॥ १ ॥

तव ताताच्या निधनें झाला
जो व्रण माझ्या मृदु हृदयाला,
त्वद्गुणतैलें भरुनि निघाला,
हें सुख किति वानूं । कुमारा ॥ राग० ॥ २ ॥

दत्तमनाचा घेउनि शेला
ये भेटाया या आशेला,
ती ममता दे या ममतेला,
दत्त तुला मानूं । कुमारा ॥ राग० ॥ ३ ॥

लडिवाळा तूं प्रियतर कैसा ?
किंबहुना ? हा भास्कर जैसा.
तूंहि मला जो दुखविल ऐसा
भेद नको जाणूं । कुमारा ॥ राग० ॥

शावक तूं मम कविगरुडाचें,
करपंजरिं या येउनि नाचें;
चल, पाहूं ये ! काव्ययशाचें
धवलगिरी सानू । कुमारा ॥ राग० ॥ ५ ॥

प्रकाशन—नवयुग.
वर्ष ३ अंक ४ था.
फेब्रुवारी १९१६.

# कविवर्य लेंभे यांची कविता.



" She moves a goddess, she looks a queen."

—*Homer's Iliad.*

ही येतांच उठोनि कौतुक जणों नेत्रांतुनी पाहतें,
धांवोनी अवधान ये लगबगां, कार्नी उभें राहतें;
देण्याला बहुमान मान लवते, उल्हास ये मानसा,
वांटे आज शरत्-प्रभात नटुनी ही येतसे राजसा.
हंसाचें गतिचित्र दाविति,–किती नामी पदन्यास हे !
भाषेची सरणी रसज्ञ कविला साधे न अन्यास हे.
ऐशीं रम्य विशेषणें विलसतां स्नेहाळ संबोधनें,
व्हाया सन्मुख चित्त चुंबकमणी ते कासया शोधणें ?
ह्या पंक्ती मजला हळूच म्हणती अभ्यन्तरीं वाहुनी,
वायूच्या झुळुकी सुखावह तुम्हां होतात का याहुनी ?
आम्हीही मृदु आणि कोमल असूं, मंजूळसें गातसूं,
आम्हां सोडुनि त्यांस वानिति कवी येतें तयांचें हंसू.
सारी सुंदर, सौम्य, गोड रचना देते प्रसादासवें
प्रेमानंद मनीं भरोनि, नयनीं ही वाहवी आसवें;
ना गंधर्वपुरांत उंच तळपे होवोनि सौदामिनी,
सत्ता सद् हृदयावरी करितसे, ही भूवरी भामिनी–
–देवी वागतसे जणो, दिसतसे गंभीर राणी जशी,
हीचें दर्शन वाचकांस म्हणजे आहे शिराणी जशी.
ओजानें करुण–प्रधानरस ही जीवंतसा दाखवी,
निर्माता जन जो हिचा निपुण तो आहे कवी हो कवी !
माझा मित्र असो नसो मम तया सप्रेम हीं वंदनें,
तो दीर्घायु असो, सुखांत विलसो सर्वंदिनीनंदनें;
अर्वाचीन कवींत मान मिळवो अग्रेसराचा सदा,
त्याला नित्य असो प्रसन्न कविता कीर्ती तशी संपदा.

प्रकाशन—नवयुग.
पु. ३ रें अंक ११ वा, सप्टेंबर १९१६.

# सौजन्य.



रूपवर्णनः—[ स्रग्विणी ' अच्युतं केशवं ' इ० ]

हे सखी कल्पने ! ये पहा गे पहा !
सद्गुणांचा महा-राज सौजन्य हा.
ही विभूती दिसे काय गे देखणी !
काढुनी दे मला, घे धरी लेखणी. १

चित्रकारां न ये, शिल्पकारां न ये,
ही कला ये तुला एकलीला सये;
रेखिती नेटकी वस्तु साकार ते,
आणि होती निरा-कार नाकारते. २

अंतरालामधें त्यांस नाहीं गती.
तैं कवी तूझिया-संगतीं रंगती.
साह्य त्यांना करूं आपुले जाणुनी;
ह्या अमूर्तास दे मूर्तता आणुनी. ३

हृन्मयूरासनीं धन्य सौजन्य हा
राजचूडामणी राजताहे पहा.
त्यापुढें दूसऱ्या सद्गुणांच्या तती
मांडलीकांपरी शोभती खालतीं. ४

राजराजानना पूर्ण रेखावया
ही कला पाहिजे सर्व ओतावया.
कीं न चर्याच ती, होय तो आरसा,
ज्यामधें बिंबला तन्मनाचा ठसा. ५

प्रेमसाम्राज्य तें ? शांतिचें धाम कीं ?
मार्दवाचा असे रम्य आराम कीं ?
ईश्वरी ज्ञान तें या मुखीं बिंबलें,
मोह, माधुर्य तों पूर्ण ओथंबलें. ६

अंबुजांचें हंसें, बालकांचें हंसें,
योगियांचें हंसें हें,—असेंच्या असें !
याकडे पाहुनी हांसती काय तीं ?
त्यामुळें यापरी भासती आयतीं. ७

गे नवी पालवी, मल्लिकेच्या कळ्या,
गुल्-फुलांच्या मधें गुंफुनी पाकळ्या,
यास केलें असे जें शिरोभूषण,
तें किरीटापरी काय शोभे पण ! ८

जो शिरीषें तुरा लाविला त्याजला,
हेमतंतूंपरी केसरें साजला;
तंतु नाजूक ते वायुनें हालती,
कुंतलांच्या तती ह्या जशा सालतीं. ९

लोचनें तों पहा ! सौम्य कांती किती !
शील याचें जणो बोलुनी दाविती.
त्यांत विश्वात्मता स्फूर्तिला पावते,
ती जगा मोहनी घालण्या धांवते. १०

कीं दयास्यंदिनी सारसें फूलती ?
भूतनेत्रें जिथें भृंगशीं झूलती.
ही क्षमा यांतली शत्रुला लाजवी,
त्यास रूपान्तरें मित्रसा साजवी. ११

भंग नाहीं, धनू सारख्या भ्रूकुटी,
भव्य भालीं कधीं या पडेना अटी;
दूसऱ्यांचा गुणा-स्वाद जी पारखी,
शोभते नासिका ती शुकासारखी. १२

हा गुणांचा प्रभू, सत्त्वनामा असे;
देव-कोटींतला, श्मश्रु याला नसे.
दक्षिणामूर्तिला पाहिलें ना तुवां ?
सत्त्वमूर्ती तसा नेहमी हा युवा. १३

शारदीया सदा गुंजगानावली
ऐकुनीयां स्वयें जीं प्रसन्नावलीं,
हादग्यांचीं फुलें तीच हीं छान कीं ?
गे नव्हे कल्पने ! याचिये कान की ! १४

ऐक देतो कशीं स्निग्ध संबोधनें !
हीं मिळाल्यावरी कां सुधा शोधणें ?
जें वसंतांतल्या चंद्रिकेनें विधु–
वर्षतो भाषणें हाहि तें–तें मधु. १५

कंबुकंठीं तरी या नसे घातलें
शब्दमाधुर्य तें पांचजन्यांतलें !
अन्य–दैन्यामुळें हा असा दाटतो
कीं तदा विस्वरा–सारखा वाटतो. १६

सौम्य गंधीं फुलें जी बकूळें दिलीं,
मोगऱ्यांचीं फुलें त्यासवें ओंविलीं,
आणि त्यांची गळां घातली चौसरी
माळ ती शोभते वैजयंतीपरी. १७

सौहृदाच्या स्थळीं दिव्य एकावली,
सर्व मोत्यें तिचीं आवळीं जावळीं.
धाडिलीं वासवें मेघदूतासवें ?
कीं उषेचींच तीं प्रेमळें आसवें ? १८

वक्ष ह्या मंडनीं शोभतें पीन तें;
ज्यामधें खेळती मीनसे दीन ते,
तो महासिंधु या—पैल हेलावतो,
गोड ! औदार्य हें नांव तो पावतो. १९

स्कंध देशाहुनी खालतीं पातला,
नांव शेला तया देववेना मला.
सर्व चंदेर तें ज्यास लाजे सखी,
तो शरत्कालचा हा दिनारंभ की ? २०

देवसेवेंतुनी, संतसेवेंतुनी,
लोकसेवेंतुनी राहती गुंतुनी,
हात घेतात हे धावया कारणें;
हे तुवां राघवा-तुल्य आकारणें. २१

स्वोदरानें जरी हा दिसे सिंहसा,
जाठराग्नी नसे चंड याचा तसा.
अल्पभोजी असे, आळशी हा नसे,
दोंद तेणें न ये तुंदिलाला जसें. २२

धोतराचें पहा पोत जैशी हवा !
कीं फुलेला म्हणूं काश हा वाहवा !
स्वस्ति लाभे जनां ज्या गुणोपासनीं,
स्वस्तिकाऽकारें तो बैसला आसनीं[1]. २३

नांदते या पदीं चंद्रपादांपरी
शांतता, सौम्यता, मोहिनी, माधुरी.
त्यामुळें हा जिथें संचरे तैं सखे,
लाभती माधवी पौर्णिमेचीं सुखें. २४

रात्र ती दाखवी रूप लावण्य तें
अन्य नोहे पहा हेंच गे धन्य तें;
यांतुनी पावतें तें परावर्तना,
रम्य राकामिषें चालवी नर्तना. २५

तूं पदांपासुनी आऽवतंसात् पहा
रेखिला मूर्तिमान् सात्त्विकानंद हा.
आत्मसन्दर्शनें राजयोगी जसा
गुलगुलां हांसतो भासतो हा तसा. २६

संकटें, जाचण्या, टोंचण्या, शोचना,
मानभावांपरी वल्गना, वंचना,

१ " जानूर्वोरन्तरे सम्यक् कृत्वा पादतले उभे ।
ऋजुकायः समासीनः स्वस्तिकं तत्प्रचक्षते ॥–" योग.

हीं ढगें खालतीं धांवतां धावरीं,
चंद्रमा शांतसा हा प्रकाशे वरी. २७
कल्पने ! रेखिली मूर्ति याची तरी,
तत्स्वभावांत जी खेळते माधुरी,
स्वाद कैसा तिचा दाखवावा जनां ?
प्रत्ययानेंच तो ये कळोनी मना. २८
जे कुणी राहती याचिया संगतीं,
ते रसास्वाद तो पावुनी रंगती;
वर्तनांतून कीं, याचिया राहिला,
त्यामधूनीच तो पाहिजे पाहिला. २९

प्रकाशन—नवयुग, पु. ३ रें
अंक १२ वा, ऑक्टोबर, १९१६.

---

## कायहो चमत्कार !



" भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि "
—कालिदास.

( १ )

आबालवृद्ध जनहो, ऐकुनि घ्या सावधान कानांहीं
काव्यकथा कथितों ती; असा चमत्कार ऐकिला नाहीं.
बहु राजकारणीं ज्या चमकविलें तेज रंगरावानें,
सर्वस्व रामचरणीं अर्पण केलें अनन्य भावानें,
त्या सरदार नराचें आहे गोदावरी-वरी ओढें—
गांव सुरम्य असें कीं, तयाकडे मन वरीवरी ओढे.

---

१ श्रीमंत पेशवे सरकार ह्यांचे सरदार बहादूर प. वा. रंगराव ओढेकर.
२ ह्या ऐतिहासिक पुरुषानें पंचवटींतील श्री काळ्यारामाचें भव्य देवालय आपलें सर्वस्व खर्च करून बांधिलें आहे. इतके रामभक्त.

घनदाट आंबराया, सुपीक काळ्याकभिन्नशा जमिनी,
विमल निरामय गोदा, ध्यान करावें खुशाल संयमिनीं.
ग्रामपतींचा वाडा भव्य असा, चिमुकलाच बाजार,
निर्मळ घरदारांच्या शेतकऱ्यांचा विशेष शेजार.

( २ )

पूर्वीं एक धनाजी ह्मणुनि कुळंबी वसे अशा गांवीं,
गावी कीर्ति तयाची गांवकऱ्यांनीं दुज्यांस सांगावी.
राबे शेतांमाजीं धरुनि अहोरात्र तो चिकाटीला,
ऐदी शेतकऱ्यांपरि न संकटांच्या करी हकाटीला.
यापरि परिश्रमानें निज कार्यामाजिं दक्ष राहून,
झाला सधन धनाजी कृषि करणाऱ्या जनेतरांहून.
जंव नंदनवन-वैभव आणुनि त्यानें मळयांत सांठविलें,
तंव गृह राजाऊनें ओळ्यांतिल इंद्रभवन थाटविलें.
स्थल, जल, वस्त्रें, पात्रें, निर्मळ ती टापटीप सर्वांची
ठेवी; प्रेमळ वागे, ओळख भोळीस त्या न गर्वाची.
नमुनेदार धनाजी, धनीण त्याची बघोनि राजाऊ,
ज्याला त्याला वाटे क्षणभरि त्यांच्याकडे चला जाऊं.
'पाटिल' 'पाटिल' म्हणुनी जो तो गौरव करी धनाजीचा,
पण नवल काय ? लोकीं गौरव नसतोच निर्धनाजीचा.

( ३ )

तीं एकजीव दोघें असुनि असे त्यांस दूसरा जीव,
कन्या 'जिऊ' ह्मणोनी; तत्प्रेमालय–रसाल राजीव !
गोधूम-वर्ण तीचा हरणाच्या पाडसापरी डोळे,
स्नेहाळ वदन नामी, प्रसन्न विधुबिंब जेविं वाटोळें.
तो केशपाश काळा, भाळावरि लांब आडवें कुंकू,
जणुं ह्मणति शब्द तीचे आह्मी कोकिलरवासही जिंकूं.
घेती पाटिल साड्या हौसेच्या रेशमी किनारीच्या,
ऐनेदार खडीच्या झळकति चोळ्या तया कुमारीच्या.

साधीच कंकणें तीं, कदा तदाकार नागमोडीचे,
शोभति शुद्ध रुप्याचे तयांवरी गोल गोठ जोडीचे.
येतां सुदिन सणाचा पुतळयांची माळ ती गळां घाली;
तेव्हां शृंगाराच्या माहित नव्हत्या नव्या तऱ्हा चाली.
जाई आईसंगें मळयांत किंवा खळयांत ही कन्या;
साधी निसर्गसुंदर दिसे तदा देवता जशी वन्या.
अपवादास्पद जितकी रूपवती गुणवतीहि ती तितकी,
बहुधा गुणरूपांचें व्यस्तचि दिसतें प्रमाण मूर्तींत कीं !
कांतीव सूत, ऐशा येत तिला शेवया वळायाला,
ह्या फेण्या ! म्हणुनि तिच्या लोकभ्रम कुरडयांवरी झाला.
लावोनि गुळवणी वा पुरण करी सार ती मजेदार;
ऐसें कीं तें सेवुनि हुशार व्हावा मनुष्य बेजार.
गुलगुलित मलमलीपरि करी झराझर कशा पुरणपोळ्या,
काढुनि सुंदर कशिदा तिनें शिवाव्याहि रेखिल्या चोळ्या.
ती निंदणी, खुरपणी, जाणे बारीक काम शेतीचें,
केवळ राजाऊचें वळण जसें उतरलें तसें तीचें.

( ४ )

ऐशा जिऊस आले बहु कर्षक मागणीस घालाया;
परि पाटील धजेना त्यांतिल एकासही तिला द्याया.
कांहीं ना तरि कांहीं स्थळांत ये आढळोनि कमताई.
त्याला जिऊ लहानचि, वाटे इतकी करूं नये घाई.
थोर घरंदाजाला, तरुणाला, सुगुणरूपवंताला
द्यावी निज कन्या ही उत्कंठा कोणत्या न ताताला ?
त्या चिंवट मोहजालीं पाटिलबावाहि गुंतले गेले,
त्यांहीं पुष्कळ व्याही आले तैसेच पावते केले.
कन्या धन परक्याचें. तें विधिनें जाय नेमिल्या ठाया,
जाणोनि लागले ते स्वस्थ मनानें स्वकाल कंठाया.
तंव यौवनें हळू हळु ठेवियलें त्या जिऊंत पाऊल;
मायेमुळें धनाजी त्याची ऐकूं शके न चाहूल.

( ५ )

ग्रामस्थ तरुण कर्षक, उपनांवें म्हणत ज्यास 'घायाळ,'
त्यास जिऊनें केलें अपांगबाणें क्षणांत घायाळ !
प्रथमविकाराची ती प्रथमच्चि ये त्याचिया मना भरती;
थरथर कांपू लागे, आले रोमांचही वपूवरती.
रसना शुष्क जहाली, शब्द निघेना मुखांतुनी नीट,
लागे हृदय उडाया, घाबरला तो असूनही धीट.
विसरोनि भान सारें ध्यान जिऊचेंच लागलें त्याला.
त्याला दोष कशाला द्यावा ? आधीं अहो, विधात्याला.
तो विषमता भवाची संतत ठेवी विजोड जोडून,
तोडुन सजोड, टाकी तन्मृदु हृदयेंहि तोच फोडून.
त्याच्याच योजनेनें पाटिल नेई मळ्यांत मदतीला.
शिवबा घायाळाला, तो निरखी तैं जिऊस सुदतीला.
दर्शन, सहवास, पुढें भाषण, अनुनय तयांमधें चाले;
प्रेमाचें परिपोषण अशा क्रमें परिचयासवें झालें.
ती पाडाचे आंबे मिळतां शिवबांस आदरें देई,
ताजा सुरस उसाचा शिवबा आधीं जिऊकडे नेई.

( ६ )

एके दिनीं सकाळीं शेतांतिल लोक पांगले गेले,
हें पाहुनि शिवबांनीं प्रेमाचें मागणें तिला केलें.
किन्नरमिथुनासम तीं द्राक्षीच्या रम्य मंडपाखालीं
कांहीं गुंजन करितां अदृश्य तेथेंच दृष्टिला झालीं.
एका क्षणप्रभावें बनलीं अन्योन्यमित्र जिवलग तीं.
लगबगती भेटाया, भेट न होतां मनांत तगमगती.
भारोनि टाकिलीं जणु, जादूच्या पूर्णसिद्ध मंत्रानें;
वागति भिन्न जनांमधिं तथापि विजनांत एक तंत्रानें.
प्रेमाचा ओढा हा संथ सरळसा कदाहि वाहीना.
सूक्त महाकविचें हें सत्य जहाल्याविनाहि राहीना.

(७)

हिरव्या गार गव्हांचे लोंबर भाजुनि खळ्यामधें मळले.
ओंब्या तयार झाल्या-प्रियजन चित्तांत फार तळमळले.
आडोसाच दिसेना द्याया घ्यायास त्यांस तो घांस;
हृदयांतिल उकळीनें नच राहवलें परंतु दोघांस.
तेथिल जनदृष्टीला चुकवोनी नव नवाळ ती ताजी
प्रेमी परस्परांच्या घालिति सस्मित अशां मुखांमार्जी.
भुरकोनि कोरड्याला अधरसुधा गोड ! मारिती भुरका.
हाय जिऊ ! हा शिवबा ! नाशाला जाहलांत आतुर कां ?
रे, पाहिलें तुम्हांला पाळत ठेवोनि त्या—धनाजीनें.
काय ? धनाजीनें ? नहि. त्याच्या रूपें अहो यमाजीनें !
हे प्रेममद्यपीहो ! स्वपिता—संगोपिताच जो दिसला,
त्याचा रूपविपर्यय नेणुनि धुंदीमधें तुम्ही फसलां.
शिवबा ! प्रमदवनांतिल बोराचा जाहलास भक्षक ना ?
तो बघ तुजला डसला, बसला होता तयांत तक्षक ना !
ह्याची परि क्षिती-तुज-भान कसें रें न राहिलें राया !
पण, भवितव्य न येतें ज्ञानी पुरुषासही निवाराया.
जीव जिऊस्तव टाकीं, आतां स्वगृहास जाउनी बैस;
होणार जें तयाला सादर—बैसोनि तेथ—तूं ऐस.

(८)

झाली सकाळ गगनीं सूर्य वरी कासराभरी आला,
थंडी थंडी करितां आले शेतांत लोक कामाला.
झुंजुरकांच उठोनी सर्वां आधीं मळयांत आलेले
आशाळभूत शिवबा होते मोटेवरीच बसलेले.
आलाप उंच त्यांचे येणारांच्या पडोनियां कांनीं,
आश्चर्य फार केलें रेंगळणारांतल्या अनेकांनीं.
आज धनाजी आला सर्वांमागुन हळूच शेतांत,
विहिरींतिल पाण्यापरि सखोल, मौनीहि तो दिसे शांत.

सविनोद 'कारबारी !' अशी न दे आज हांक शिवबाला.
हें वैपरीत्य पाहुनि गेला त्यांच्या उरीं जणो भाला.
ते प्रश्न करिति कांहीं, पाटिल उत्तर उणें न दे नीट.
कळलें घायाळाला, कीं आला यांस आपला वीट.
राजाऊ न जिऊही आज दिसे. पण कसें विचारावें ?
सैरावैरा त्यांचें मन वनवातापरी तदा धांवे.
त्यांना काम सुचेना, आणियलेली रुचे न भाकरि ती.
कांहीं निमित्त सांगुनि धनाजिला राम राम ते करिती.

( ९ )

तिसरा प्रहर सरोनी रवि चाले मावळावया खालीं.
पिंगटवर्ण जसा तो वनलक्ष्मीही तशीच ती झाली.
ह्या समयीं प्रति वस्तू म्लान, उदासीन भोंवतीं दिसली.
शिवबाची समदुःखी सृष्टी देखील काय हिरमुसली ?
दुःखी घायाळानें खालीं घालोनि मान मौनातें
सेवोनि वाट धरिली संगें घेवोनि आपलें नातें.
जणु फाटक्या मनामधिं हृदयाचे सर्व बांधुनी तुकडे,
तो मंद पावलें तीं जिकडे नेतील चालला तिकडे.
श्वासहि मंद वहाती, बाष्पानें पथ दिसोनि अंधुक तो
वाटे तयास जातो आज घरीं कीं धुक्यांत या चुकतो.
गांवांत ये कसा तरि, गमे जिऊला बघोनि मग जावें;
पाटिलबावा ह्यांच्या जाय घरावरुनि तो अशा भावें.
तों कुलुप सायखेडी आलें त्यांच्या दिसोनि दाराला.
घायाळ 'आ !' करोनी आकाशाच्या बघे विदाराला.
हें जग शून्य जहालें, हालेना जागचा उभा राही,
कांहीं एक न बोले, नुसता तो शून्य दृष्टिनें पाही.
एका वाटसरानें त्याला यापरि बघोनि थिजलेला,
हातीं धरोनि त्याच्या घरांत नेऊनि पोंचता केला.

( १० )

धांदल !—एकचि गजबज तेथ उडाली तया सभोंतालीं.
त्याचे वडील, त्याचीं भावंडें, जवळचीं जमा झालीं.

करिती प्रश्न परोपरि, उत्तर म्हणुनी मिळे न एकाचें.
मग कायहो पुसावे तरंग केवळ अजाण लोकांचे ?
कांहीं डसलें याला, कोणी म्हणती कुठें तरी भ्याला,
गेला झपाटला तों वदति कुणी वायु जाहला झाला.
रखमाऊनें त्याच्या डोक्यावर गार शिंपिलें पाणी.
कांहीं सावध झाला, तुटक विसंगत अशी वदे वाणीः—
"कोन तुमी ? राजाऊ ! पन इक्का राग ह्यो कशापाई ?
"नग कारबार तुमचा ! जिऊ म्हनुन् का हितं दिसत नाई ?
"म्या राम राम क्येला. पाटिल नव्ह का खळ्यात ह्ये आलं ?
"कोन जिऊ ? जात्वो मी घरास. पन् ह्ये असं कसं जालं !
"येडा जाला येडा !" रखमाऊनें निदान हें केलें.
ती त्यास धरुन बसली. वडील पाटिलबुवांकडे गेले.

(११)

नुक्ती परगांवाहुनि आली होती घरास राजाऊ.
कोंडाजीस म्हणे "या ! लइ जाली रात, द्या दिवा लाऊ."
पाटील तोंचि आले. केलें आश्चर्य ऐकुनी त्यांनीं;
गेला निरोप घेउनि म्हणति, पुढें—हात ठेविती कानीं.
संशयसंभ्रम सगळा. मग म्हातारा पुसे, "करूं काय ?
पाटिल, उपाय सांगा, माझेहो आज मोडले पाय !"
देउनि धीर धनाजी बोले, "दावा कुणा शहाण्याला;
पैसेहि घ्या हवे तर कांहीं द्यायास वैद्य-वाण्याला."
तो कष्टानें उठला. सौदा घे जवळच्या दुकानांत,
येउनि रखमाऊच्या कुजबुजला चार शब्द कानांत.
दोघें तटस्थ झालीं, आलीं शिवबा तदा जिथें निजला;
वक्षःप्रदेश त्याचा वात्सल्याच्या टिपें टिपें भिजला.
अंगावरोनि फिरवी म्हातारा तेविं हात म्हातारी;
म्हणती देवा ! मारीं तूं आम्हांला परंतु हा तारीं.
खाई पिई न कांहीं भरावया त्यास लागला ताप.
बडबड ऐकुनि त्याची गडबडली वृद्ध माउली बाप.

जे जे उपाय करिती, अपाय ते तेच लागले व्हाया.
दैवगती फिरवाया भगीरथाचे प्रयत्नही वायां.
हां हां म्हणतां जाउनि कांठ्याचा नायटा विकोपाला,
तिसरे दिनीं यमानें सायंकालींच घातला घाला !
'शिवबा !' म्हणोनि फोडी रखमाऊ माय धाय हंबरडे
पाषाणही दुभंगति ऐसा तो दीनजनकदंब रडे.
रखमाऊ, कोंडाजी, सर्व मुलें करिति एक आकांत;
ऐकुनि पाटिल आले, म्हणति धरा धीर, व्हा जरा शांत.
सान्त्वन करोनि त्यांचें सर्वांचें, घेउनी पुढाकार,
आला प्रसंग वेंचुनि धनहि धनाजीच पाडिती पार.
जिकडे तिकडे झाला स्वस्थपणा एक लोटतां मास;
रूढीस अनुसरोनी जो तो लागे स्वकीय कामास.

( १२ )

शिशिर ऋतूची थंडी. फिरकूं देना कुणास बाहेर.
काळोख्या रजनीचें विश्व जहालें भयाण माहेर.
तारे बघोनि भासे काळ सहस्राक्ष हे वटारोनी
भोंतीं स्वभक्ष्य शोधी तंद्रा, आलस्य दूर सारोनी.
खारी हवा सुटोनी कांटा येउनि शरीर हें थरके;
काय शरीरकथा ती त्यांतिल काळीजही जरी चरके ?
शकट खड्यांतुनि धांवे त्याच्या ध्वनितुल्य दांत खडखडती;
हुंकार करुनि वारा वाहे, ऐकुनि उरेंच धडधडती.
सळसळ वाजति पानें, रात्र करी किरर् किरर् संततशी;
किंकाळे टिटवी त्या सटवीला नहि जरा उसंत कशी.
लागोनि गाढ निद्रा सुनाट झाली अशेष जनवसती;
कोठें विवळति कोल्हीं तों कोठें ग्रामसिंह वसवसती.

( १३ )

ऐशा शून्य, भयानक, काळोख्या मध्यरात्र समयाला
दिंडोरी ह्या गांवीं, गाडी यावी, असा ध्वनी झाला.

दगडू झुंजाराच्या दाराशीं एक थांबलें भिरकें;
खडखड कवाड झालें ' जिऊ ! ' अशी हांक अंतरीं शिरके.
खडबडुनि होय जागा, देई झुंजार कान वांकोन;
तंव ' जिउ जिऊ ! ' अशी ये साद पुन्हां, तो तदा पुसे ' कोन ? '
" उगडा कवाड उगडा " ह्यो नव्ह परका, मनुक्श वळकीचा;
" मी वोढ्याहुन् आल्वो न्यिरोप घ्येउनूशनी धनाजीचा. "
ऐशी गडबड होतां उठति घरांतील माणसें सारीं;
उघडुनि कवाड आले, दगडू झुंजार ठाकले दारीं.
तिरपा हात दिव्याला लावुनि शिवबापुढेंच तो धरिती;
' या पाव्हनं ! ' म्हणोनी स्वागत ते विस्मित स्मितें करिती.
इतक्यांत लगबगीनें उठुनि जिऊ ये मनीं सुखावोनी;
मामामागुनि वांकुनि निरखी हरिखोनि शिर तुकावोनी.
" ह्ये बैल भडकल्येती, वोढा घ्येती घराकडं जाया;
" पाटिल मला म्हँगालं घ्ये भिरकं जा जिऊस आनाया.
" झुंजाराला दंडूवत् सांगुन् घ्येउनूशनी तिला ये तू
" रात्वोरात घराला. जिउवर त्यंचा लई-लई ह्येतू !
" थंडी-वारं-म्हुनूसटि बनातबी ह्ये बगा दिली संगं,
" अट्पा बिगिबिगि आता. " ऐकुनि झुंजार जाहले दंग.
माणूस पाटलांचा, वस्तू, खाणाखुणा, तयां पटल्या.
किंतू परि वेळेचा ये निकडीचा तसाच शेवटल्या.
होती तथापि शक्ती या समयाला अजिंक्य शिवबाची.
दगडू मामा बघती जाउनि भिरक्यांत बैसली भाची !
बैल कशाचे ? वारें ! निघोनि गेलेंहि भिरर् तें भिरकें !
झुंजाराचें काळिज माजरपाटापरी उभें चिरकें.

( १४ )

वस्तुस्थितिचा गंधहि जिऊस नव्हता भिऊन जायाते.
सहजचि त्या देहाशीं वागे सप्रेम जेवि जाया ते.
स्पर्शुनि त्यास म्हणे ती " काल्यावानीच जालया आंगं ! "
" माज्या जिवा ! " म्हणे ती, " क्वोनासाटी खर्च तूं सांग !"

या थंडी-वाऱ्यानं माजा ग्येला परान गं रानी !
" त्येबी ख्वोसुन् आल्वो धावत न्याया तुला भुतावानी.
" ड्वोक लईच दुकूतय् थे काई त्ये कसून बांदाया
( च्वोळीवाचुन् संगं नाई काईच आनलं राया ! )
" चालल, थे या वस्ती, च्वोळीबी बांद्ल्वो कपाळाला.
" माजी कपाळपट्टी दिर्सल व्हय रातची सकाळाला ? "
प्रेमा ! तव राज्यामधिं अवटित म्हणुनी न एकही बाकी.
हृदयत्राण जिऊचें करिति शिरस्त्राण तेंच शिवबा की !
हें कृत्य होतसे तों आलें ओढें,-धनाजिचें दार.
शिवबा म्हणती, " येल्वो ख्वोडुन् थे बैल, हाक तर मार. "
जाय जिऊ दाराशीं, गेले वायाळ बैल सोडाया;
जे गेले ते गेले गंगथडींतील आपल्या ठाया.

( १५ )

इकडे हांक जिऊची गेली भेदूनि तातमर्मा ते
तिजला घरांत घ्याया येती मारोनि हात कर्मातें.
उघडोनि दार पुशिती. जिऊ ? कशी सांग येथ आलीस.
कोण बरोबर होतें ? ऐशा रात्रीं न काय भ्यालीस ?
ऐसें कैसें पुसतां ? उलट विचारोनि सर्व सांगे ती;
ऐकोनि दंपतीच्या अंगाला घाम-शाहरे येती.
डोळ्यांला अंधारी येउनि दोघेंहि बैसलीं खालीं;
वाणी कुंठित होउनि आईबापें तटस्थ तीं झालीं.
इतक्यांत पाटलांना सुचलें, कीं सत्य तें हिला कळतां,
बिथरेल भेदरोनी मलाहि येईल ही न आकळतां.
स्त्रीला संकेतानें दाबुनि म्हणतात, शोक लेकीला;
ह्या आजच्या हिंवानें आले सारेहि लोक टेंकीला.
गोठ्यांत जाउनी मी बैलांचा शोध घेउनी येतों.
थकले असतिल. त्यांना वैरण नसल्यास टाकुनी देतों.
येवोनि पाहती, तों ते होते देत लांब सुसकारे,
तोंडास फेंस येउनि घामानें चिंब जाहले सारे.

हे दामटींत नेले, मनांत म्हणती, परंतु शिवबानें ?
की नांव करुनि त्याचें केलें हें काम अन्य भिवबानें !
मुलगी म्हणते चोळी त्यांस दिली मी कपाळ बांधाया;
यांतील सत्यता मी जाउनि बघतों उद्यांच त्या ठायां.
होउनि भूत तयानें जर हें केलें असेल साचार,
चोळी तिथें दिसेलचि. नातर घेतों हिचा समाचार.

(१६)

ह्या निश्चयाप्रमाणें पाटिल त्या अंत्य भूमिला गेले;
लावुनि मजूर त्यांनीं उत्खात स्थान नेमकें केलें.
दिसली ! ती बघ चोळी कंवचीला करकचून आवळली.
ओळख नीट, धनाजी ! प्रेमाची खूण, सत्यता कळली ?
भंगोनि हृदय ज्याचें परगांवीं पळविलीस लेंकीला,
तो हाच दाविणारा देहान्तांतहि अपूर्व नेकीला !
ह्यानें अंध तमांतुनि हिमांतुनी करुनियां प्रवासातें,
आणोनि पोंचवीली तुझी जिऊ ती तुझ्या निवासातें.
थंडींत गारठोनी, उन्हांत भाजुनि, भिजोनि धारांनीं,
ह्यानेंच कष्ट केले मळ्या—खळ्यांतील त्या उभ्या रानीं.
रात्रीं राखण केली जागुनि, देवोनि तोंड चोरांशीं,
ह्यानेंच घातल्या बा तव धान्यांच्या तुझ्या घरीं राशी.
त्वां वाक्प्रहार करितां दुःसह संतप्त आयसाहून,
गेला घरीं बिचारा निमूट घायाळ घाय साहून.
सुतशोक मायबापां, तुमच्या जीवांस जीव देवोनी,
ह्यानें प्रेमापायीं त्यजिला निज देह येथ येवोनी.
झरुनि कलेवर गेलें, भुईंत अवशेष राहिलीं हाडें,
बघतो निराश, हंसतो हताश, दावोनि दांत दाभाडें.
बघतो, हंसतो, म्हणतो, कीं मी चोळीच बांधिली भाळीं !
प्रेमानंदीं पडलों इथें, धनाजी, जिऊस संभाळीं !
त्याच सतीनें केला हा प्रेमाचा अमोल आहेर,
मम बहुमान जयाचा सोडुनि नेऊं नकोस बाहेर.

प्रेमीं वा संग्रामीं भग्नहृदय जे हताश मरतात,
ते, जगतांत तयांहुनि तात ! महामान्य वीर ठरतात.
बारे ! जिऊ सतीची, प्रीतीची त्वांच राखिली बाजू.
तूं सालस, नेकीचा, प्रेमळ नायक जगांत नांवाजूं.
ह्या मानवरत्नाची पारख पाटील ! जाहली असती,
तर संसारसुखाला भाग्याला अटक आपल्या नसती.
परि तें कसें घडावें ? कांहीं रत्नें, फुलेंहि मानव ते
व्हाया दृष्ट दिसावे, चतुर निसर्गास हें न मानवतें.
अतएव, जेविं होतें अमोल नररत्न हें तसें झांकीं.
कां थिजलास धनाजी ! गेल्याचा शोक हा वृथा. जा की !

( १७ )

पाटिल घरास आले, पायपिटी ये करीत झुंझार.
पाहुनि जिऊस, ऐकुनि तेथिल इतिहास, जाहला गार.
दिन दोन चार राहुनि धीर दिलासा दिला धनाजीला;
झुंजार परत गेला सोंपुनि मातापित्यांस भाचीला.
झांकेल सत्य कैसें ? कुठवर राहूं शकेल झांकून ?
कळलें जिऊस शिवबा गेले मज एकटीस टाकून !
ज्या तरुच्या आधारें जगोनि राहून जाय वर वेल,
तो पडलाच. तिच्यानें जीव उभारी कुठोनि धरवेल ?
खाणें पिणें रुचेना. कमी कमी होतसे तदाहार,
ऐहिक संबंधांचा, विषयांचा ये तिला तिरस्कार.
बैसे तिथेंच बैसे, उभी तिथें सारखी उभी राही,
पाही अहेतुनें तरि सहसा जलपूर लोचनीं वाही.
थरकत अधर मनाशीं क्वचित् वदे कांपरेंहि चांचरतें,
त्यांतून 'कारबारी !' ऐकूं ये एवढेंच ओझरतें.
प्रकृतीविषयीं पुसतां ती कंटाळुनि म्हणे बरी आहे.
तंव ती तीव्र निराशा निश्वासांसंगतीं तिच्या वाहे.
कांहीं चैन पडेना. शिवबाचा लागला निदिध्यास.
दिवसंदिवस सतीच्या देहाचा होत चालला ऱ्हास.

आधीनें मन दुबळें, व्याधीनें जाहलें तनू दीन;
खिळली अंथरुणाला ती लव अवधीमधीं पराधीन.
उपचारांची नव्हती उणीव. एकहि परंतु चालेना.
होतां होतां मदतीविना तिचा हात तीस हालेना.
पिंगट कळा मुखावरि, हातांपायांचिया जशा काड्या,
अस्वाभाविक होउनि तिच्या वहायास लागल्या नाड्या.
घेवोनि पथ्य कांहीं एके रात्रीस लागला डोळा,
"आल्ये आल्ये !" ऐसा तंव ती उठली करोनि आरोळा.
मुलगी भ्याली म्हणुनी पाटिल दचकुनि उठोनि सांवरती,
तों दार उघडुनी ती वीजचि गेली चतुष्पथावरती.
श्रेधा उडुनि धनाजी धांपा टाकीत जाउनी पाही;
कुत्रीं विवळत असती. मनुष्य त्याच्याविना तिथें नाहीं !
जीव जिऊ हा पावे शिवबारूपी शिवांत आराम.
कां रडतसां धनाजी ! राजाऊ ! राम आळवा राम.

प्रकाशन.—नवयुग. पु. ४ थें
अंक ८ वा. जून १९११.

---

## उत्कंठिता.



" आगन्तुं कृतचित्तोऽपि
दैवान्नायाति यत्प्रियः ।
तदनागमदुःखेन
विरहोत्कंठिता तु सा ॥ "

[ चाल—लावणीची. ]

( १ )

पथापथांतुनी छायेछायेमधुनि किती हिंडतें,
जागोजाग तुला धुंडतें,

रम्य रुपेरी खळखळणाऱ्या ओढ्याओढ्यावरी
फिरतें ओढवुनी बावरी,
तरुराजींच्या वळणांमाजीं, सीमांच्या संगमीं,
भ्रमतें पडुनि तुझ्या संभ्रमीं;
वळतें निराश मी मागती,
जळतें अपुली बघतां गती,
भलते विचार मनिं वागती,
सैरावरा धांवुनि वेडें हें मन वाऱ्यावरी,
येतसे परतुनि थाऱ्यावरी. १

(२)

खेदभरानें रात्रं-दिन हें तनु माझें तापतें,
अंतर प्रेमानें व्यापतें,
येशिल नाथा ! पुन्हां कधीं ह्या खंतीनें सारखी
अनाथा तळमळते ही सखी;
किती निसासे त्यजितें, झिजतें, मी बरळे, विव्हळे,
वियोगें अशी तुझ्या आहळे;
पाडुनि या हृदयाला घरे,
करुनी शांतीचें खोबरें,
छळिती किति विपदा-संघ रे !
कुणी कुणाच्या प्रेमावर कधिं असा बिबा फांसला
असे का ? सांग सख्या तूं मला. २

(३)

हें स्थल केवल भूतलवरिंचें नंदनवन साजतें,
जहालें उदास परि आज तें !
येथिल मौजांवरुनी माझें दुःखचि फैलावलें,
सुखांनां ग्रहण तयें लावलें !
मधुर सुगंधी बहु रंगेला वसंत मज भेटतो
वृथा ! कीं, विरह तयें पेटतो.
पालवी रमवीना कोमला,

ताजा गुलाबही कोमला,
वाटे नको ! असें हो मला,
कीं उपभोगी नेउनियां जें भोगांवरि वासना,
सजणा ! त्वां हरिलें त्या मना. ३

( ४ )

बहु रंगांचे मोहर, झेले, कीं मधुचीं वैभवें,
पहाटीं अभिनव होती दवें;
सुमनसुवासें दरवळलेल्या कुंजांते हालवी
परिमल झुळुक कशी कालवी;
हे देखावे दिपविति डोळे केवळ राजावळी,
भंवत्या सर्पगती हिरवळी,
आंबे तम ज्यांतुनि दाटतें,
कोकिल बोलाविति भाट ते,
किलबिल संगीतच वाटतें,
वनदेवीच्या सुमार्दवाचा सुमधुरतेचा निधी !
तरि मज हा रमवीना कधीं. ४

( ५ )

हे तत्त्वांनों ! मीं बडबडतें, व्यामोहा पावतें,
जिवाची जोत विझूं पाहते !
प्राणविसांव्या महाशया ! कां उशीर करिसी असा ?
मन्मनीं सवार हो ये कसा !
असला काल करालहि उभा,
तरि ये त्याची न धरीं मुभा,
दावी मुखचंद्राची प्रभा,
ये ये वेगें या करपाशीं—हृदयाशीं राजसा !
जिव्हाळा रामच माझा जसा. ५

प्रकाशन—महाराष्ट्रसाहित्य,
१९२० मुंबई.

# वनवासाचीं सुखें.



( 'दो दिवसांची तनु' इ० फटक्यांची चाल. )

अहो तयाला मनुजसुखांचें अवघड कोडें उलगडलें;
त्याचें जीवित इतरांहुनि अति सुखमय जयवंतचि घडलें. १
इहलोकांतिल सुखरत्नांच्या त्यास मिळाल्या जणु खाणी,
जीवनचरित तया धन्याचें मी अभिलाषें वाखाणी. २
ठेलाठेली, प्रचंड कलकल, घडामोड ती शहराची,
दूर राहिली जेथुनि भीती खलसर्पांच्या जहराची, ३
अशा ठिकाणीं,-निसर्गहृदयीं,-जिथें उपाधी न हि कसला,
जाउनि तेथें निवृत्त निवडक रसिकांसंगें जो वसला; ४
वनवासांतिल शुद्ध सुखांच्या अमृताचे जो घे घुटके,
नागरिकांचें जीवित, वैभव, सौख्यहि त्याजपुढें लटकें. ५

( २ )

तिथें बंगला त्यास नको, तो शिल्पकलेचा जरि नमुना,
कीं, तद्द्वारें शठौघरूपी लोटति वमनें पुन्हां पुन्हां; ६
येती, साखर पेरिति, नाडुनि जगांत निंदाया जाती,
उपकारांची फेड म्हणोनी देती अपकारचि हातीं. ७
ही मैत्री, हा शिष्टाचारहि नको तयाला नगरांचा,
समदुःखाचा अश्रुपातही नको तयांतिल मगरांचा. ८
नको तयाला कलाबतूच्या वेलबुट्यांचा झुपक्यांचा
झगझगणारा झगा तनूवर शरत्प्रभेच्या भपक्याचा. ९
अवजड असतां झगाझोंक तो मूर्खचि वाहो बहुमानें,
शतमूर्ख-सभा सभोंवतीची बघो झगा तो अवधानें. १०
चिंता नाहीं त्यास न आला दिगंतराहुनि नजराणा,
बहुविध उंची मेवा, हलवा, आणि मिठाई व किराणा. ११
नकोत त्याला सुपदार्थांनीं उताटलेलीं तीं ताटें,
मरण आणिलें खा-खा खाउनि तरिहि समाधान न वाटे! १२

नकोत त्याला ते पेले बहु-मोल मधूनें भरलेले,
पितां पितां जे अगणित मेले तरिहि राहिले तान्हेले. १३
नको तयाला तारामंचक, शेज पिसांची मखमाली,
त्या शय्येमधिं गडले त्यांना झोंप सुखाची न हि आली. १४
नसती चिंता, विवंचना ही तींत इंगळी जणु शिरली,
न सुचे, तळमळ करितां त्यांची निशा प्रभातांतुनि विरली. १५
विषयरतांचीं स्वप्नसुखें हीं जरि वरकांती रंजविती,
तरि तीं चकवुनि त्या सकलांना सत्य सुखाला अंचविती. १६
सुमुख सुखाचें दिसतां असतें हृदय वेदनाकुल—दुखरें,
वेळ तयांचा सर्व रिता, तो उल्हास न दे वा न सरे. १७
हें दुःखितसुख, खिन्नहर्ष हा बहुजनतेला जरि झुलवी,
नको तयांची बेचव चव ती पारख्यास त्या नच भुलवी. १८

(३)

विपिनविहारी रसिक, खरोखर शांति जयाची वश दासी,
सत्त्वपूर्ण तें जीवित, त्याचें मूल्य कळे ना इतरांसी. १९
सर्व निराशा आणि दुराशा यांपासुनि तें दुरावलें,
समाधानधनवंत, अहो तें पर्णकुटींतुनि विसांवलें. २०
निसर्ग अपुल्या औदार्याची करिती चंगळ ज्या सदनीं,
सहजचि उमटे विमल मनाचा विशद हर्ष तो त्या वदनीं. २१
परोपरीचा भाजीपाला, कंद, मूळ, फल आणि फुलें,
ज्या समयीं जीं निघती, दिसती तया आश्रमीं तीं विपुलें. २२
वसंतकालीं सभोंवतालीं कुसुमित होउनि आश्रम तो,
वासंतीचा निवास-कुंजचि रसिक जनाला त्या गमतो. २३
ग्रीष्मार्काचें लाल भडक तें तेज तळपतां भंवतालीं,
संतसमागम-सम सुखशीतल त्यास झोंपडी ती झाली. २४
वर्षाकालीं इंद्र उतरतां भूवरि जलधारा-करवीं,
इंद्रभुवनसें उटज नटे तें, शची वनश्री ती हिरवी. २५
शारदसमयीं दिन कनकानें, रजनी सजतां रजतानें,
देखावा त्या वनाश्रमाचा न वानवे कवि-कवनानें. २६

त्या वनवासी जनास सुखवी शीतकालही न हि बाधे,
लागति अतिशय रुचिकर सारे पदार्थ त्याचे जरि साधे. २७
उटजामाजीं धगधग करिते अंतर देई न शेगडी,
तेणें भासे निवास साचा ह्याच जिवाचा परम गडी. २८
सतत वनश्री करि नयनांचें आणि मनाचें रंजन कीं,
जनरंजनकर भरला तींतुनि आत्माराम निरंजन की ! २९
जंगलरंगी, चित्र फुलेले, अमृत-झऱ्यांनीं न्हालेले,
ते गिरि दिनभरि अज-मेषांच्या शब्दें नादित झालेले; ३०
दुधाळ तुंदिल तीं खिल्लारें, लवणांमधुनी जीं फिरती,
यथेष्ट चरती, रवंथ करिती, वत्सलतेनें हंबरती; ३१
फुल्ल कण्हेरी आणि लव्हाळे यांनीं जीचे तट सजले,
ती वनगंगा समंत जीच्या संतत घोषें गजबजलें; ३२
गंधतृणाच्या शय्येवरि, वा बकुलाम्रांच्या छायेला
पडतां सालस जन अजगरसा लांबवुनीया कायेला, ३३
हां हां म्हणतां तयास आणी निज जादूनें जी गुंगी,
भृंगततींची गुञ्ज गुञ्ज नादें गुंगविणारी ती पुंगी; ३४
नयनमनोरम ते देखावे, घुमटाऽकृतिच्या तरुराजी,
टिपेवरी ते कोकिल गाती, कुंजकूजनहि ज्यांमाजीं; ३५
अंधुक गुंफा, दिव्य बिलोरी कमलाकर वा सरोवरें,
संगीतासह घेउनि येती अमृतचि भूवरि असे झरे; ३६
केवल मौजा या रमवाया तत्पर असती वनवासीं,
यास्तव होती खरे रसिकजन येथें सुचिरंतन वासी. ३७
याच ठिकाणीं साधें भोळें सत्य निरंतर तें वसतें,
याच ठिकाणीं निरुपाधिकसें जें सालसपण तें असतें; ३८
अकलंकितशा सौंदर्याचें दर्शन तेंहि इथें घडतें,
मोडकळीला न आणिलेलें इथें तरुणपण बागडतें; ३९
इथेंच दिसती अल्पानंदी सहनशील ते कामकरी,
चढाओढ कीं चुरस वसेना वनवाशांच्या श्रमान्तरीं; ४०

आरोग्यानें सदा प्रफुल्लित वदनें दिसती या ठायीं,
अचिन्त्य-चिंतन घडतें येथें प्रशांततेच्या अनपायीं. ४१
किंबहुना जें सुख कवि कल्पिति, जेंहि विराजे तत्कवनीं,
अवनीवरि तें वनींच मिळतें, न लगे जाया माधवनीं ! ४२

( ४ )

तीं राष्ट्रांचीं तुंबळ समरें, ती चटणी संस्थानांची,
हीं खटलीं तों अभिमानाचीं सुकुटिल कारस्थानांचीं; ४३
ह्यांनीं व्यग्र न होई जो जन दूर पळाला जगांतुनी,
आणि राहिला प्रशांत कुसुमित एकांताच्या नगांतुनी. ४४
दिनानुदिन तो महिनोमहिने अशा क्रमें बहु वर्षभरीं
वसोनि तेथें सृष्टिसंगतीं तिचीं प्रवचनें श्रवण करी. ४५
प्रतिरूप तिचें कुतूहलानें निरखुनि तें तो गौरवितो,
सुमधुर उत्कट भाव तिचे तो अंतर्यामीं अनुभवितो. ४६
उदार हस्तें ती जें देते, तें संतोषें ग्रहण करी,
आणि न केव्हां अधिकासाठीं लोभी होउनि हांव धरी. ४७
पहिला मोहर, पहिली कलिका वसंतऋतुच्या आगमनीं
रत्नापरि झळकतां बघे तो उपजुनियां अनुराग मनीं. ४८
सीत्कारांनीं प्राशन करितो हितकर झुरके पवनाचे,
तेणें अभिनव आनंदानें त्याचा आत्मा जणु नाचे. ४९
नैसर्गिक जे समय हितावह पूर्णपणें ते उपभोगी,
भोगी असतां निसर्ग-रामीं रमला योगी तो योगी ! ५०
त्या रामाच्या सुंदरतेनें जें जें सुंदर, खुलणारें,
त्याच्या प्रेमें घमघमणारें गमे रामसें तें प्यारें. ५१
जागोजागीं तटस्थ राही, विमूढ नयनीं तो पाही,
जीवात्म्याचें जगदात्म्याशीं हें संभाषण कां नाहीं ? ५२
निदाघ कालीं संजीवनकर सांवलींत तो विसांवतो,
आणि वाचितो प्रभुमहिमा शत-कोटि पदीं जो न मावतो. ५३
वाल्मीकींच्या अमृत-मानसीं ज्याची पडछाया पडते,
श्याममूर्तिचें दर्शन त्याला त्या घन छायेमधिं घडतें. ५४

लिहितो जें ती मूर्ती सुचवी, जें तो होई अनुभविता,
तेंच होतसे प्रेमरसानें थबथबणाऱ्या तत्कविता. ५५
सभोंवतींच्या वनस्थलांतुनि जातो केव्हां विहराया,
नित्योत्साहचि ! तन्नयनीं नव हर्ष लागतो झळकाया. ५६
जेव्हां शारद रवी जगांतुनि तो सोनेरी रंग भरी,
आणि कापणी–करितां निघती विळे घेउनी शेतकरी, ५७
तेव्हां पाहुनि महोत्साह त्या सर्वांच्याही मुखकमळीं,
त्याच्या हृदयीं येते बहुविध सात्त्विक भावांना उकळी. ५८
दिनावसानीं मंद उन्हांतुनि मौज तयांची तो बघतो,
हर्ष-तरंगीं रंगुनि सुमधुर गुंजगानही तो गातो. ५९
त्याला वर्षा, शीतकाळही मवाळ !–देती दिव्यसुखें,
त्यांचीं वाचन, चिंतन, लेखन, असति साधनें हीं प्रमुखें. ६०
प्रचंड वादळ, विजा, गर्जना, गारा, मुसळासम धारा,
हिमपतनावधि थंडी, अथवा खारा गार असा वारा, ६१
हे नैसर्गिक पालट जेव्हां प्रलय मांडिती बाहेरीं,
तेव्हां बसतो निजाश्रमीं तो गभीरतेच्या माहेरीं. ६२

( ५ )

विश्वरूप तें जगदीशाचें महाभयंकर दिसणारें,
शक्ति अतुल ती जिच्यापुढें हो लीन मानवी बळ सारें, ६३
प्रकोप दारुण, परी तयांतुनि सुमधुर ममता आणि दया
समरस होउनि तुडुंबलेली अमृतमिषें ती ये उदया. ६४
महौदार्य तें तत्त्व जयाला एकचि ‘ समता ’ हें कळतें,
करोनि सगळें सुपीक भूतल जें जयघोषें खळखळतें; ६५
जी कर्कशता पिंपळपानां-सम सकलांना थरकवितें,
तीच तयांना किती सत्त्वमय पदार्थ देउनि हरखवितें ! ६६
अज्ञेयाचे अगम्य हेतू, ती नियमांची सुयंत्रता,
जगतें, दुनिया वश ठेवुनियां स्वतां तयाची स्वतंत्रता; ६७
किति रीतींनीं सुसेविलेला, किति नामांनीं जपलेला,
सुचिंतिलेला, आळविलेला, जिथें तिथें तो लपलेला; ६८

अज्ञानाला दूर, परी तो ज्ञानाला किति किति जवळीं !
योग तयाला होउनि बिलगे, परि भक्तीला तो कवळी; ६९
किती धर्म, किति पंथ, मतें तरि सर्वांच्या अनुयायांचें
अनन्य अंतिम तोचि, जलांचे ओघ जलधिला जायाचे; ७०
ज्याचा महिमा गातां गातां दुर्बल वाणी ही हरते,
परंतु त्याचें गुणसं-कीर्तन अनंत की तें ! नहि सरतें. ७१

( ६ )

वादळ संपुनि जंव तारागण चमके सुविमल गगनांत,
तंव विलसोनी अशेष त्याची चमक तदुन्नत नयनांत, ७२
विचार ऐसे प्रगल्भ येती तदन्तरालीं त्या समयीं;
वृत्ति तयाची होउनि राहे केवल सात्त्विक·तत्त्वमयी; ७३
जिवलग मित्र-ग्रंथ तयाचा वेळ न जाऊं दे वायां,
ज्ञानार्जन तो करोनि लागे प्रगति मनाची सेवाया; ७४
विमुक्त होउनि काव्य-कल्पना त्याची विश्रांतुनि विहरे,
अथवा प्रगटे पुढें तयाच्या दिव्य सत्य जें खरें खरें; ७५
समुन्नतीच्या शिखरावरि तो—तो जीवात्मा करि वसती,
अन्तर्हित जे प्रभाव त्याचे दृष्टिपुढें ते मग दिसती. ७६

( ७ )

यापरि केवळ आत्मसुखोन्नति यांच्या लागुनि कांसेला,
तो स्वजनांच्या स्वबांधवांच्या तिलांजलि न दे आसेला; ७७
अझुनि वसे त्या गृहस्थ-हृदयीं प्रीति तयांची कळकळ ती,
तदाऽऽश्रमांतुनि सुखावलेलीं मुखें तयांचीं आढळती. ७८
प्रौढ जोडपें परस्परांना सविनय नयनीं तें निरखी,
तत्प्रेमाला हिमकाळांतिल गोड उन्हाची ये सुरखी ! ७९
पडती दृढतर गळ्यास त्याच्या बालकरांचे ते वळसे,
प्रसन्न करिती चिमणे वक्ते बोलुनि भाटच केवळसे; ८०
अध्यक्षांना त्यांच्या दिसलें भाषण सर्व दिखाऊ तें,
तरि वक्त्यांना पारितोषिकें म्हणुनि वांटती खाऊ ते ! ८१

आनंदाच्या परिपोषास्तव मधुनि मंडळी जमवितसे,
आणि रमुनि तो लघूत्सवांनीं सहवाशांना रमवितसे. ८२
प्रेमळ कीर्तन, कधीं पुराणचि, भजन कधीं वन-भोजन दे,
केव्हां रुचकर पानक बनवुनि मनें मिळाया तो जन दे. ८३
कारण, सत्सुख, तत्वज्ञानहि ज्यांची आवड चाड जनीं,
न तीं विदेही दर्शेत, केवळ-समाधिमाजिं न तीं विजनीं. ८४
तीं शांताचीं, जनप्रियाचीं, रंगेलाचीं भावंडें
असुनि तयासह अखंड वसती, हें न वदे मी पाखंडें. * ८५
वदन सदन जें प्रसन्नतेचें, हृदय सदय जें, वचन सुधा,
कार जयाचा परोपकारचि, कवण न मानी त्या विबुधा ? ८६
हें तज्जीवनचरित, अहो ! जे अन्यायांनीं पिडलेले,
कसलें त्यांनां जे अन्यायी तापद नगरीं गडलेले ! ८७
विशुद्ध जीवन भोगित होते हेंच पुरातन आर्य मुनी,
जेव्हां श्रीहरि त्यांसह वसले सीताराम-मिषें रमुनी. ८८

प्रकाशन.—वि. ज्ञा. वि. ज्युबिली काव्यसंग्रह. १९२१

---

## रंगराव हर्षे.



( १ )

बया, उदासीबाई ! आतां येथुनि उठवा ठाणें,
मज बघवेना हें मुख तुमचें सदैव ओखटवाणें; १
ऐकतसों कीं, त्या यमलोकीं वैतरणीच्या कांठीं
'श्याम' म्हणोनी श्वान यमाचा घेउनि गमतीसाठीं, २

---

* Cf:—" संपूर्णं जगदेव नंदनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमाः
गांगंवारि समस्तवारिनिवहः पुण्याः समस्ताः क्रियाः ।
वाचः प्राकृतसंस्कृताः श्रुतिशिरो वाराणसीमेदिनी
सर्वावस्थितिरस्य वस्तुविषया दृष्टे परब्रह्मणि " ॥ १ ॥
—श्रीमदाचार्याः

निशीथ काळीं ती अवसेची रात्र निघे सहलीला,
शून्य भयानक दऱ्यांमधोनी चाले तदीय लीला; ३
एके समयीं घनांधकारीं कल्होळ होय सारा,
किंकाळोनी घालिति दारुण यमदूत वेरझारा; ४
जिकडे तिकडे उठे अमंगळ त्यांचा हाहाःकार,
ऐकुनि आला कृतांत होउनि महिषावरी सवार; ५
शोधा अंतीं वैतरणीच्या जवळील कंदरांत
सांपडलेलें अर्भक दूतें दिलें तदीय करांत; ६
अभद्र मुद्रा बघुनि मुलीची सृष्टीहुनी निराळी,
चमत्कृतीस्तव कृतांत कन्या-रत्न म्हणुनि ती पाळी. ७
कांहीं काळें शनी यमाला जातां भेटायाला,
बंधुप्रेमें रत्न नजर तें करण्यांत ये तयाला. ८
वर्षें साडे-सातचि असतां तंतोतंत वयातें,
जगांत आली जी शनिसंगें भद्रा तूंच बया ! ते. ९
अंध तमाच्या वनांत आतां एक गुहा तूं शोधीं,
तीहि नसावी अघटित ऐशा तव घाटास विरोधी; १०
जया गुहेवरि कराळ काळे लवति कडे तुटलेले,
तव मुखड्यावरि हे झिंज्यांचे झांप जसे सुटलेले; ११
काळोखीनें पंख पसरिले मत्सर निर्मित काळे,
त्यांतुनि जेथें संतत जन्मति तिचीं तिच्यासम बाळें; १२
आ पसरोनी 'डरॉंव' शब्दें डरावितात कपारी,
सटवी टिटवी किंचाळोनी जेथें हृदय विदारी; १३
सर्व समंतामधुनि निरंतर जेथें ओंगळवाणीं
घुमविति घुबडें घू–घू ! ऐशीं वैराणी रडगाणीं. १४
साडेसाती बये उदासी ! अशी गुहा तुजजोगी
बघुनि तिथें जा; एकांताचें चिरकाल सौख्य भोगीं. १५

( २ )

परि येई तूं सुललितरूपे ! उदारशीले देवी !
करीं जगाला प्रगट सुखाची आनंदाची ठेवी. १६

सुरलोकामधिं जगदानंदा पावसि नांव जनीं तूं
रंगदेवता समुचित ऐसें, कीं हृदयरंजनी तूं. १७
दासनयन हे लोलुप जैसे दर्शन तुझें कराया,
तत्पर तैशी ही रसवंती जन्मकथा तव गाया. १८

( ३ )

दिव्य मधूनें स्फटिकशिलेचा तुडुंबलेला पेला
सायन्देवी हिनें समर्पण दैत्यगुरूंला केला. १९
बघुनि उपायन तें शुक्राला हंसें अनावर आलें,
तें त्या मधुमधिं—मधुर विधूचें बिंबचि–बिंबित झालें. २०
तंव नवलानें कुंठित करुनी वृत्ती अशेष अन्या,
त्या सुरसांतुनि सुरांगनासम तीन उदेल्या कन्या. २१
प्रसन्न झाला तो कवि यापरि नांवें तदीय ठेवी:—
(१) काव्यमोहिनी, (२) वीणावेणू, (३) जगदानंदा देवी. २२
गुरुवचनानें सहज पुढें हे आशीर्वाद निघाले,
सारांशानें तेच तिघींचे प्रारब्धकर्म झाले:— २३
रसजन्यांनों कन्यांनों व्हा अवतीर्ण मर्त्यलोकीं,
मनोज्ञ मोहक ह्या रूपांनीं झळका जनावलोकीं; २४
साहित्यानें, संगीतानें, सुनर्म–लीलानंदें,
प्रसन्न ठेवा भवतापांतहि मानवमुखारविंदें; २५
त्यांच्या वाणीमधुनि भरा निज संजीवनी रसाळ,
सुसौम्य शीलें, रुची सुसंस्कृत, हृदयें करा मवाळ. २६
लावा पार्थिव मनें तयांचीं तुमच्या सुसंगतीला,
भूलोकीं मग अनुभवितिल तीं स्वर्गीय उन्नतीला. २७
रंगदेवते ! अशी असे तव पौराणिकी कथा ही,
परि कथिती जी निसर्गवादी, ती भिन्न सर्वथाही:— २८

( ४ )

ते म्हणती, कीं रसाल सजले वासंत मोहरानें,
रानें सारीं रंगुनि गेलीं पळसांच्या बहरानें; २९

कटुनिंबांच्या मधुर फुलांनीं समंत वासित केले,
कण्हेर लवले न झेपुनी ते विपुल फुलांचे झेले; ३०
निर्माळीवरि विकसत होते लागुनि तुरे तुऱ्यांचे,
फुलुनि ताटवे घम घम सोडिति सौगंध्य मोगऱ्यांचे; ३१
स्ववैभवानें इतर फुलांची हरिली ज्यांनीं आब,
दवांत न्हाउनि विलसत होते ते नवफुल्ल गुलाब; ३२
अलिकुलनिर्मित वनवंशांचे पावे वाजविणारा,
पुष्पपरागांसंगें खेळत वाहे झुळझुळ वारा; ३३
तदा उषेची लगबग होउनि ती क्षितिजावरि आली,
सन्मुख ऐसा वसंतवायू पाहुनि मोहित झाली; ३४
तन्मुद्रेला अनुरागानें दिला गुलाली रंग,
उषामिषें ती विलसे राधा, पवन जसा श्रीरंग; ३५
त्या दयितेच्या कानीं मग निज नादसुधा तो ओती,
ती मुरलीरवतुल्य मनोहर ओजस्विनीहि होती. ३६
त्यायोगें जी दिव्य नंदिनी देवी उषेस झाली,
रंगदेवता म्हणवुनि लोकीं उदयास तीच आली. ३७
प्रसन्न मुख, तें अंगोअंगीं चैतन्य खेळलेलें,
शील जियेचें मधुमाधुर्य—न्याय* नियोजुनि केलें;— ३८

(५)

ती तूं. देवी ! प्रगटुनि आतां ये हृदयरंजनातें,
सांगतसे त्या घेउनि संगें रंगेल परिजनांतेः— ३९
बहु गमती तो विनोद, तैसा त्याचा ऋणानुबंधी,
ऐन उमेदीमधिल हंशाही यावा खुशालचंदी; ४०
वक्रोक्तीसह ती व्याजोक्ती, व्याजस्तुती असावी,
श्लेष अगोदर, कीं हर्षाला अजब खुमारी यावी; ४१

---

* काकतालीय न्याय. हंसक्षीर न्याय, देहलीदीपन्याय, यांप्रमाणेंच मधुमाधुर्य न्याय हा एक नवा न्याय कल्पून येथें योजिला आहे ! सारांश, रंगदेवतेचें शील जें मधु, त्यापासून माधुर्य हें केव्हांही निराळें होऊं शकत नाहीं.

भुरळी, थापा, आण बरोबर परोपरीच्या कंड्या,
त्यांचा गोंधळ हंसतां हंसतां वळविल कीं मुरकुंड्या; ४२
मुरके, लटका, छटा मजेची देतिल आनंदाला,
स्मितेंहि यावीं, तीं गालांवरि उठविति तरंगमाला; ४३
त्या मालेनें उतारवय हें छपलें जाइल खास,
चुकेल तेणें रंगेलांतुनि होणारा उपहास; ४४
जन चिंतातुर सुरकुतलेले यांच्या आण कुचाळया,
ज्यांच्या साधक-बाधक पक्षीं कडकड पडतिल टाळया; ४५
स्वच्छंदानें अग्रपदांवरि कलथ्या खातच येई,
हास्य-रसाला चुटकीसरशी भरती आणुनि देई; ४६
गिरीवरोनी सरिता येतां ज्या स्वैरतेस दावी,
प्रमुखत्वें ती आण, तिच्यांतिल गोडी काय वदावी ! ४७
एक मनोरथ विशेष कथितों तोहि तुवां पुरवावा,
निज परिचारकगणांत सेवक हा रंगराव घ्यावा; ४८
मग बनुनी त्या स्वतंत्रतेचा साथी तवानुगामी,
स्तुत्य अशा मी यथेष्ट मौजा करोनि राहिन नामीः— ४९

( ६ )

बहु दृष्टींनीं जें स्थल हितकर सुंदर तसें सुखाचें,
करीन तें मी मम वसतीचें उपभोग—कौतुकांचें; ५०
तिथें उमाळ्यावरि सोईची, शिल्पकलेची केली,
अशी बगीचा-मधुनि उभारिन लहानशीच हवेली. ५१
जिच्या अधाडीवरिल अगाशी, सज्जे सुरेख चार,
फुलवेलींनीं गुंफुनि सजविन मखरचि नखरेदार. ५२
त्या मखराला जागोजागीं सुंदर परड्यांमाजीं
लटकत लाविन बहुविध रोपें रम्य फुलेलीं ताजीं. ५३
कुंड्यांमधुनी गुलाब हंसतां पेल्यांतुनि जलवेली
लोंबुनि करितिल झुलुकींसंगें ती पिंग्याची केली. ५४

कारागिरिच्या स्तंभावरि तें जलपात्र बिलवराचें,
दाविल मंदाकिनींत रमती मीन कसे कनकाचे.* ५५
असेल जें त्या सौधगृहाला पूर्वदिशेचें दार,
घरटीं त्याच्या जडीन दोन्ही बाह्यांस टूमदार. ५६
विविध छटांचीं रम्य पांखरें त्यांत टिपोनी सांवे,
करितिल ऐसे मंजुल रव कीं ऐकत तेच बसावें. ५७
सदभिरुचीच्या आंग्ल जनांतें, नानाविध यवनांतें,
झुलवुनि ज्यानें रंग मजेचा भरिला तत्कवनांतें, ५८
असा विदेशी बुलबुल रात्रीं घेइल सुरेल ताना,
स्वपंचमांतुनि दिवसां कोकिल गाइल वसंतगाना. ५९
त्या उभयांतुनि रामनगरचा पोपट अमुचा प्यारा
पिंजऱ्यांतुनि ही सोडिल हिंदी गिरा सुधेची धाराः- ६०
"चित्रकोटके घाट मिला था संतजनोंका मेला,
झांज, खंजरी, हरिभजनोंका झूलत रहा झमेला;
राम साधोजी । राजा किसन कहोजी ॥ १ ॥ ६१
कचोरी, पूरी, दूधपाक, अरु मालपुवा बनवाया,
तुलसीनें सब साथ संघके रघुनाथको जमाया.
राम साधोजी । राजा किसन कहोजी ॥ २ ॥" ६२
असे मनोरम, सज्ज जयाचे सज्जे सुखासनांनीं,
शृंगारिन तो सौध विरलशा रमणीय मंडनांनीं; ६३
उषःप्रभा जे, गोरोचन जें, सरसीरुहान्तरंग;
गृहान्तरंगहि त्याच छटेचें,—स्निग्ध सुमंगल रंग; ६४

---

* *cf*:-

"मंदाकिनी-मधिल जीं कनकारविंदें
तीं जेवितों मृदुल-नाल-मृणाल-कंदें;
आम्हीं असों नृपसुते ! तरि कांचनाचे,
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे.

—रघुनाथराय पंडित.

वनलक्ष्मीची अशेषसुंदर हीं प्रतिबिंबें चारः—
(१)महारण्य,(२)गिरिकंदा,(३)शेतें,(४)कुरणें हिरवींचार. ६५
वनकुसुमांकित ओढा, ज्यावरि रौप्यरसाचा आळ,
महानदीची तरंगशोभा, तो धबधबा दुधाळ; ६६
महार्णवाचें अकांड तांडव तिमि※ उडवितां फवारे,
तसेंच त्याचें सुखनिद्रेंतिल तें शांत रूप सारें; ६७
त्या मेघांच्या बहुरूपी बहु रंगेल रासमाला,
शारद रवि शशि दिव्य मुलामे देतात जे सराला; ६८
चित्रकलेला अभिमानास्पद ऐसे रंगालेख,
लावुनि दालन निसर्गमंदिर बनवीन तें सुरेख. ६९
अव्यक्तामधिं वसुनि असे जें अभिराम नामदेही,
ग्रंथाधारें बनवुनि ठेविन सन्मूर्तीमंत तेंही.× ७०
कौशल्याच्या अजब चिजांचीं सुंदर दोन कपाटें,
दोघांमाजी निवडक ऐशा ग्रंथमण्यांचे सांठे; ७१
मेजांवरुनि बिलोरी ऐने, तीं सुबक फूलदानें,
वेलबुट्ट्यांतुनि कविवचनें जीं ओथंबलीं मधानें; ७२
दारें, खिडक्या, शोभति ज्याच्या मणिहार तोरणांनीं;
हवा प्रकाशहि वागति वाटे त्यांच्याच धोरणांनीं. ७३
त्या बंगल्यांतुनि हंसधवल ती मऊ बिछायत सारी,
चंद्रदीप तो एकच सुंदर नयनसुखावह भारी. ७४
झारीमधुनी सतत हवेच्या सोईवार ठिकाणीं
मोत्याचें असुं असावयाचें रुचिकर पाचक पाणी. ७५
गुलाब, चंपक, केतक, मुद्गर, कधिं वाळा मलबारी,
त्या पाण्याला आणिल केवळ ती शरबती खुमारी; ७६

---

※ देवमासे— अमी शिरोभिस्तिमयः सरन्ध्रै—
रूर्ध्वं वितन्वन्ति जलप्रवाहान् ।" कालिदासः

× लुकणाचे पुतळे. उदाहरणार्थ, प्रेम, सौजन्य, इ० न दिसणाऱ्या, पण जगत्प्रिय वस्तु.

पितां पितां जें करील अंतर गारेगारचि आधीं,
मिटवुनि डोळे स्वानंदाचा लाविल सहजसमाधी. ७७
उपभोगाच्या वस्तू, ज्यांतुनि मादक पदार्थ नाहीं,
परि देतिल ज्या तनु मन यांना उल्हास सेवनांहीं; ७८
त्या तबकांतुनि असतिल येथें नियमित अशा तयार,
इथेंच येइल चहा दुपारीं रुचिकर अल्पाहार. ७९
एका तिंवई वरोनि करणा संगीत शब्दचित्रें
छेडिल सुमधुर अलाफ केव्हां स्वरयंत्र तें स्वतंत्रें; ८०
बंगल्यामधुनी असे ध्वनींचे फैलावतां तरंग,
गमेल तें स्थल काव्यमधुरसें कविचेंच अंतरंग; ८१
नव्या मनूंतिल नव्या दमाचा ज्यास शिपाई मानूं,
हर कामाला असेल येथें अमुचा सिद्ध ' लहानूं. '* ८२
जे शिकलेले, रसिक, सुभाषी, आणि उदार मनाचे,
स्वागत येथें होइल ऐशा प्रेमी सुहृज्जनांचें. ८३

(७)

ह्या गेहांतिल विविध ठिकाणें दिन-चरिताच्या कामीं
बहु सोईचीं, स्वच्छ हवेचीं, दिसतील नित्य नामी. ८४
नसेल अवजड सामानाचा त्यांतुनि खाटपसारा,
नीटनेटका बेत फडनिशी टापटिपीचा सारा. ८५
दहिंवर पडुनी वरि सोनेरी शारद रविप्रभा ती
लालन करितां दिसती कमलें कैशी बरें प्रभातीं ? ८६
निर्मल, ताजीं, प्रसन्न, मोहक, दिसती तजेलदार,
ह्या सदनांतील वदनांचीही तीच दिसेल बहार. ८७
विमल, निरोगी मुलें फुलेले जणु मखमाली झेंडू,
उत्साहानें उडतिल रबरी जसे तयांचे चेंडू; ८८
समज मजेची बघुनि तयांची अभ्यासांत हुशारी,
येइल त्यांना शिकवायाची पंतोजींस हुशारी. ८९

* घरच्या गड्याचें नांव.

करोनि वेणीफणी मुली त्या अंगें धुवुनि सकाळीं,
'वर कामामर्धिं' दिसतिल कोणी, कोणी सुमनसुकाळीं. ९०
करितिल पूजासाहित्यहि त्या रचना रांगोळीची,
आणि तयारी शुचिर्भूतशा अमच्या आंघोळीची. ९१

( ८ )

उठुनि पहांटीं जलस्पर्शना—नंतर चहा पिवोनी,
फुलबागाची करुनि मरामत, गोवत्स खाजवोनी, ९२
शीळ घालितां पशुपक्ष्यांची जोपा करोनि हातें,
स्नान आमचें होतां पडतिल ठण् ठण् घंट दहा ते. ९३
सूक्त, सौर, जे केवळ हिसके, त्यांना देउनि फांटा,
जयदेवाच्या अष्टपद्यांचा लावीन मी सपाटा; ९४
देवांमागें भिंतीवरि तें सुचित्र कुंजवनाचें,
मध्यें राधामाधव—संगम, तें लय सुलोचनांचें; ९५
दर्शन होतां आनंदोत्सव होइल नवा मनाला,
श्लोकार्धांतचि धन्यवाद त्या येईल वामनाला;× ९६
जयदेवाच्या नादब्रह्मामध्यें विलीन होतां,
तंत्र घडोनी त्या मंत्रांना सहजचि बसेल गोता; ९७
केशर, चंदन, फुलें सुगंधी धूपादि घमघमाट,
देवघरांतुनि घृतदीपांचा होईल लखलखाट; ९८
आरसपानी राधा, माधव शालिग्राम—शिलेचा,
दिसेल ज्यांतुनि विजयचि झाला जयपूरच्या कलेचा; ९९
गोजिरवाण्या त्या लघुमूर्ती पूजुनि अशा विलासें,
करुनि रुक्मिणी—स्वयंवरें मन 'रंगीन' हरिविलासें; १००
साडे अकरा वाजतात तों नैवेद्य व्हावयाचा,
अर्पुनि गंगा गोविंदविडे श्रीहरि पहुडायाचा. १०१

---

× "आत्मा जगज्जीवन वामनाचा ।
जो सोहळा नित्य नवा मनाचा ॥"—वामन.

( ९ )

नर्म विनोदासवें पदार्थेंहि भिन्न रुचींचे ताजे,
जेवुनि नंतर अमुची स्वारी वरि बंगल्यांत विराजे; १०२
मग विश्रांती करोनि वाचन कांहीं साहित्याचें,
बुद्धिबलांचे किंवा खेळुनि डाव कधीं पत्त्यांचे, १०३
सायंकालीं चहासवें तो चाखुनि अल्पाहार,
फिरावयाला जायास्तव हे मग होतील तयार. १०४

( १० )

शरदागमनीं जे मेघांचे बहुरंग पेहराव,
स्मरण तयांचें घडावयाचें दिसतांच रंगराव. १०५
केशांचा तुळतुळित सुगंधी शिरीं किरीट फिरंगी,
केव्हां फेंटा, पगडी, टोपी, रुमाल कल्पित रंगी; १०६
रंगकुतूहल, बांधायाची ऐट सुरेख रुमाल
बघुनि नटानें खुलुनि म्हणावें केलीस तूं कमाल ! १०७
झगा मोंगली, कधिं अंगरखा लांब मराठेशाई,
पायघोळसा दाविल केव्हां तो थाट पेशवाई; १०८
वीरश्रीचा पुत्र कनोजा, रजपूत साम्यतेचा,
दिसेल केव्हां निवळ पारसी, सज्जन विलायतेचा. १०९
धोतर अथवा जामा किंवा सुरवार वा विजार,
उपानहें तीं असावयाचीं जो वेश तदनुसार. ११०
गंध उभें तों केव्हां अडवें कदा बदामी घाटी,
सारीं राष्ट्रें टकमक बघती अशी मिशांची धाटी ! १११
" ह्या हर्ष्यांचें राष्ट्र कोणतें हेंच कळे न कुणाला ! "
ध्वनी जनीं हा निघतां मानिन मी धन्य आपणाला. ११२
बहु राष्ट्रांचा घडोनि येणें एकांतुनि संहार,
' एकराष्ट्रता ' यांतिल मख्खी हीच खुबी हें सार ! ११३
वेषांतिल हें वैचित्र्याचें आहे प्रमेय साधें,
त्यानें ममता तैशी प्रियता भिन्न समाजीं साधे. ११४

दिसण्यामध्यें विचित्र चित्रें एकाच साखरेचीं,
तरि सर्वांतुनि साखर, गोडी, सामान्य हें खरेंची. ११५
ज्या रंगीं, ज्या रुचींत, किंवा ज्या घाटांत भरावें,
त्यासम व्हावें, आदरिलें हें जलशील रंगरावें. ११६
धार्मिक किंवा सामाजिक वा घटना स्वराजकीय
असो, तियेला हर्षे म्हणजे प्यारा ! जसा स्वकीय. ११७
नगरामध्यें कुणांत होवो कसलाहि सुप्रसंग,
रंगराव हा त्यांत नेमका; तो आला कीं रंग ! ११८
भिन्न समाजीं प्रिय व्हायाला वेषाहुनी तयानें
विशेष साधन योजियलें, जें करितें कार्य जयानें. ११९
मवाळ, त्याचें मित विनयाचें, भाषण सुमधुर, साचें,
नर्म विनोदहि भासति हृदयीं बिसतंतु सारसाचे. १२०
नहि केवळ तो प्रिय नगरांतचि, परि त्याचिया समंतीं
ग्रामस्थांसहि पसंत; त्याची करितात तेहि खंती. १२१

(११)

ह्या रीतीनें नित्य निराळा पोषाक तो करोनी,
भिन्न दिशेला जनांस भेटुनि, येवोनियां फिरोनी, १२२
रात्रौ अमुचें रसाल भोजन गोष्टींत व्हावयाचें,
आणि टांगिला बुलबुल तेथें आम्हीं निजावयाचे. १२३
असेल जेव्हां ललितकलेचें रंगावतरण नामी,
रंगराव हे जातिल तेव्हां स्वानंदाच्या धामीं. १२४
अथवा देवी ! ठेवियलेले अलगत अचूक तेथें,
कर्णमधुर ती सारंगीची ' कूं कूं ' जेथुनि येते. १२५
मंजीरांची छुम् छुम झिन् झिन बारीक मंजरीची,
शाहीराला जणु लय सांगे प्रति तार तंबुरीची; १२६
अस्तानी वर सारुनि कोणी ग्यानू झुलोनि राहे,
कड्यावरी निज करलाघव तें सभ्यांस दाविताहे; १२७
रसिकशिरोमणि कवि होनाजी, ते सगन, रामजोशी,
होतिल यांचीं मधुमय कवनें कवणांस तीं नकोशीं ? १२८

वसंतवायूसमान लहरी येति तयांच्या ताज्या,
ब्रह्मकपाटासमान परि तो बंद असे दरवाजा ! १२९
रसलुब्धांची मोहाळापरि बाहेर थोप गर्दी,
एकाचीही डाळ शिजेना, आंत शिरेना वर्दी; १३०
मग सरसावुनि अस्मादिक हे ठोठावितील दार,
'सरदॉर !' अशा ललकारीचा करितील वाक्प्रहार. १३१
'कोण ?' म्हणोनी वाघोबाची डरकी येतां 'हर्षे.'
चुटकीसरसा फटीमधोनी आनंद आंत वर्षे ! १३२
यॉवें !–यॉवें–रंग ह्यू ! अशा स्वागत घोषामाजीं
प्रभावळीमधिं नटीसमोरचि होइल जागा माझी. १३३
उवळ्या दिवसां दिसावयाच्या ज्या मूर्ति भंगलेल्या,
गुलालगोटे फुटुनि इथें त्या असतील रंगलेल्या. १३४
कोणी गंगाजमनी कोणी पिंगट अशा मिशांचे,
कुणि कलपानें कल्पित तरणे, बहुधा गरम खिशांचे; १३५
हे मुरलेले गोड मुरब्बे, गुलकंद रापलेले,
अरविंदांतिल मिलिंद कीं हे अगदीं समरसलेले ? १३६
'सरदॉर !' अशी हांक विनोदें दिली असेल जयाला,
असोनि परिचित न यावयाचा तो ओळखावयाला. १३७
असेल तन्मुख मित्रजनांनीं गोंजारिलें गुलालें,
बलभीमामधिं दिसेल त्याचें रूपान्तरचि जहालें ! १३८
आणिल शिष्टागमन इंशानें सुविचित्र रूप जीतें,
त्या 'गमती'चीं चालू होतिल मग शेलकींच गीतें. १३९
वीणा, वेणू, सारंगीच्या मंजूळ संगमानें,
आणि तयाशीं कुशल नटीच्या लयशील सुस्वरानें, १४०
अभिनयरंजित रसवंतीच्या रम्य तरंगांसंगें
झुलुनि रहातिल लोलुप जन ते रंगोनि अंतरंगें. १४१
मग अधिदेवी–कृपाकटाक्षें दौलत वाढुनि कांहीं,
रंग उडाल्यावरती कोणी ह्या गांवचाहि नाहीं. १४२

प्रभात समयीं दिसेल जो तो स्वगृहीं सालस जैसा,
रंगरावही बंगल्यामध्यें पुन्हां निखालस तैसा ! १४३

( १२ )

यापरि देवी जगदानंदे ! भोगुनि पौर सुखांतें,
उपभोगिन मी केव्हां केव्हां त्या सहजकौतुकांतें. १४४
कीं एकाच्या सतत सेवनें अरुची येइल जेव्हां,
पालट योगें नवरुचि देतिल तयांस दुसरीं तेव्हां. १४५
म्हणोनि जाउनि नगरोपान्तीं खेड्यांतुनि सहलीला,
अवलोकिन मी ग्रामस्थांच्या नैसर्गिक सुख-लीला. १४६
शेतें, कुरणें, हिरवे डोंगर, त्यावरिच्या वनमाला,
रवि, शशि यांचे अरुण महोदय, कुसुमांकित वनमाला, १४७
शुद्ध रुपेरी निर्झर, ओढे, गोचर, सवत्स धेनू,
छायेमधुनी गोपालांच्या गोष्टी, सुस्वर वेणू, १४८
तृण-धान्यांची महोत्सवाची ती कापणी, गुऱ्हाळें,
सरस मनोरम हे देखावे पाहीन निरनिराळे; १४९
नव्या नवाळी निघतां जाइन वनभोजनास गांवीं,
गावीं न सुखें मुखेंच नुसतीं, परि तीं उपभोगावीं; १५०
हा मम हेतू जाणुनि दे तूं देवी ! उभय सुखांस,
म्हणुनि मागतों दास निरंतर योग तुझा सहवास. १५१

प्रकाशन—' सद्विचार, ' बडोदें.
१९२२–२३.

---

## चिंतोपंत उदास.



( शालिनी. )

संसारींचे व्यर्थ आनंद सारे,
कीं मोहाच्या हे शिखींचे पिसारे;

गंधर्वांचीं हीं पुरें कीं मजेचीं ?
कीं स्वप्नींच्या ही मिठी मोहनेची ? १
कीं वंध्येच्या बोल नामी मुलांचे ?
आकाशींच्या गंध कीं हे फुलांचे ?
ह्या वेधाया काय आह्मां कुरंगां
मध्यान्हींच्या लोटल्या पंचगंगा ? २
किंवा नाहीं नाथ ज्या मूर्खतेला*
त्या चंडीनें हा स्वविस्तार केला ?‡
आनंदांनों, हा तुह्मांला प्रणाम !
सोडा माझें आजपासून नाम. ३
रे मायेच्या बंधुलांनों† मुलांनों !
जा येथोनी इंद्रजालाकुलांनों !
आला मातें तूमचा वीट आतां
जा, माघारां कां ठकांनों पहातां ? ४
ज्या प्रौढाच्या स्थैर्य आलें मनाला,
दावोनी हे खेळ सारे तयाला
तृप्ती किंवा ह्याल का सौख्य कांहीं ?
ह्यापासोनी त्यास तों लाभ नाहीं.
ह्या, फंदींच्या धुंद मेंदूंत नांदा,
क्लृप्त्या सांधा, कल्पनासेतु बांधा;
ह्या रे ! प्यारे तूमचे तैं तरंग,
रंगाऽकारें दिव्य जैसे पतंग; ६

---

* जो वास्तविक मूर्ख आहे, त्यालाही ' तूं मूर्ख आहेस ' असें म्हटल्यास, मिथ्यारोप वाटून तो रागावतो. अर्थात् मूर्खतेला कोणीही धनी नाहीं, ती पदरीं घेण्याला कोणीही तयार नाहीं, हा भाव.

‡ सांसारिक आनंद,–विषयानंद,–हा सर्व अज्ञानाचा, मूर्खपणाचा पसारा आहे, हें तात्पर्य.

† लेकवळे–दासीपुत्र.

किंवा रेणू सूर्यरश्मींत दाट,
तैसे तेथें नाचरे ते अचाट;
कीं कैफाची आश्रिता भासमाला,
तैशी त्यांची तैं झुले रासमाला. ७

( २ )

आतां वंदूं त्या उदासीनतेतें,
येथें जीवन्मोक्ष ती,—तीच देते.
ज्ञानज्योती पुण्य गे तूं स्वभावें;
ध्यावें देवी ! त्वत्पदीं लीन व्हावें. ८
कोठें कांती दिव्य तूझ्या मुखाची,
कोठें शक्ती आमुच्या लोचनांची !
तो तेजाचा पुंज पाहोनि थोर,
ये काळोखी चर्मचक्षूंसमोर. ९
पांडित्याच्या काजळें लिंपिलेली
ही अंधारी लोचनीं सज्ज केली,
तेणें आह्मीं शाहणीं पाहणारीं
तूंतें काळी पाहताहोंत सारी ! १०
उंची वस्त्रें, लेवुनी रत्नमाला,
जी गर्वानें लाजवी अप्सरांला,
त्या *हब्साण-स्वामिनीच्या समान
देतों आह्मीं तूजला वक्र मान. ११
झांकायातें आपुली गोम कांहीं,
उद्धाटावीं अन्यरंध्रें वृथाही,
हा तों आहे दुर्जनांचा स्वभाव;
देवांचाही त्यांपुढें ना निभाव. १२
आहे छाया भानुजायाहि काळी,
कालिंदी वा मेघमालाहि काळी,

* हब्शी अथवा सीदी लोकांचा मुलुख. ( ॲबिसीनिया. )

सूर्यासंगें श्री नवेन्दूस काळी,
साक्षात् राजा-रामकांतीहि काळी. १३
काळी गोरी ही परीक्षा कुणाची ?
ज्यांना नाहीं चाड आन्तर्गुणांची;
मी तों गातों श्रेष्ठ वंशावतार;
देवी, तूझें शील,—अंतस्थ सार.+ १४

( ३ )

पूर्वप्रान्तीं दक्षिणासव्य देशीं
श्रीगंगेच्या पैलतीर-प्रदेशीं,
जेथें नोहे रीघही मानवांस,
होता मंदादित्य याचा निवास. १५
देखावा त्या देववासस्थलाचा
शोभे मोठा शांत गंभीर साचा;

+ देवी उदासीनता ( Melancholy ) ही शनि ( Saturn ) व अग्नि आणि पवित्रता यांची अधिदेवता ( Vesta ) या उभयतांच्या संयोगापासून झाली, अशी मिल्टनची काव्य-कल्पना आहे. ज्योतिःशास्त्रमतानें आपल्यांतही उदासीनवृत्ति शनीच्या प्रादुर्भावानें उत्पन्न होते असें मानितात. म्हणून मीही मूळांतील कल्पना कायम ठेवून देवी उदासीनतेचें जनकत्व त्याच देवतांकडे योजिलें आहे. शनि हा सूर्यपुत्र असून त्याला ‘ मंद ’ असेंही म्हणतात. ( मंदः सौरिशनैश्चरौ ) सबब, मी त्यास ‘ मंदादित्य ’ असें नवीन नांव दिलें आहे. कारण, ह्या नांवांत सकृद्दर्शनीं वा बाह्यदृष्ट्या मंद म्ह० अंधक, व अन्तर्भागीं आदित्य, अर्थात् देदीप्यमान् असा उदासीनवृत्तीला अनुकूल असणारा ध्वनि आहे. मातृस्थानीं होमकुंडांतील पवित्र अग्नीची जी धूमज्योति, तिची योजना केली आहे. ह्या योजनेंतही बाहेरून काळेपणा व अंतस्थ दिव्यता सूचित होते. अग्नीची दिशा आग्नेय. ही पूर्वप्रान्त, दक्षिणासव्य-देश, आणि श्रीगंगेचा पैलतीर-प्रदेश ह्या शब्दांनीं दिग्दर्शित करून त्या स्थलीं मंदादित्याच्या निवासाचें उदासवृत्तीला परिपोषक असें वर्णन केलें आहे. ह्याप्रमाणें मिल्टनच्या काव्य-कल्पनेस किंचित्‌ही बाध न आणतां उदासीनता ह्या दैवी विभूतीचें अवतरण गाइलें आहे.

विस्तारांचे वृक्ष ते भोंवतालीं,
छाया मेघाडंबरातुल्य झाली. १६
जागोजागीं वृष्टि व्हावी फुलांची,
आंदोलावीं तोरणें वा फलांचीं;
राईंतोनी रौप्यलेखा सदाही
वाही, स्तोत्रें सौम्य शब्दांत गाई; १७
एकांताच्या त्या गुहा खोल खोल,
कोठें जाळ्या, कुंज, वेली विलोल;
मध्याह्लाला अर्धरात्रासमान
होई तेथें शून्यता भासमान. १८
वाटे सारे जीव झोंपेस आले,
कीं हे येथें स्तंभनें स्तब्ध झाले ?
कोणाच्याही शब्द येना मुखानें,
जैसे सारे नांदती चित्सुखानें. १९
अभ्रांतोनी जेविं आदित्य भासे,
तैसा मंदादित्य धामीं प्रकाशे;
तो विश्वाला खिन्न झाला,—विज्ञाला
होता दिव्य स्वान्तरामीं रिझाला. २०
एकेकालीं तो सुखें बैसलाहे,
एकाग्रत्वें अग्निकुंडांत पाहे,
तों आज्याचा धूम त्यांतोनि नामी
होऊं लागे संथ आकाशगामी. २१
किंचित्कालें त्याचिया अन्तरालीं
दिव्य ज्योती एक संभूत झाली;
तीमध्यें तूं शांत तेजोनिधाना
होसी आविर्भूत देवी समाना. २२
बाहेरोनी श्याम वा मेघनील,
ती तेजस्वी अन्तरीं सत्वशील,

ऐशी तूझी मूर्ति तो देव पाही,
संज्ञा तूंतें दे ' उदासीनता ' ही. २३
स्वद्रूपीं तो लीन झाला मनानें,
वागे नित्यानंद-संवर्धनानें,
देई तूंते प्रेमसन्मान ते ते,
जे इंद्राते योग्य वाचस्पती ते. २४

( ४ )

ये ये देवी ! लाभ दे दर्शनाचा,
मानोनी हा मंत्र आवाह्नाचा;
वेवोनी ये सांगतों मी तयांला,
ह्या जन्माची सार्थता व्हावयाला. २५

( ५ )

स्वार्थामार्गें धांवतां जी दमोनी
रम्याऽरामीं जाय राही रमोनी,
ती संसारीं सज्जनांचीच खोती,
ज्याजें मोजी गे प्रवृत्ती, नको ती ! २६

( ६ )

निःसारांचा हा जियेनें पसारा
गुंडाळोनी ठेविला दूर सारा;
नातीं, माया, त्यागिले लोभ, मान,
हे सोनेरी शृंखलांच्या समान. २७
नाना आशा, वासना, अंतरालीं
प्रातर्बाष्पें हीं जियेचीं निमालीं;
ज्ञानार्कांतें जी निवृत्ती वळोनी
प्राशी बुद्धथा आण ती आकळोनी. २८

( ७ )

वाचाळांची ती क्रियेवीण वाणी,
बैसे जीतें पाहतां दीनवाणी,

वक्र-व्यंग्य-व्याजसंभाषणें तीं
ह्यांचे भाले बोंथती तीव्र हेती; २९
भिंगाऐशी अंतरीं शुध्द साधी,
जी अन्यांते दे न केव्हां उपाधी,
तूझ्यासंगें आण तूं आणखी ती
देवी मौना, आपुली की, सखी ती. ३०

( ८ )

आहे ज्याचें अल्प—नेमस्त—सारें,
दैवी चर्या चालते यद्विचारें,
नेवोनीयां भोगतृष्णा लयाला,
जो सौख्याचें सत्व दे प्यावयाला; ३१
ऐसा संगें देव संतोष × आणी,
आहे त्याची ऐहिकांना शिराणी;

( ९ )

तो आला, कीं नामधारी उपास
ह्याची झाली पारणा सोपहास ! ३२
मारोनी हा ताव एकादशीला,
दृष्टी लावी साधनद्वादशीला,
ऐकूं धांवे नाटकी कीर्तनांतें,
ह्याचें आहे भक्तिशीं काय नातें. ? ३३

( १० )

ज्या देवीच्या स्थीरता अंतराची
राहे जैशी ती महासागराची,
लागेना जैं द्वंद्ववातांस ठाव,
हेलाव्यांचा हो न तेणें उठाव; ३४
अंतर्लीनें सर्वदा इंद्रियें तीं
होवोनीयां नांदती मीनरीती,

× " संतोषादनुत्तमः सुखलाभः । "—पतञ्जलिः

ज्ञानज्ज्योती यन्मनीं सावकाश
देई गेहीं दीप जैसा प्रकाश; ३५
आदर्शीच्या चंद्रबिंबाप्रमाणें
ध्याते आत्मा-राम जी एकतानें,
ऐशी देवी शांति घेवोनि ये तूं,
आहे माझा तीवरी फार हेतू. ३६

( ११ )

तो पाही,—तो उंच कैलासगामी,
त्याला आधीं आदरें आण धामीं;
चेतोवृत्ती पंख हे सोनियाचे
दासा ऐसे पूर्ण आधीन याचे, ३७
त्या पंखांतें घेतसे आंवरोनी,
आला खालीं शांत वायूवरोनी;
हा तों शास्ता सर्वही कामनांचा,
जेता विद्युत्-प्राय जें त्या मनाचा, ३८
विश्वात्म्याशीं स्वात्म-संयोग साधी,
ॐ ब्रह्माचा दूत तो हा, समाधी.
देवी ! साक्षात्कार होतो मला हा
आला खालीं स्वर्ग आला, अहाहा ! ३९

( १२ )

सायंसूर्यें दीप्ति जैशी वनाची,
तैशी तूझ्या दीपवी आननाची,
ह्याची मुद्रा मुद्रिता की वदावी ?
केव्हांही घ्या, उन्मनोभाव दावी ! ४०
चिंतावृत्ती, तीव्र वैराग्य, भक्ती,
पावित्र्याची शांततेची प्रसक्ती;
बिंबे येथें लीनता, एकनिष्ठा,
देवत्वाची हींत आहे प्रतिष्ठा; ४१

आत्मा तूझा भासतो लोचनांत,
विश्वात्म्याच्या गुंतला चिंतनांत;
येथें झाला ईश्वरप्रेमभावें
आलिंगोनी स्तब्ध केलें असावें. ४२
आकाशाशीं दृष्टिसंवाद चाले,
चालीमध्यें चिंतनें मांद्य आले;
तालाऐसे सारख्या अंतरांचे
आपोआप न्यास होती पदांचे. ४३
तन्वंगातें चीन-चैलें पिशंगी ×
झांकोनीयां घेतलें ह्या प्रसंगीं;
तेणें मूर्ती ही जटा भासवीते
गंगायुक्ता मुक्त जी शांभवी ते. ४४
हातामाजीं हात घालोनि आली,—
थांबे आतां, स्वान्तरामीं निमाली;
नाहीं हीतें ह्या क्षणीं देहभान,
झाली साक्षात् शैलमूर्तीसमान. ४५
जी आकाशीं दृष्टि होती खिळोनी,
आतां खालीं तीच ये ढांसळोनी;
ह्या लोकींच्या जीविताच्या विचारें
वाटे जाते भूतलीं खेदभारें. ४६
ह्या उल्लासें वासना भस्म होती,
मोठाईची गारगोटी अहो ! ती.
देवी सेवी मौन जिव्हा न हाले,
मौनामाजीं सर्व वागर्थ आले. ४७

( १३ )

घेवोनि ह्या देवता साहचर्या
तूझ्यासंगें नित्य नेईन चर्या;

× फिक्या तपकिरी, किंवा पिंगट रंगाच्या.

आतां माझ्या चित्र सद्भावनांचें
तैसें भावी रेखितों जीवनाचें. ४८

(१४)

जेव्हां सृष्टी होय सूर्यास्तकालीं
पिंगच्छाया पूर्ण वैराग्यशाली,
जाती पक्षी सर्व मौनादरातें
दावोनीयां आपुल्या कोटरांतें; ४९
तेव्हां माझी लांब घालोनि कंथा
एकान्ताच्या नित्य जाईन पंथा;
जेथें भोंतीं घातली शाद्वलांचीं✽
कीं पृथ्वीनें आसनें कंबलांचीं; ५०
व्यायामार्थी त्या स्थलीं आक्रमोनी
रात्रीं शय्याऽसीन राहीन मौनी;
ह्या लोकींचा जाणुनी पाहुणा मी
औदास्यानें लीन होईन रामीं. + ५१
श्रांता ऐसा चंद्र जेव्हां स्वयें तो,
आकाशाच्या ऐन मध्यास येतो,
नाहीं साथी मार्ग तें कोण दावी ?
आकाशाची काय सीमा वदावी ! ५२
स्वर्मार्गींचा तो प्रवासी चुकोनी
अभ्रांतोनी पाहतांना झुकोनी,
चुंबोनी त्या गोड बिंबाननातें,
त्याचें माझें एक लावीन नातें. ५३

(१५)

गंगातीरीं केधवां उंच ठायीं
मी काळाचा खेळ चिंतोनि राहीं;

✽ हिरवळींचीं. + आत्मारामीं.

तों होणारा दूर कोठें स्मशानीं
आवेगाचा शोक येईल कानीं; ५४
जैसा त्याचा हेल मर्मी शिरेल,
तैशी देहासक्तिही ओसरेल;
जी सिंधूच्या दुर्दशा जीवनाची,
ती संसारीं मानवी जीवनाची; ५५
दोघांच्याही सारख्या वेरझारा,
नाहीं थारा शाश्वतीचा किनारा;
तत्खेदाची तुल्य कंटाळवाणी
चालू राहे गर्जना वा कहाणी. ५६

( १६ )

सृष्टीमध्यें हो विपर्यास जेव्हां,
जाणें नाहीं काननीं इष्ट तेव्हां,
राहूं कोठें योजुनी चंद्रशाला,
अभ्यासाला अंतरावें कशाला ? ५७
ज्याचीं द्वारें बंद वातायनें तीं,
बाहेरींचे शब्द येती—न येती,
अग्नीचें कीं तेज जेथें दिव्याचें
अंधाराशीं डाव खेळे जुव्याचे; × ५८
ऐशा ठायीं शांत रात्रिप्रसंगीं
जों व्याधानें वेधिलेली कुरंगी
ते सप्तर्षी पश्चिमार्धास येती,
नेऊं वेळा तत्त्वसंचिन्तनें ती. ५९
सूक्तें, ईशावास्य, वासिष्ठ, गीता,
सूत्रें आणि स्तोत्रवाणी विनीता,
ह्यांनीं पाहूं दाविती हीं तयाला,
साधोनीयां येथ चेतोलयाला. ६०

---

× अर्थात् ज्या स्थलीं उजेड हा केवळ लुकलुका आहे, अशा जागीं.

जे पुण्यात्मे मोठमोठे मनीषी,
आम्हांतें हीं पुस्तकें दिव्य ऐशीं
ठेवोनीयां देह सोडोनि गेले,
आतां कोठें राहती ते उदेले ? ६१
ज्यानें त्यांच्या दिव्यता ये मनाला,
सायुज्याच्या पावले ते पदाला,
त्या विज्ञानें सर्वसाधारणातें
येथें जाणूं ये जगत्कारणातें. ६२

(१७)

येतां ग्लानी ह्या विचारें मनाला,
द्याया त्याच्या भिन्नता सेवनाला,
जीं आख्यानें होत शोकावसानीं,
पाहूं तीं तीं स्वेतिहासीं पुराणीं. ६३
त्यांमध्यें तों ख्यात आहेत कांहीं,
होती केव्हां दृश्य तीं नाटकांहीं;
त्यांनीं आलें थोरवीला जगांत
शोकान्ताचें नाट्यही या युगांत. ६४

(१८)

ऐके देवी, हे विशुद्धे उदासी !
लोकीं जे जे इंद्रियार्थी विलासी,
शक्ती तूझी आकळेना तयांतें,
जी आकर्षी मूर्त मृत्युंजयातें ! ६५
तूं चित्ताच्या दिव्य तारा लयानें
छेडोनीयां आपुल्या वाङ्मयानें
जेव्हां वर्षूं लागसी स्वादुसारा
कारुण्याच्या संथ गंभीर धारा, ६६
तेव्हां वज्रासारख्या संयमाचें
भेदे अंतर्याम तेंही यमाचें;

मार्कंडाचे पाश तो शीघ्र सोडी,
सावित्रीशीं सत्यवानास जोडी. ६७

(१९)

निशा, तारादेवी, क्रमण करितां मंद गतिनें,
तयांसंगें जावो मम समय ऐशा प्रगतिनें;
जगद्‌—व्यापाराला समुचित उषा ही मग मला
दिसो ह्या रूपानें; खचित असलें रूप विरला !— ६८
मिषानें मेघांच्या वदन पदरा आड धरिलें,
जिनें संसाराला जणु विटुनि वैराग्य वरिलें,
जपे सोऽहं सोऽहं चलित पवनाच्या प्रतिरवें,
बघे ती आत्मा, जो प्रकट जगतांतोनि मिरवे; ६९
वनश्री—ज्या रामावरुनि फिरवी चामर—सखी,*
निघे नीडांतोनी किल किल रवें सामरस की !
तुषारांचे अश्रू गळति जणु मोत्यें झळकती,
कवीला, भक्ताला, अतुल मिळती ह्या मिळकती. ७०

(२०)

ढगें तीं पांगोनी प्रखर रवि येईल उदया;
स्वतेजें होतां तो त्रिभुवनजयी सोडुनि दया,
उदासीने ! ने तूं मजसि म्हणतों त्या वनपदीं
नको बाजीरावी मज फुटकही ह्या जनपदीं ! × ७१
जिथे मोठे मोठे खदिर, शिसवे, साग, कळकी,
कुडे, आंबे, जंबू, पळस, करवंदी सकळ की;

---

* वनश्री सखी ज्या रामावरुनि चामर फिरवी असा अन्वय.

× " ब्रह्मावर्त्तं जनपदमथच्छायया गाहमानः " । कालिदासः अर्थात्‌ आंतून नाना प्रकारच्या क्लेशांनीं व दुःखांनीं व्यापलेली, आणि केवळ वरपंगी डौलदार अशी थोरवी व आंबट सुखें अनुभविण्यासाठीं ह्या लोकवस्तींत ठाणें देऊन रहाणें नको, हा भाव.

छताऐशी छाया, गगन न दिसे, ऐन दिवसां
गमे सायान्हाचा समयच असे अंधक असा; ७२
कुठाराच्या घावासह कधिं निसासा न निघतो,
जिथें कोळी किंवा शबर रिघतो वा न रिघतो;
न सिंहा-वाघाची चुकुनि ललकारी दचकवी,
जिथें टांकारी हा कवन जुळवी शाब्दिक कवी; ७३
जिथें ती भृंगांची मधु पिउनि पुंगी घुमतसे,
पलाशांच्या पुष्पां-वरुनि वनदेवी रमतसे;
जिथें गाते दूजी विमल **तमसा**+ गोड भजनें,
अशा गांभीर्याच्या गहन विपिनीं तूंच मज ने. ७४

(२१)

तिथें तीर्थातीरीं फुलुनि वनजाती, गुलतुरे,
सुगंधी जें कुंज-स्थल करिति रंगीत गहिरें,
बसूं ये त्यामध्यें कडकडित मध्याह्नसमयीं
नको हें देखाऊ विषयसुख, वांछा विषमयी ! ७५
शिलेचा बैसाया प्रकृतिकृत तो मंचक, वरी
स्वतांची मांडोनी मृदुल अजिनें, कंबल, बरीं,
उन्हाच्या वेळेला सहज पडतां भास मजला
असा हो, कीं भालीं हिमकर वरोनी उतरला;* ७६

---

+ " अकर्दममिदं तीर्थं भरद्वाज निशामय ।
रमणीयं प्रसन्नाम्बु सन्मनुष्यमनो यथा ॥ १ ॥
न्यस्यतां कलशस्तात दीयतां वल्कलं मम ।
इदमेवावगाहिष्ये **तमसा**-तीर्थमुत्तमम् ॥ २ ॥ "

वाल्मीकिः—

* येथून पुढें २२ व्या कलमांतील उपान्त्य श्लोकापर्यंत चिंतोपंताच्या स्थितीचें वर्णन, हें " रमणीयार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम् । " ह्या व्याख्येस अनुसरून कवीच्या भाषेनें केलेलें केवळ काव्यवर्णन होय. वस्तुतः चिंतोपंतानें आपल्या मनाचा सूर्यावर संयम केला असतां, त्यास योगनिद्रा आली, व तो अंतर्दृष्टीनें

दिसेना कोणीही, फिरति भंवत्या अंगुलि मुखीं,†
शिरीषाचे तंतू!–सुखद!–असती कोण सुमुखी?
वनाची ह्या देवी असति अथवा योगिनि अये?
कवीची तंद्रा कीं अवतरुनि निद्रा×जवळ ये? ७७

सर्व अलौकिक चमत्कार पहात आहे, अशी येथें कल्पना आहे. कल्पनातीत सौंदर्यगुणांनीं भरलेल्या असंख्य भुवनांचें एकसमयावच्छेदानें वर्णन कसें करावयाचें! तें फक्त ' सुरत्नांचे चेंडू गरगर असंख्यात फिरती, ' ह्या एकाच ओळीनें केलें! आणि आपल्यांतील ज्योति, तीच विश्वांतील ज्योति, जीवात्मा तोच विश्वात्मा, व विश्वात्मा तोच जीवात्मा, असा दृढ चिंतनानें अनुभव येऊन चिंतोपंत ब्रह्मानंदांत लीन झाला, असें सांगून त्याची योगनिद्रा संपविली आहे. ह्या निद्रेंत त्यांस ऐकूं येणारा ध्वनि अर्थात् प्रणवाचा समजावयाचा. आपल्या आचार विचारांशीं जुळणारें हें सर्व वर्णन मिल्टनच्या मूळ काव्यांतील ज्या ओळींवरून केलें, त्या तुलनेसाठीं येथें देतों:—

" And let some strange mysterious dream
Wave at his wings in airy stream
Of lively portraiture display'd
Softly on my eyelids laid :" &c.

† cf :—Sleep, sleep on ! forget thy pain :
My hand is on thy brow,
My spirit on thy brain,
My pity on thy heart, poor friend;
And from my fingers flow
The powers of life, and like a sign,
Seal thee from thine hour of woe."
*Shelley.*

×" इयं हि निद्रा नयनावलम्बिनी
ललाटदेशादुपसर्पतीव माम् ।
अदृश्यरूपा चपला जरेव या
मनुष्यसत्त्वं परिभूय वर्धते ॥ "
मृच्छकटिककर्त्तारौ–रामिलसोमिलौ.

दिसेना, बोलेना, नयन थिजले, भान चळलें,
तनू चंद्रापीडा–सम मम जणूं काय गळलें.

( २२ )

अहो ! हा देखावा ! लखलखित आकाश सगळें;
प्रकाशाचा पुंज प्रखरतर मध्यें झळझळे; ७८
सुरत्नांचे चेंडू गरगर असंख्यात फिरती,
कळेना दे यांनां कवण इतकी संतत गती.
कुठें आहे मी ? हा सहज मजला प्रश्न पुसतों,
तसा तेजोगोलां–मधुनि तितक्या मीच दिसतों. ७९
कसा मी एकाचा अगणित जहालों, मज बघे ?
असे मी तैसे हे फिरुनि इतके एक अवघे ! †
म्हणूं ' मी ' कोणाला ? अतुल समतत्त्वांत शिरलों;
इथें ब्रह्मानंदीं मिसळुनि मला मी विसरलों ! ८०
अनंतां भृंगांचा जणु जमुनि गुंजारव घुमे,
सभोंतालीं सारा ध्वनि मधुर तैसा दुमदुमे;
असा हा पाहोनी परिसुनि चमत्कार नवलें,
स्वकीयानंदाचे घन खळखळोनी रिचवले. ❀ ८१
जहालों जागा मी नयन उघडोनी बघतसे,
असे कुंजामाजीं मजहुनि दुजें तेथ न दिसे;
झऱ्याचा, भृंगांचा रव तदनुकारी विलसला,
सुखाच्या स्वप्नीं मी निवळ नुकता जो परिसला. ८२

(२३)

अशा रीतीनें मी अनुदिन उदासीन बनलों,
वनीं आलों गेलों, तरि पण नव्हे मी बहकलों;
जगाला सोडोनी, विसरुनि यजूचीच नियती, ×
न होणें गोसावी, उचित मज होणें न हि यती. ८३

† "The I became the All, the All is I and Bliss."
—Vivekananda.

❀ आनंदाश्रू कोसळले हा भाव.

× ईशावास्य मंत्र ९ ते १३ पहा.

अभेदें पाहोनी हरिहर, असे त्यांस भजणें,
मला देवद्वारीं रुचतिल कथा आणि भजनें;
सुरेला सद्भक्ता जरि परिसवी सात्त्विक कथा,
तरी माझ्या जागीं अनुभविन मी स्वर्ग नुसता. ८४
निदानीं, हा सारा समजुनि खटाटोप लटिका,
मिळो शांतीची या जरठ तनुला पर्णकुटिका;
वसोनी तेथें मी बहुविध जगाच्या अनुभवें
छटा तत्त्वज्ञाच्या झळकविन देवी तुजसवें. ८५

प्रकाशन—‘ सहविचार ’
बडोदें १९२२-२३.

---

## श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांचा सुवर्ण महोत्सव.



( शार्दूल. )

या कालीं मकरांत सूर्य झळके वाचस्पतीसंगतीं,
दिव्य प्रेम तसा प्रकाश वरुनी दोघेहि ते वर्षती;
तेणें विश्व सुवर्णरूप सजलें, अत्यंत आनंदलें,
त्याचें बिंब समान मोहक असें साजे बडोद्यांतलें.

( स्वनितक Sonnet )

झालें अर्ध शत स्वराज्य करुनी श्रीमान् सयाजी नृपा,
स्वर्णानंद–महोत्सवास करिते त्यांची प्रजा कौतुकें;
आली आज फलास ती सुविरला विश्वेश्वराची कृपा,
त्या योगेंच विलोकिती जन महाराजांसवें हीं सुखें.
हे राजर्षि अगाध पूर्व सुकृतें दीर्घायुरारोग्यता
यांहीं मंडित, देवभूमिवरि ह्या आले स्वराजासनीं;

---

1 Golden Jubilee.

विद्या पाश्चिम नीति-संस्कृतिमुळें येतां महा योग्यता,
देवी होय कृतार्थ ती ' विजेयिनी ' सत्ता तयां सोपुनी.
विद्यादान, सुरम्य शिल्परचना, बागा, जलाधार की,
क्षेत्रांचे नमुने, सदुद्यम, कला नानापरी पोषिल्या;
केला निर्मल देश, रोग हरिती शस्त्रक्रिया, वैद्यकी,
राज्यांतोनि सुधारणा बहुविधा अद्यावधि स्थापिल्या.
ऐशी राजवटी शतावधि महत्कार्यांतुनी रंगली,
आम्मे सर्व नृपाल धन्य ! वदती उल्हासुनी मंगलीं.

(२)

यूरोपांत, अमेरिकेंत, मिसर-प्रांतांत देशाटनें
केली पंडितमित्रता, अनुभव स्वीकारिले दीर्घसे;
धाले लाभुनि लोकही अनुभवी-ज्ञानामृतप्राशनें,
आणि प्रार्थिति दे चिरंतन विभो ! राजर्षि हे देवसे.
व्हायातें निज नाम शाश्वत असें देशेतिहासांतुनी,
वाटे आज सुवर्ण-संधिच दिली ही ईश्वरानें तयां;
विद्यापीठ म्हणोनि गुर्जरपती देतील संस्थापुनी,
देशांतील पिढ्यांस लावितिल हे आशीर्वचें द्यावया.
ठाणें देउनि दैन्य आणि वसलें दुर्भिक्ष या भारतीं,
तेणें होतिल याचना बहु, परी ज्या सर्वथा श्रेयदा
औदार्यें पुरवोनि त्या, इहपरीं साधोनि ध्या उन्नती,
पुण्यश्लोक नृपावळींत मिरवा राजन् ' सयाजी ' पदा.
नाना सद्गुण, राजकीय अपुली गावोनियां थोरवी,
रत्नानंद-महोत्सवास पुढतीं हा वांछिताहे कवी.—

प्रकाशन—जादाहस्तपत्रक.
बडोदें, ता. २३-१२-२५.

---

1 Empress Victoria. 2 Diamond jubilee.

# ईसवी सनाच्या नववर्षास—



उदय-कौतुक मावळतीकडे
उगवतीसहि तेंच तुझें घडे;
म्हणुनि दोन दिशांतिल मत्सरा
त्यजुनि, ये उदया नव वत्सरा!
ध्रुवपदावरि चिन्मय-सागरीं
प्रभु उभा निज-तारक जो हरी;
विवश काल-तरंग तयास ते
झळकतात अनंत सभोंवते.
असिस त्यांतिल एक तरंग तूं,
किति विमोहक रूप तुझें कथूं!
तुजमधें निज ओतुनि चित्कला
सजविलें हरिनेंच तुला मुला!
तुजसि ईश्वर तोच निजेच्छया
उतरवी पृथिवीवरि यावया;
तुज म्हणोत कुणी सन ईसवी,
असिस कालतरंगहि केशवी.
अमरदूत उषेसह तूं स्वयें
कनककांति सुरम्य धरोनि ये,
उगवला दिनराज, करीं त्वरा;
हंसत खेळत ये नव वत्सरा!
सकल लोक तवागम-हर्ष तो
सुचविती करुनी सुमवर्ष तो!
वसति जे समुदाय परस्थलीं,
नजर धाडिति ते लिखितावली,
प्रिय जनांस सुखें शुभ वांछिती;
किति टपाल असें न तया मिति!

उभविले ध्वज, तोरण, बावटे,
भडक रंग परोपरि गोमटे;
कसुमहार सुपल्लव-माळिका,
धडकतात मुदें गरनाळिका.
पडघमें, रणढोलक, यांवरी
घुमति उंच तुरें, मृदु बांसरी;
किति तऱ्हा वसनांतिल सांगणें ?
करिति वास सुवासित रंगणें.
सुजन, मित्र, सखीजन भेटती,
सुदिन हर्ष—सुखांतुनि लोटती.
लखलखाट विजेंतिल मेज ना ?
दिसतही नहि तें इतरे जनां !
अमित झोडुनि भोजन, पंगती—
रसिक त्या मदिरेंतुनि रंगती.
कितिक ते तुजला अभिनंदुनी
करिति घोंट गिळंकृत मागुनी !
मग निजावडिच्या प्रमदांसवें
नटति नर्तनलोलुपसे युवे.
करिति आंग्ल नवोत्सव यापरी;
तरि कृपालव आर्यजनांवरी
तव असो, म्हणुनी तुज मागतों;
प्रणय ह्याहि जनीं तव वागतो.
स्वबल, शौर्य, पराक्रम थोरले,
सुदृढ ऐक्य, असे गुण चांगले,
प्रखर तेज निजात्मबलासवें,
खचित मावळतीप्रति वाहवे !
वळव त्या गुण-तेज-समुच्चया,
फिरुनि भारतभूवरि यावया;
परत आणुनि तूंच तयां इथें

वसवुनी करवीं अमुचीं हितें.
बहु अम्हांवरि ते रुसली रमा,
करुनि दूर तिच्याहि मनोभ्रमा,
तिजसि येथ सदैव विराजवीं,
निजमुखें तव मंगल गाजवीं. १५

प्रकाशन–मनोरंजन,
जानेवारी १९२८.

---

## शारदे !



जातीच्या सुमनापरी धवल जें, सद्गंध जें कोवळें,
दर्भाच्याच तुऱ्यापरी शुचि तसें अत्यंत जें सोंवळें,
लोहाळ्यासम नीट जें, तरि तुला वाटेल तैसें वळे,
लोहातुल्य दुजांस, चुंबकगुणें तूंतेंच जें आकळे; १
जें हंसासम उंच उंच गगनीं वातांतुनी पोहलें,
यानांतोनि सुकल्पनामय महा–मेरूस आरोहलें,
माघारें गरुडापरी उतरुनी नीडांत जें राहिलें,
तें माझें मन शारदेस तुजला प्रेमेंच मी वाहिलें. २
प्रेमानंद जया मनीं समरसे त्या काव्यमोदासवें,
त्यायोगें नयनांमधूनि गळती मोत्यें न तीं आंसवें,
पाणीदार, अमोल, दुर्मिळ, अशीं तीं चौगुणीं गुंफिलीं,
ज्या स्नेहाळ मनें ममत्व धरुनी देवीस तूंतें दिलीं; ३
प्रेमी, सोज्ज्वल, तें उदात्त मन, जें वेडें तुझ्याकारणें,
त्याचीं सर्वहि ईप्सितें पुरवुनी त्वां फेडणें पारणें.

प्रकाशन–मनोरंजन, वासंती.
१९२८, १९२९.

# पांढरा मोर.



[ बडोदें येथील सार्वजनिक बागेंत नखशिखांत पांढऱ्या रंगाचा एक सुंदर मयूर आहे. वर्षाकालाच्या आरंभास मी सहजगत्या बागेंत फिरावयास गेलों. तेव्हां त्या पक्ष्याची तारस्वरांत होत असलेली केकावली ऐकून व त्याचें मनोरम नृत्य पाहून माझ्या मुखानें जे उद्गार निघाले ते हे—]

अहो नवल ! आकृती नहि नवी, मयूरापरी.
परी धवल हंससा रुचिर वर्ण कैसा तरी !
मनोरम विचित्रता त्यजुनि वाहनीं जी वसे,
विराग–शुचिता तया जणु सरस्वती देतसे. १
कलाप पसरोनि हा विमल पांढरा शुभ्रसा,
घनागम बघोनियां नटतसे कलापी कसा !
समुन्नत पुकारितो प्रणयभाव केकारवें,
मयूर कविचाच हा ध्वनि गमे मला गौरवें. २
असेच शिखि नाच हे मृदुल नाच तूं, नाच तूं.
परे*मधुनि आळवीं कवि मयूर ऐसाच तूं.
अगा, परिसुनी तुझी अमृततुल्य केकावली,
पहा प्रभुकृपाच ही नव घनावली धांवली ! ३
तिची झडुनि राहिली गुरु गभीर ही घोषणा,
अतां अमृत वर्षुनी करिल ती जगत्–पोषणा.
पयोधवल मोर तूं सुरस काव्य जें बोलसी,
प्रभाव, महिमा तया–मधिल तूं स्वयें नेणसी ! ४

प्रकाशन—मनोरंजन,
१९२८.

---

* परा, पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी, ह्या वाणीच्या चार दरज्जांपैकीं परा, ही अगदीं सखोल नाभिमूलांतील वाणी.

# प्रेमाचें संक्रमण.



जेव्हां रम्य सुवर्णचंपक असें तारुण्य कोमेजतें,
होतें अंधक तारकांसम तसें नेत्रांतलें तेज तें;
कष्टानें शिणतां शरीरबल हें ओहोटतें जेधवां,
चिंतेनें मन कांचतें बसुनियां आघातही केधवां. १

होतां पौरुष ह्यापरी मग उणें तो प्राप्तिचा साजरा
जेव्हां होउनि वाहतो झुळझुळां बारीक ऐसा झरा,
माया, आप्तजनांमधील ममता, थंडावते जेधवां,
प्रेमाचें अनुकूल संक्रमण तें व्हावें कुठें तेधवां ? २

स्वर्गाच्या पद उंबऱ्यांतुनि पुढें जों एक संस्थापलें,
तों जायास दुजें इथें दिसतसे उत्थापलें आपलें;
सारा लोक फिका,–मलूल–दिसतो हा खिन्नसा जेधवां,
प्रेमाचें अनुकूल संक्रमण तें व्हावें कुठें तेधवां ? ३

कोडें फार कठीण अप्रिय असें येवोनि माझ्यापुढें,
येथें आणि परत्र ह्या अडकित्यामाजीं जिवाजी पडे;
एकांतीं मग बैसलों त्यजुनियां चिंता वृथा शोचनें,
हातांनीं दडपूनि घट्ट धरिलीं मीं आपुलीं लोचनें. ४
केलीं सर्व निजेंद्रियें वळवुनी अंतर्मुखीं जेधवां,
प्रेमाचें अनुकूल संक्रमण तें झालें पुढें तेधवां.
मी जागा असतां अलौकिक असें जें स्वप्न हें पाहिलें,
माझ्या हृत्पटलावरी उमटुनी अक्षय्य तें राहिलें. ५
आधीं भासतसे महा तुमुल हा संग्राम कीं माजला ?
होवोनी नभ धुंद धूसर रणीं कल्लोळही गाजला;
पल्लेदार कृपाण ते चमकती ज्यांतोनि लक्षावधी,
वीरश्री भरतीस येउनि तिचा आंदोळला अंबुधी. ६
भासे नंतर घोर वादळ महावातांतुनी चाललें,
भोतीं काय विजा ! किती गडगडे ! ब्रह्मांडही हाललें !

ह्या आवेग हळू हळू मग पुढें मंदावला जेधवां,
प्रेमाचें अनुकूल संक्रमण हें लागे दिसों तेधवां. ७

साऱ्या दिव्य विजा थिरावुनि पडे जें एक त्यांचें कडें,
अंतर्बाह्य तयामधोनि तळपे चैतन्य तें फांकडें !
तेजाचाच झरा, किती द्युतिशिखा फैलावती, नाचती,
गायत्री जणु ठाकली मजपुढें ज्वालामुखी साच ती. ८

त्या तेजोवलयांतल्या मजसि ना केंद्राकडे पाहवे,
जिज्ञासेस न राहवे परि तदा, ती त्याकडे वाहवे;
वृत्ती एकवटोनि सर्व मग मी अभ्यन्तरीं प्रेरिल्या,
त्या ध्येयाहुनि भावना इतर तों होत्याच अव्हेरिल्या. ९

केंद्रांतून अतीव मंजुल पुढें वाद्यांचिये बोल ते
येऊं लागति यापरी विशद कीं कोणी जणों बोलतें;
वाणी ती नव्हती, तरी तिजमधें ओथंबलें आगळें
दिव्य प्रेम किती ! अहा निवळ तो वाटे जिव्हाळा गळे ! १०

भाषा त्या स्वर-संगमांतुनि वसे जी, म्यां असें मानिलें,
तीचें केवळ शब्दचित्र म्हणुनी आहे पुढें वानिलें:—
ये माझ्याजवळीं, तुझी करितसे खंती किती मी बरें !
मोहानें भुरळोनि कां भ्रमसि, हा व्यामोह आतां पुरे ! ११

मायावी रचना सुरम्य वरुनी जी भोंवतीं भासते,
ती तूंतें भुलवावया उभविली; जाणीं वृथाऽभास ते.
त्यांतें होउनियां पराङ्मुख मला,—मातें—सदा तूं पहा.
तूं माझी सय ठेव; ये बिलग ये, मातें मिळोनी रहा. १२

माझ्यापासुनि दूर दूर वससी, जें दुःख तेणें तुला,
त्याचाही कटु—कंटकानुभव हा आला तुला जंतुला;
आतां सावध हो, स्मरोनि मजला तूं लीन माझ्यांत हो,
गेलें दुःख लयास जाणुनि तुला स्वानंद,—आनंद हो ! १३

ह्या बोलासरशी समोर सहसा मी जी उडी मारिली,
ती ज्योतिर्वलयीं अचूक शिरुनी, वेगें पुढें सारिली;

तेजोराशिमधीं मदीय कणिका तेथें मिळे जेधवां,
प्रेमाचें किति गोड संक्रमण तें झालें म्हणूं तेधवां ! १४

प्रकाशन—रत्नाकर, पुणें, १९२८.

---

## प्रेमलोद्गार.

—:※:—

" विरहीव विभो ! प्रियामयम्
परिपश्यामि भवन्मयं जगत् । "

—उपमन्युः

(१)

येवोनी वायूच्या । झुळुकी मवाळ
देती बहुसाळ । भास तूझा. १
तुझें आगमन, । तुझें संनिधान,
सुखाचें निधान । स्पर्श तूझा. २
काय वानूं त्याचा । येथें बडिवार ?
केवळ बहार । मार्दवाची ! ३
हंसहृदयाचे । लोम ते नाजूक,
केसर साजूक । शिरसांचे. ४
वाटे लागुनी ते । फिरतात देहीं,
मौज तों तुझ्या ही । स्पर्शनाची ! ५
इंद्रियें तयाच्या । बावरति वेडें,
उकलेना कोडें । त्या मोहाचें. ६
चैतन्यहि माझें । भ्रमतें विकारें,
पुन्हां होय सारें । एके ठायीं. + ७
यापरी भासोनी । कां न दीससी तूं ?
यांत तुझा हेतू । काय आहे ? ८

---

+ *cf*:—" विकारश्चैतन्यं भ्रमयति च सम्मीलयति च " ।—भवभूतिः

तुझ्याविणें माझा । तळमळे जीव,
दाखवीं राजीव । आननाचें. ९

माझें तान्हेल्याचें । तेंच कीं जीवन,
तेंच शांतवन । तापल्याचें. १०

तुझ्या दर्शनाची । धरिताहे खंत,
नको पाहूं अंत । आतुराचा. ११

ये, तुझा सभोंता । वळसा पडों दे,
मज सांपडों दे । प्रेमानंद. १२

( २ )

केशरी उषा ही । येउनी खुलोनी,
दावी उकलोनी । अंतरंग. १३

हाचि तुझा प्रेमा । हृदयाचा भाव,
गोडसा स्वभाव । मूर्तिमंत. १४

जिवांचा जिव्हाळा, । कृपेचा उमाळा,
ज्यांत कळिकाळा । रीघ नोहे. १५

विश्वकुटुंबी जो । त्या तुझी हे माया,
आप्त गोंजराया । अवतरेली. १६

स्फूर्ति हीच देते । जातिच्या कवीते,
आणि बोलवीते । शब्दब्रह्म. १७

शब्द ते रसांचे । गोड गोड साचे,
लोकमानसाचे । मोहजाल. १८

त्यांत गुंतुनी जो । गुंतवी जगातें,
हेतुभूत त्यातें । प्रेम तूझें. १९

प्रेम रंगरूपें । जे उषेसमान,
जें मनोरंजन । भाविकांचें. २०

नाहीं ज्यास सीमा । नाहीं भेदभाव.
रंक आणि राव । सारखेच. २१

लालसा, अपेक्षा, । ज्यास ना कशाची,
मजला तयाची । जोड लाभो ! २२
तयाच्या वियोगें । देह हा सुकेला,
जाहला भुकेला । जीव माझा. २३
तरी मागतों दे । तुझें प्रेमदान,
ध्येय तें निदान । जीवितार्चे. २४

(३)

मीनराशिमाजीं । पावलाहे भानू,
छिरूप वानूं । काय आतां ! २५
फार शोभिवंत । ते छबी पसंत,
थाटला वसंत । ऋतुराय. २६
सारी वनराजी । आजच्या प्रसंगीं,
करी प्रेमरंगी । पेहराव. २७
नेवाळी, गुलाब, । कण्हेर फुलेले,
उद्गार उदेले । रम्य गंधी. २८
वाटे हे नसोनी । सुवास फुलांचे,
असे प्रेमलाचें । हास्य माझ्या. २९
कुसुमावतीच्या* । मुखें हांसणारा,
तुझ्यावीण प्यारा । कोण दूजा ? ३०
फुलांच्या विकासा,- । मधोनी हंसावें,
वसोनी नसावें । व्यक्त तेथें ! ३१
हा तों विनोदाचा । लपंडाव साचा,
तुझ्या प्रसादाचा । रम्य भास. ३२
ह्यानें का सुधेची । भागते तृषा ते ?
भृगांभ भृषा तें । लोभनीय. ३३
फुलें, चंद्रिका, वा । रूपवंत रामा,
यांचें हास्य रामा ! नाशवंत. ३४

---

* पुष्पांची अधिदेवी ( Flora. )

मला शाश्वताची । जोड तेच गोड,
नको हीरमोड । भंगुरांचा ! ३५
प्रसादें तुझ्या मी । गुळूगुळां हंसावें,
सर्वदा वसावें । योगानंदीं. ३६
हेचि एक वांछा । तुवां पुरवावी,
वृत्ति मुरवावी । तुझियांत. ३७
विश्व विरह्याचें । पूर्ण वल्लभेनें,
हो तुझ्या प्रभेनें । तेविं माझें, ३८

प्रकाशन—मनोरंजन.
१९२८.

---

## झुळुकी.

—:०:—

[ गेल्या वसंतांत मी येथील सार्वजनिक बागेंतून सहल करीत असतां, उपवनांतील झुळुकीबरोबर माझ्या मनांतूनही कांहीं झुळुकी गजगतीनें वाहत्या झाल्या. त्या सहृदयांसाठीं येथें सादर केल्या आहेत. ]

( गजगती वृत्त. )

( १ )

जरठसा शिशिर तो
ध्रुवपदीं विरतला;
सु-कुसुमाऽकर इथें
प्रिय सखा परतला.
प्रकृतिचा नटचि हा,
स्वझुळुकी झळकवी;
सजवुनी स्वकविता
जणु कवी प्रगटवी.
पिउनि मी उपवनीं

लहरिंचा बहार तो,
सहृदयांस्तव यथा-
-तथ इथें उतरतो.

(२)

मज गमे न झुळुकी
धरणिच्या विचरती,
परि हवामय नद्या
गगनिंच्या प्रसरती.

विरलता, विमलता,
तरलता, सरलता,
मिरविती सकल ह्या
किति तरी मृदुलता!
हरविती जणु हिमा,
शरवती मधुरिमा!
वितरिती परिमला
किति मनोहर मला!
प्रति नवी झुळुक दे
मज नवी तरतरी;
पिउनि ती फिरतसे
अमृत की तनुभरी.

नव वयांतिल जणो
भवसुखाविषयिंचे
मधुर निर्झरचि हे
विलसती विचरती.

नव शिशूंवरिल वा
जननिची सुममता
स्व-तनुजां कुरवळी
रमुनि ही रमविते.

अधन जे हृतगती
जन मनीं करपले,
मदतिचें वचन हें
अमृत त्यां शमवितें.
तरुलता, बहुविधें
उपवनांतिल गृहें,
पथ, जलाशय, नदी,
स्थल असें सकल हें,
मधुर ह्या झुळुकिंनीं
सुखद कीं बनविलें
क्षितिवरी सुरपती—
—भुवन हें म्हणविलें !

( ३ )

भरतभू—वरिल हे
मधुमयी झुळुकिनों !
गुण तुम्हांतिल भले
इतर ते जन म्हणो.
परि तयांतिल हिरा
मुकुटिंचा झळकता
प्रिय जिवाहुनि खरा
मज दिसे ‘ अवशता. ’
‘ अवशता ’ ! चव हिची
किति तरी गमतिची !
इजपुढें मधुर तें
पय जणो विरजतें.
समजती जित जिणें
विफलसें हिजविणें;
भट हिच्यास्तव रणा
सजति वा स्वमरणा.

अतुल ही अवशता
निज करीं गवसतां,
वसुनियां जन भवीं
सुरसुखें अनुभवी.

( ४ )

परि अशी जरिहि ते
जनहितें पिकविते,
तरि तिनें मन इथें
जड जगीं जखडतें.
तनु खुलें विलसतां
मन जिनें अटकतें,
नसुनि ती अवशता
विवशता मुनिमतें. ×
बल–पराक्रम–गुणें
जय जगावरि करी,
स्ववशतेविण उणें
नृपतिचें पद तरी.
इह जगीं अवशते–
–परिस ही स्ववशता
किति गुणें अधिक, तें
मज न ये कळवितां.
करुनियां निज मनो–
–जयचि ती मिळतसे;

× *cf*:—"अनातमन्यात्मधीर्बन्ध–
स्तन्नाशो मोक्ष उच्यते ।
बन्धमोक्षौ न विद्येते
नित्यमुक्तस्य चात्मनः" ॥ योगवासिष्ठ.

क्षितिपती-पद जणो
तिजपुढें तृण दिसे.*

प्रकाशन—रत्नाकर, १९२८.

---

# मानसांतील प्रतिबिंबें.



( दिंडी. )

देवभूमींतिल रम्य उपवनांत
सहल करितांना सहज ये मनांत,
चला, येथिल कमलिनीकडे जाऊं,
धवल सुंदर तो राजहंस पाहूं. १
लोणियाचा तो मऊ मऊ भेला,
जाति सुमनांचा थोर विमल झेला,
शारदेचा लडिवाळसा छबेला,
तिथें हरळींतुनि दिसतसे निजेला. २
पडवळाची नलिकाच लंबमान,
पाठिवरुनी वळवोनि अशी मान,
वाम बगलेमधिं चोंच खोंवियेली,
पदें दोन्ही पोटांत घातलेलीं. ३
युगुल नयनांचें जेविं तें सशाचें,
पुटें मिटल्यावरि मग दिसे कशाचें ?
पिंजलेला जणु पुंज कापसाचा !
असा निजलेला हंस असे साचा. ४
शरत् कालींच्या कमलिनी-प्रियाचे
किरण कोमल मंदोष्ण सोनियाचे,

---

* " जन्तोर्मनोजयादन्यत्—
त्रैलोक्य विजयस्तृणम् । " योगवासिष्ठ.

पश्चिमेनें तिरपेच अवतरोनी
वल्लभा ती* घेईत गोंजरोनी. ५
श्वेत कमळें कुमुदेंहि त्या सरांत,
झुलति शरदाच्या विभवनिर्भरांत,
एक मिटती मावळे जसा भानू,
फुलति दुसरीं ये बघुनि शीतभानू. ६
शिळोपा जों लागला वहायाला,
जाग आली तों हंस–राजयाला;
पंख झाडी फडफडुनि लांबवोनी,
हालवोनी घे मिटुनि पुन्हां दोन्ही. ७
प्रेमरंगाच्या × चंचुनें पिसांतें,
शोधिताहे तो त्यजुनि आळसातें,
पाय टाकी डौलांत माणिकांचे !
लक्ष्य गतिनें वेधोनि आणिकांचें. ८
सरोजांतिल तीं मृदुल बिसें सेवी,
पितो अमृतचि वरि करुनि कंठ केवीं !
तृप्त झाला, मग शतपदी कराया
लागला तो हरळींत संचराया. ९
सूर्य सायन्देविचा प्रणयकोप
हरुनि, घेउनियां मग तिचा निरोप,
भेट वरुणाची घ्यावयास गेला;
चंद्र अनुरागें अरुणसा उदेला. १०
बघुनि समयांतिल रम्यसा प्रसाद
गमे, घालूं हंसास गोड साद;
त्यास वळवोनी त्याचिया नियोगें
करुनि घेऊं आपुल्या मनाजोगें. ११

* ती म्ह० कमलिनी, अर्थात् कमलपूर्ण असें तळें.
× अर्थात् अळित्याप्रमाणें लाल रंगाच्या.

मनाजीनें मनसुबा असा केला;
हंस दिसला माझाच जणु भुकेला;
येत होता आयता समोरून,
त्यास वदलों मी कौतुकेंकरून:— १२

अगा गायत्री–ब्रह्मदेव–याना !
वेगशाली तूं शारदाविमाना !
थोर हितकारक संवगडी नलाचा,
भीमकीचा तूं प्रेमदूत साचा. १३

क्षीरनीरहि समतेस जें मिळालें,
विरलगुणवंता ! करिसि वेगळालें;
विमल मानस तूं यांतला विहारी,
प्राणिमात्राचा प्राण देहधारी. १४

उदारा, मी आदरें तुला बाहें,
अगा ये ये, मजजवळ उभा राहें;
काव्यमोत्यें हीं तुला मराळाला
आज देतों, घे करुनि फराळाला. १५

शांत होईं या उपायनें ताजा,
मला प्रेमें वश ऐस हंसराजा !
हेतु माझा कीं मानसास जावें,
मनें तेथें म्यां तुजसवें रमावें. १६

मनोवेगें तूं मनासवें तेथें
सहज जाउनियां परतशील येथें;
रम्य राका शरदांतली निशा ही
तेथ नेऊं ये शांत–विलासांहीं. १७

इतर हंसांतें कार्य जें न साधे,
निशीं करिशिल तें शारदा–प्रसादें;
दिव्य दृष्टी हो प्राप्त तुज मराळा !
स्मरुनि विधितें आक्रमीं अंतराळा. १८

वचन रुचलें, तो हंस जवळ आला;
मनोदेहें मी वळवलों तयाला.
शारदेचें तें वेगवंत यान
उडुनि माझ्यासह करितसे प्रयाण. १९

चंद्रमाही येवोनि उंच आतां
दुधानें हें जग सर्व धूत होता;
उंच यानांतुनि तेंच दिसे आजी
रांगुळीनें ही रचिलि काय सांजी.+ २०

तळीं शोभा वसुधैव गालिचाची,
वरी विजलीच्या रोशनी दिव्याची;
अशा थाटाचें विश्वमंदिराचें
क्रमी दालन मी फार भव्य साचें! २१

शांत वायूंतुनि गगन लंवितांना
पाहिलें मी हिम-धवल सानुमाना;
पूर्वपश्चिम जोडोनि उभा राहे,
भरतखंडाचा मानदंड आहे. २२

देवतांचा आत्माच म्हणवला जो,
त्यास वानूं म्हणणार कवी लाजो!
वनश्रीनें जेथील देवयोषा
फिरत्या गमती रतिरूप मंजुघोषा. २३

दिव्य दर्शन होतांच मज तयाचें
म्हणे हंसा! हें मान तव स्याचें
मंद करुनी चल निम्न अंतराळीं;
बघूं दे रे, ही मौज तों निराळी! २४

थोर सिंध्वादिक पांच नद्या जाल्या
भिन्न ठायीं ह्याच्याच शिरोजा त्या;

---

+ देवापुढें रांगोळी, रंग, अभ्रक, इत्यादिकांनीं जें चित्र काढितात ती सांजी.

उड्या मारित यमुनेच कुठें वेगें,
कुठें गंगा अवतरत असे वेगें. २५

ब्रह्मपुत्रचि तो जातिच्या स्वभावें
दक्षिणाग्रीचा धरुनि भाव धांवे,
जावयाचें ह्याच्याच उगम-देशीं,
मानसाच्या रमणीय त्या प्रदेशीं. २६

कडे, डोंगर, धिप्पाडसे पहाड,
औषधींनीं जे वळसिलेच गाढ,
लांब विस्तृतशा खोल दऱ्या, खोरीं,
रान–वैराणें पसरलीं पठारीं. २७

देवदारू-वन नम्र डहाळ्यांचें,
कुठें वैभव तों केशरी मळयांचें,
फुलुनि झुलती गुलू, फुलें मनोहारी,
पिकें मधुनी तीं जोमदार भारी. २८

झरे, ओढे, बिलवरी जलाधार,
चंद्रिकेनें खुलतात मजेदार;
पुरें, गांवें, यांतोनि रम्य खेडीं,
वसति कोठें समुदाय ते पहाडी. २९

निसर्गाच्या रमणीय चारुतेचा
निधी, ऐसा अन्यत्र दिसे कैंचा?
हंस-दृष्टीनें निरखितां तयाला
निवालों मी; तंव तोहि पुढें झाला. ३०

लंघुनीयां गिरिराज तो रुपेरी,
रोंख गतिचा खग पलीकडे प्रेरी;
त्वरित शिरला हिमशैल–परिसरांत,–
तिबेटाच्या रमणीय वनान्तांत. ३१

नभोमध्यावरि चंद्र जसा आला,
तसा अवतरला हंस मानसाला;

काय वानूं सौंदर्य त्या स्थलाचें !
कांय सात्विक हो रूप त्या जलाचें ! ३२

बघुनि त्यातें मी कौतुकें रिझालों,
खचित इतका, कीं मोहमूढ झालों !
आणि अंतरिंच्या अचल लोचनांहीं
प्रेमलोत्सुकसा तयाकडे पाही. ३३

जणों तेथिल तें नवल बघायातें
स्तंभनातें वरियलें नभोवातें,
म्हणुनि झाला तो भाव मानसाचा
बिलवराच्या जो विमल आरशाचा. ३४

भोंवतालींच्या भव्य विटपराजी,
गगन, चंद्रहि बिंबला जलामाजीं;
निळ्या हिरव्या जणु गालिच्यावरोनी
ठेवियेला हा चंद्रदीप कोणी. ३५

फुल्ल नलिनें जीं असति त्या सरांत,
तींहि भरिलीं खुलतात गालिचांत;
गमे आसन हें काय कुबेराचें
विपिनवासी तन्मित्र शंकराचें ? ३६

अमृतसागर जो उचमळे नभांत,
काय अवतरतो तोच मानसांत;
म्हणुनि बदलोनी यांतलें अमूप
उदक धरिताहे धवल सुधारूप ? ३७

कामवर्जित जें प्रेम जोडप्यांचें
रूप रौप्यासम विमल गृहसुखाचें
करी, त्याचा परिपाक उतरला कीं
मानसाच्या ह्या अमृतमय तटाकीं ? ३८

सकल लोकांतिल रुचिर यशें मोठीं
बसति जाउनि जीं उंच नभापोटीं,

काय वाहुनि तीं वायुसवें आलीं
रजत-सावर्ण्यें ह्या जळा मिळालीं ? ३९

सर्व भूतांतें समदृशा विलोकी,
दया वाहे ज्याचिया समालोकीं,
असें सौजन्यचि हास्यवदन का तें
बिंब अपुल ह्या मानसीं पहातें ? ४०

भरतखंडांतिल तपोवनांमाजीं
तपें तपले जे महामुनी, याजी,
पुण्य अयुताऽयुत त्यांचिया वत्सरांचें
वसे घेउनि कीं रूप ह्या सराचें ? ४१

काय 'अहमात्मा ब्रह्म' हें नितांत
ज्ञान ठसलें जें आद्य मुनिमनांत,
बिंब त्याचें जगतास उघड व्हाया
मानसांतुनि ही पडत असे छाया ? ४२

रम्य रम्यचि ह्या अमृतवैभवांत
असें माझें मन रंगतां नितांत,
वेळ गेला किति केधवां न जाणे;
स्मरे आहे बहु दूर परत जाणें. ४३

नाथ रजनीचा तिच्या सवें जातां
असे कलला तो गगनपथीं आतां,
बिंब कोनाकृति लांब रुंद त्याचें
पडे व्यापुनि जल सर्व मानसाचें. ४४

विमल, सोज्ज्वल, सौंदर्यसारहेतू,
बघुनि वदलों मी निरखि मना ! हें तूं.
असा,—अगदी जणु हाच—परात्मा तो
व्यास मुनिचें मन करुनियां रहातो. ४५

त्यास बघतां मग नुरे बघायाचें,
त्यास अभ्यसितां नुरे शिकायाचें,

त्यास जाणोनी नुरे जाणण्याचें,
त्यास पावुनि न हि फिरुनि परतण्याचें. ४६
असें बोलुनि मी बवें सभोंवार,
हंस चैनींतुनि करितसे विहार,
त्यास बाहुनि म्यां कवळिलें मनानें,
सुखविलें कीं मज त्याच सज्जनानें. ४७
लीन होउनि तो रम्य मानसांत,
भरुनि घेई उत्साह निज नसांत;
तरुनि गेला मजसहित पैलपार,
पुन्हां गांठियलें गगन तें अपार. ४८
धूमकेतूचा दिव्य फरारा तो,
क्रमी तैसा नभ हंस भरारा तो;
देवभूमींतिल उपवनांत आला,
वळुनि बघतां ये अरुण समुदयाला. ४९
पद्मरागाच्या तया प्रकाशांत
दिसे जागृत जग येथलें अशान्त;
मामर्सीच्या त्या अमृतसुखासंगें
यास तुळितां हें हृदय मात्र भंगें ! ५०
वनश्रीचा तो अतुल निधी कोठें,
धूलिधूसर हा सखल देश कोठें,
कुठें शांती, ते विमलता, प्रसाद,
कुठें रगडा, घनघोष हा विषाद ! ५१
अमृत-धामांतिल आत्मसुखनिवास
कुठुनि मातीच्या विषय-वैभवास !
असो, येतों; गा मुनिजनाऽवतंसा !
प्रेम ठेवीं. हें कवन तुला हंसा ! ५२

प्रकाशन—विविधवृत्ताचा खास अंक.
सन १९२८.

---

## नववर्षोत्सवाच्या दिवशीं

## आन्हान.



( शार्दूल० )

गातां ज्या प्रभुचा गुणौघ न सरे, वाणीच ही कुंठते,
होतां केवल यत्कृपा गमतसे येथेंच वैकुंठ तें,
कालातीत रमेश जो रमतसे स्वानंद–रत्नाकरीं,
देवो तो नववर्ष हर्षकर हें आम्हांस नानापरी ! १

( पद्यः—चाल, रमवाया जाऊं. )

या होऊं भाऊ । जिवाचे । या होऊं ॥ ध्रुव० ॥
फल संघाचें पूर्ण कळोनी,
रिपु मदमत्सर हे वगळोनी,
विमल मनानें सकळ मिळोनी,
प्रेमानें राहूं ॥ या होऊं० ॥ १ ॥
संतत विद्यामृत पानानें,
अन्योन्यांच्या साहाय्यानें,
नीतिबलानें, निज तेजानें,
उन्नतिला जाऊं ॥ या होऊं० ॥ २ ॥
स्वसमाजाचें हित साधाया,
भूमाता ही आराधाया,
जाउं न देतां क्षणही वायां,
तनु मन धन वाहूं ॥ या होऊं० ॥ ३ ॥

चैत्र शु० १ शके १८३१ सन १९०९.

प्रकाशन–रत्नाकर पुणें.
डिसेंबर १९२८.

---

# समरमहिमा.



[ पानिपताची रणदेवता समरसिंह जनकोजी शिंदे यांच्या पत्नीपुढें अवतरून शोकविव्हलतेनें तिला म्हणते, असा हृदयद्रावक प्रसंग येथें वर्णिला आहे. ]

आली, तटस्थ झाली, थरके अधरोष्ठ, आंसवें गळती;
रणदेवताहि झाली त्या वीरस्त्रीसमोर विरघळती. १
'बाई !' तिला म्हणे ती, पदरानें टिपुनि नयनवारीतें,
'सांगूं काय तुला मी, आले कामास कारभारी ते ! २
पंचाननापरी गे, परचक्रावरि तुटोनि तो पडला;
असहाय ! काय करितो ? लढला-लढला, थकोनियां पडला ! ३
पडला गे पडला तो वीर रणीं धूलिमाजि पडलाहे,
कज्जलमिश्रित अश्रू हीच तया तूं तिलांजली वाहे. ४
विद्युत्प्राय सभोंतीं चमकत असतां सुतीव्र तरवारी,
त्यांतुनि अचल उभा तो, पर्वतगर्व स्वनिश्चयें हारी. ५
जे संग्राम-धुरंधर रिपुसंहारार्थ करिति घोर रण,
त्या वीरांतें यावें, तैसें सन्मान्य यास ये मरण. ६
तद्देश केशरी तो झालाहे चिंवट मेणकापडसा;
चढुनि पुटें रुधिराचीं तुमजे होता तयास रंग कसा. ७
जेथें देह तयाचा गळला, तेथें तयास तुडवोनी,
राऊत बहुत पडले, शतावधी अरिशिरांस उडवोनी. ८
अपुल्या प्रिय देशास्तव वीर जसा पाहिजे रणीं लढला,
लढला तसाच तोही, पाडुनि शतशें रिपू स्वयें पडला. ९
गृध्रादिक आकाशीं घिरट्या जे घालिती, प्रभातीं ते
स्वप्रिय-जनदेहावरि करितिल उदईक मेजवानीतें. १०
हे वीरवल्लभे ! तूं संतत करिशील शोक बहु ज्याचा,
कवि गातील तयाचा महिमा तत्प्राणहारि समराचा.' ११

अप्रकाशित—

# शुभ मंगल सावधान !



झाली तुंदिल गोकुलें चरुनियां, जाया घरीं लोटलीं,
त्यांचीं पादरजें पवित्र उडुनी व्योमांगणीं दाटलीं; १
पक्ष्यांचीं तरुपल्लवांत घुमती संगीतकें गोड तीं,
सूर्यातें शुभ मंगलें अळवितो वेदोक्त वाचस्पती. २
संध्या कुंकुमचर्चिता विलसते ही राजसा नोवरी,
तीचे पाणि सुखोष्ण घेउनि करीं सन्मित्र तीतें वरी; ३
शेला पांघरवी तिला भरजरी नामी कुसुंबी असा,
बांधी मंगलसूत्र, शुक्र मणि ह्या त्यांतील शोभे कसा ! ४
चाले सात पदें प्रसन्न सविता सायान्हदेवीसवें,
भोगाया सुख सोहळे वधुगृहीं तें युग्म गेलें नवें. ५
सृष्टीचें प्रतिबिंब हें उमटलें नामी बडोद्यांतुनी,
केलीं राजगृहें सुरेंद्रभुवना ऐशीं अलंकारुनी; ६
वाद्यें मंजुल वाजती, बिजलिच्या दीपावली साजती,
वस्त्रालंकृति–दिव्य गंध–सुमनें खासे कसे राजती ! ७
राजश्री-युत राजपौत्र वरिती वीरात्मजा गोजरी,
तो लग्नोत्सव गुर्जरेश्वर महा-राजा सयाजी करी. ८
झाली राजवधूवरें सुविधिनें तीं दंपती त्या क्षणीं
ह्या जन्मांतिल हेतुची सम अशी दोघांत हो वांटणी; ९
पत्नी, सेवक, मंत्रिणी, प्रियसखी राजे प्रतापांस ती,
राजे आवडते पती, संवगडी, नेते तिचे शोभती. १०
सारे चिंतिति कौतुकें वधुवरां दीर्घायुरारोग्यता,
येवो त्यांतुनि वांछिती निज महा–राजांतली योग्यता. ११
तीं नांदोत सुखांत सर्व म्हणती वाड्यांतुनी सारखीं
श्रीसंगें शुभ मंगलें प्रभुकृपें रंगोत ह्या सारखीं. १२

प्रकाशन—रत्नाकर, पुणें.

९. १२. २८.

आतां सहविचारिणी सभा आज माझ्या मुखानें जी शुभेच्छा व्यक्त करूं इच्छिते ती हीः—

गादीला मुजरा, त्रिवार मुजरा खाशांस माझा असो !
यावत् भास्कर, चंद्र हे उगवती, राज्यास वृद्धी असो !
श्रीमद्राज-कुटुंब हर्षयुत हें दीर्घायु भोगीतसो !
बोलूं किंबहुना ? मनांत म्हणतों दिल्लीच येथें वसो !

---

## कीर्ति आणि प्रीति.



"Go ! where Glory waits thee."

*Thomas Moore.*

कीर्ति—

( शुद्धकामदा. )

कवि सख्या प्रिया ! कीर्ति ही सखी
निरखिते तुझी वाट सारखी;
त्यजुनि मोह तो भेट एकदा.
समज तूं मला शुद्धकामदा. १

सजुनि आज जो साज घातला,
खचित, तो किती साजतो मला !
पुसुनि पाहिलें आरशास मी;
कळवितो नसे एकही कमी. २

खुलतसे पहा भांग हा कसा;
गिरिजलौघ तो शारदीं जसा.
वळण जें दिलें स्निग्ध कुंतलां,
प्रहर त्यामधें एक गुंतला. ३

जरि गुलाब हा सौरभें उणा *
खुडुनि खोंविला ना गमे कुणां ?
वरुनि गुंफिले वेलमोगरे,
कनक-चंपकें लाविले तुरे. ४

सुमधनूच हें हेमसायकीं
करुनि ठेविलें सज्ज काय कीं ?
द्विगुण कुंकुमा-हूनि चांगला
तिलक केशरी केविं लागला ! ५

' कमलगंध ' हें तैल घालुनी,
हळदिची दिली झांक आननीं;
वदन ह्या अशा दिव्य मंगलें
सरसिजान्तरा–तुल्य रंगलें ! ६

नथ तशींच हीं कर्णिचीं फुलें
खुलति मौल्यवान् मौक्तिकांमुळें;
दिसति साजरीं ह्या मुखास तीं,
मुखहि त्यांमुळें साजतें किती ! ७

विमलसे हिरे चिंचपेटिचे,
किरण फेंकिती हे लपेटिचे;
बकुलपुष्पसा चंद्रहार हा
कुठकुठें खुळा खेळतो पहा ! ८

असति तारकामंडलें § करीं
मणिमयें मधें घातलीं खरीं;

---

* " सौवर्णानि सरोजानि
निर्मातुं सन्ति शिल्पिनः ।
तत्र सौरभनिर्माणे
चतुरश्चतुराननः ॥ "—सुभाषितम्.

§ ' तारामंडळ ' नांवाच्या बांगड्या.

मधुर झंकृती ऐकुनी, छवी–
बघुनि, पाणी हा कां न घे कवी ? ९

जडितमुद्रिका अंगुल्यांतुनी,
विलसती छटा नैक त्यांतुनी;
सुवचनांतुनी जातिरम्यसे
चमकवी कवी श्लेष ते जसे. १०

मज गमे पदीं ह्या न सांखळ्या,
धवल जातिच्या गुंफिल्या कळ्या;
टपकती किती गोड जोडवीं,
ध्वनि जगाचियें लक्ष्य ओढवी ! ११

तलम शालु हा शुभ्र चांदणी,
चमकते तुझी यांत चांदणी;
वरुनि फांसला दिल्‌बहार तों
विलसतें तसा दे बहार तो ! १२

अरुण कंचुकी रेशमी चिनी,
वरि कलाबतू–काम कांचनी;
हिमगिरीवरी जी उषःप्रभा
मिरवि ही तशी रंग-सन्निभा. १३

तव समुन्नती अंतरीं वसे,
इजमधूनि ती बिंबुनी दिसे;
जणु धुक्यांचिया आंत, पैल कीं
दिसति सानुमान् तुंग शैल की ! १४

वसन नील हें व्योम भासतें,
जरिबुटें न हीं तारकाशतें;
अयि बनारसे ! जान्हवीवरी
वससि कीं वरी स्वर्णदीवरी ? १५

नमुनि पांघरूं दे प्रसाद हा,
मज तुझ्यापरी वंद्य हा महा;

किमपि ठेविला गंध यासवें
इतर सौरभीं तोहि कालवे. १६
कविवरा ! किती वेळ लाविशी ?
सकळ सिद्धता जाहली कशी.
भवनिं हीं कला-शास्त्र-वैभवें,
भंवर्ति सृष्टिचें रूप हें नवें. १७
कविरुचीस जें आवडे, असें
सकल या स्थलीं योजिलें असे.
विविध पानकें, विश्रमासनें,
फिरवि वीज हे केविं विंझणे ! १८
तरु, लता, फुलें, रम्य डोलती,
पिक-शुकादि हे गोड बोलती;
घमघमाट की पाकगेह दे,
कवण येतसे ? वाजलीं पदें ! १९
कुणि न. वाजलीं हींच पावलें !
अगइ, कायहो मी चपापलें !
विविध पुस्तकें, कोश चांगले,
जुळुनि ओळिनें सर्व लागले. २०
कलमयंत्र हें, ताव केविं हो !
रसिकराय तो यावरी लिहो !-
श्रुतिमनोहरें पद्य-नूपुरें
सहजकाव्य तें ज्यांतुनी स्फुरे. २१
सुखभरांत जें दुःखसागरीं,*
परम मंगलीं वा अमंगलीं,
बहु जनीं, तसें निर्जनीं वनीं,
किमपि दे निजानंद सन्मनीं. २२

* 'र' आणि 'ल' ह्यांत भेद नाहीं. उदा० सुश्लोकलाघवम्=सुश्लोकराघवम्.

शिशु लहान जें काव्य चोखिती, †
समजतीं मुलें नित्य वाचिती,
पुरुष, बायका, सार्थ जाणती,
जरठ लोक जें काव्य वानिती. २३

सरसरम्य तें काव्य तूं लिहीं.
प्रसर,—कीर्तिची होय केलि ही !
जणु सुगंध की गंधवाह ते,
यश तसें जगीं मीहि वाहतें. २४

मम मुखांतुनी शब्द जो निघे,
अमर होय तो, शाश्वतीं रिघे,
सुकविचा असे काव्यहेतु मी,
प्रिय जनास त्या दे चिरायु मी. * २५

सद्रूप ज्या बघे कीर्ति मानवा
परम देह तो पावतो नवा;
जनमुखांतुनी जन्म पावुनी
विलसतो जगीं ह्या समावुनी. २६

प्रथमची तया आकृती दिसे,
किमपि शोभतें शील दिव्यसें;
सकल दोष ते पार्थिवांतले
हरुनि देह तो तत्त्वसा खुले. २७

सहज थोरवी त्यांत येतसे,
क्षणिक ह्या जगीं देव तो वसे;

---

† *cf*:—Children thumb it,
Boys read it,
Men understand it,
And old folks commend it.

* " काव्यं यशसे । " मम्मटाः

जनपरंपरा मान दे तया,
झटतसे तसे तेहि व्हावया. २८
नृपति, शूर, वा दानशूर ते,
बुध, गुणी, मुनी, शिष्ट, जाणते,
जन मदर्थ हा सर्वही खपे,
मम कृपेस जो—तो सदा जपे. २९
हरिसही किती कीर्ति-आवडी !
वरुनि घालितो कीर्तनीं उडी.
परि अशीं करी दिव्य कीर्तनें,
मजसि जीव तो प्राण मी म्हणे. ३०
कवि-सखाच तो कीर्ति शोभवी,
भुवनिं कीर्तिनें शोभतो कवी;
कुणिकडे वसो, तो असो कसा,
सुरसभेंतला भाट हो जसा ! ३१
बहु जनांचियें जीवनैक तो,
बहु मनांचियें दर्पणैक तो,
प्रकृत वस्तुचें शब्दचित्रही—
कवि—बलाढ्यसा राष्ट्रमित्रही. ३२
अजुनि कां न ये तो असा सखा ?
मजसि लागला ध्यास सारखा !
चतुरिके अगे ! पत्र घेउनि
त्वरित जा, तया देइं नेउनी. ३३

“ हिमगिरीवरी दिव्य मंदिरीं,
“ तुज अपेक्षिते कीर्ति-सुंदरी;
“ असिस तूं कुठें ? पंख लावुनी
“ मजसि भेट ये,—ये भराल्नी !” ३४

अप्रकाशित.

## प्रीति—

( द्रुतविलंबित. )

( १ )

विमल कीर्ति तुला बहु चाहते,
लिखित धाडुनि वाटहि पाहते,
म्हणुनि जाउनि भेट तिला सुखें
तुज वरील, करीलहि कौतुकें.
निरविर्ते तरि जो तुज राजसा !
जपुनि ठेव निरोप हिरा जसा.
" हृदय हें परकीय करूं नको;
सुखभरांत मला विसरूं नको."
हृदय जें उघडोनि निवेदिलें,
समगुणी मज तूं, तुज मी दिलें
दृढ अशा ममतेंतुनि बांधिलें,
करुनि एक निरंतर सांधिलें;
सुगम जेविं रसाल अगा तसें,
प्रणयकोकिल ज्यांतुनि गातसे,—
हृदय तें तुजला मम जीवना !
वद कवे ! विकवेल यशोधना ?

( २ )

विविध मांगलिकें मुख मंडिलें,
सवतिनें तुज त्या कुरवंडिलें,
करुनियां मजपासुनि वेगळा
सुमनहार समर्पियले गळां;
स्मितमुखी करुनी करसंगमा
तुजसवें जरि होय विहंगमा,

सुरवधूसम ती धवलाचलीं
तुजपुढें जरि सुंदर नाचली;
अभिनयें विनयें मन वेधिलें,
तुज तिनें रस भाव निवेदिले,
तरि तया समयीं अयि कोमला !
विनवितें विसरूंच नको मला.

( ३ )

न हि कला शिकलें, न हि पंडिता,
न हि सुरूप न मी गुणमंडिता;
निवळ हा अनुराग रुचे तरी
स्मरसिका रसिका ! मज अंतरीं ?
मसति गा अनुकूल मला धनें,
नुमजती मज मोहन ! साधनें;
प्रणयिनी जरि होय अकिंचना,
उचित ती करण्यास न वंचना.

मज वियोग घरांतुनि काढितो,
परि सुयोग पुन्हां तव ओढितो;
पद वदे कुणि जा, कुणि ये कशी !
मग मना ! गमनास करूं कशी ?
थबकलें;–वळुनी तुज पाहतें,
नयनिं बाष्प उभें तंव राहतें;
असुनि नेत्र निकोपहि आंधळे !
प्रणय आठवुनी मन गोंधळे.

मज नकोत सुपायस–भोजनें,
मज नकोत महावसनें, धनें,
मज नकोत सख्या ! मणिभूषणें,
प्रणय दे प्रणयास्तव मी म्हणें.

वळलि हीं वसनें जरि वांकळा,
'थिगळणें' तरि ही मज ये कळा;
स्वतनु झांकिन, खाइन भाकरी,
तरि वसेन तुझी तुझिया घरीं.

त्यजुनि तूं मम भाकर-भात हा
भुलसि पाहुनि साखरभात हा!
तरि सुतृप्तचि जो विदुरा घरीं,
हरि हंसेल, रुसेल तुझ्यावरी.

संवगडी मम बाळपणांतला,
सजण तूं मम ऐन पणांतला;
घरधनी मम तूंच जनांतला,
जिवलगा! कलिजा विजनांतला.

सुख असो, तुझियासह लागलें
असुख तेंहि सुखासम चांगलें!
सजवितो विषही अमृतापरी,
किति अलोलिक संगम तो तरी!

कविगुणांस विलोभुनि भेटलें,
निज मनोभव भावहि पेटले;
चमकुनी चपला घनलीन हो,
बघुनि चंद्र तुफान नदीन हो.

मिसळलीं श्वसनें श्वसनांसवें
निथळलीं नयनीं नयनासवें;
विलय बे मन एक दुज्या मनीं,
खचित जी प्रणयांतिल उन्मनी;-

कळुनि ती उभयांसहि आलिया,
स्वपरभाव नितान्त निमालिया,
अवलिया! बघुनी धनवैभवें
विसरशील मला?-नहि संभवे!

( ४ )

करिल गा दिनसंगम ती निशा,
अरुण होइल मावळती दिशा;
बहु छटा नटतां अनुरंजना,
झुळुक वारिल मंजुल विंझणा;
निबिड आम्र-तरूंतिल मोहरे,
डंवरतील सुवासिक मोहरें;
हृदयदीपक गोड रसायनें
पिक अशीं निज गातिल गायनें;
हितगुजें करिती वनदेवता,–
किलबिल-ध्वनि यापरि भासतां,
सुमलता करितां मृदु सिंजितें,
भ्रमर गातिल तन्मधु गुंजितें;
विलसतां रजनीमुख–तारका,
विहसतां कुसुमाकर सारखा,
मिरवतां नवपल्लव–चामरें,
' वनसुधा ' जणु गातिल ते झरे.

( ५ )

अयि निसर्ग–निषेवक गायका !
अवसरास अशा सुखदायका
सहज जाशिल तूं विहरावया
उपवना पवनामृत घ्यावया.
हिरवळी ? नहि सुंदर गालिचे !
पसरले असतां मखमालिचे,
थकुनि तूं बसलास तयांवरी,
स्मर मला रमलास तिथें तरी.

( ६ )

बहुविधें सुमनें किति वेंचिलीं !
नहि जलें,–प्रणयें अभिषेचिलीं,

किमपि गंध तदीय न सेवतां
फुलविली तव म्यां अधिदेवता.
जरि उपासियलें प्रभुला,-तुला,
स्थल मनांत न देउनि किंतुला,
न विसरे मज देव दयांबुधी,
मग न तूं स्मरसी प्रणयांबुधी ?
कुसुमसृष्टिवरी तव आवडी,
किमपि देवपदीं तव आवडी,
प्रबल होय जिच्या सुमनो-बलें,
स्मर तिला तुझिया सु-मनोबलें.

(७)

छलबलें मम संगम टाळितीः
कर दुजे तुजला कंवटाळिती,
रसिक मित्र तुला कुरवाळिती,
नयननीर सुखावह गाळिती;
मिळुनि यापरि सर्व सुहृज्जनें
तुज दिलीं जरि हर्षनिमज्जनें,
तरि तया समयीं मम निर्मला !
स्मरण ठेव,-नको विसरूं मला.

(८)

करुनि गौरव थोर सभाजनीं,
विजयघोष तुझा घुमला जनीं;
तुजवरी बहुमान, असंभवें
वरसलीं जरि कांचनवैभवें;
तरि तया समयीं अयि कोमला !
विनवितें विसरूंच नको मला.

(९)

हिम-ऋतूंतिल खारट वादळें
पिकुनियां तरुचीं गळतां दळें,

तुज निमूटपणें पुशितील कीं
स्मरसि काय कवे ! तव ती सखी ?
करपली विरहें झुरतां मनीं,
सुकुनि ती पिकली तरणेपणीं;
हळु हळू गळतां अमुच्यापरी,
तनु तिचें पडलें धरणीवरी !
गंहिवरोनि तदा सहसा जवें,
दंहिवरासम तीं तव आंसवें ३४
उभवलीं, द्रवलीं, तरि त्यांमुळें
तव सखी परमा गतिला मिळे.

**प्रकाशन**—' प्रीतीचे बोल '
ह्या शिरोलेखाखालीं
मनोरंजन. जुलै १९२९.

---

# गोदावरीचा उगम.

—:o:—

वेंचा—

( श्रीगोदागौरवांतील. )

[ हें काव्य 'अयि मधुरे ! मधुमोदविलासिनि ' इ० आचार्यकृत यमुनाष्टकाच्या चालीवर, किंवा निदान ' दो दिवसांची तनु इ० फटक्याच्या चालीवरही म्हणतां येईल. ]

( १ )

ब्रह्म किमपि जें अभंग, मंगल त्याचा तेजोनिधि नमुनी,
याज्ञवल्क्य, गुरु, पिताहि जो मम, नमुनि असा **शिवराम** मुनी,
सु–मणिकर्णिका प्रणमुनि माता गातों **गोदागौरव** हा;
त्या गंगेमधिं रंगुनि कविते ! गंगा होउनि तूंहि वहा. १
अभिमतगमने ! न कल्पना तूं कल्पलता, मी तुज म्हणतों,
कीं उदरंभर दूर विदेशीं बहु दिन शिणतों वणवणतों;

यास्तव मज ह्या उष्ण, धुळीच्या गुजराथेंतुनि चट् सरशी
उचलुनि देवी ! ब्रह्मगिरीवरि गोदेसन्निध ठेव कशी ! २

काय नवल तरि ! जंव हें वदतों, बघतों, डोळे उघडुनि मी,
अमृतानंदप्रवाहिनीच्या उभा असें तंव मी उगमीं !
ब्रह्मगिरी हा शिखरकरें मज बाहुलियापरि उंच धरी,
येथुनि जाते जणों दिगंतीं दृष्टि किती ही दूरवरी[1] ! ३

उगमापासुनि मुखावधीच्या गंगौघासह गंगथडी
आवरणांतुनि चित्रपटापरि केली येथ जणों उघडी;
दूर-निदर्शक यंत्रामधुनी स्वर्गंगा ती विशद जशी,
तशीच येथुनि गोचर होते स्वकल्पनेनें ही मजशी; ४

कोठवरी हा प्रसार ! सत्ता व्यापक ही किति दूरवरी !
थोर किती हें वैभव हीचें ! उदारता ही काय तरी !
मजला हीच्या वत्सलतेचें—भूतदयेचें—गूढ पडे,
निमिषाचाहि न हिला विसांवा, संतत परहितकार्य घडे. ५

हे गोदावरि ! विश्रुत ऐशा ब्रह्मागिरीच्या प्रिय तनये !
जगदाऽनंदन रघुनंदन ज्या तुजला वंदन करि विनयें,
कैलासाच्या वृद्ध पतीनें वरिलें, त्रिजटेवरि धरिलें,
त्या तुज घालुनि ‘ लोटांगण ’ मी होइल कागे आदरिलें ? ६

---

1 Cf:—"Even now, where Alpine solitudes ascend,
I sit me down a pensive hour to spend:
And, placed on high, above the storm's career,
Look downward where an hundred realms appear;
Lakes, forests, cities, plains extending wide,
The pomp of kings, the shepherd's humbler pride."

—The Traveller.

२ आपल्या रहाण्याच्या स्थलापासून इष्ट देवतेच्या स्थलापर्यंत उभ्या रस्त्यानें सारखे साष्टांग नमस्कार घालीत भक्तीनें त्या देवतेसन्मुख जाणें, यास ‘लोटांगण’ असें म्हणतात.

आदिकवि श्रीवाल्मीकींची शुचि रुचिरा ती सरस्वती
तव गौरव-रव करोनि धांवे भूगोलावरि कीर्तिमती,
सुरस कथा तव कथुनि पुराणें गाती गोदे बहु महती,
भवभूतीची प्रतिभा दावी तुझी विभूती मूर्तिमती. ७
ऐसे कोकिल गाती जेथें, तेथें ' कौ '-रव काय करूं ?
खुलवुं कशाला पलाश तेथें, फुलले जेथें देवतरू ?
रसाल सेविति जनांपुढें त्या करवंदें मी काय धरूं ?
क्षीरोदधिच्या कांठीं वाहुनि मीठ मिठागर काय करूं ? ८
परि केवल हा दोष न माझा, अंगुलि फिरते तुझ्याकडे !
जननि ! मला पय पाजुनि दिधले स्खलनाचेही तूंच धडे.
तया पयानें स्फूर्ति जहाली, तेच धडे मी बडबडतों,
मी वक्ता तूं श्रोता ! न मला भान कशाचें वरकड तों. ९
अंकावरिच्या अज्ञ शिशूचे प्रेमें स्वैरालाप जसे
परिसे माता, तसें न भारत, अठरा पर्वहि पर्वतसें !
अयि गोदे ! त्वत्प्रसाद व्हाया यत्न असे मम हा सगळा.
विशंक गातों, गोड नसेना, सद्गद आहे यास गळा ! १०
प्रगटुनि येथें मूर्तिमती तूं देशिल दर्शनलाभ जना
तोंवरि माते ! करीत राहिन एक लयानें तव भजना;
भजनांतहि मज बालवयींच्यां सहजचि होतिल आठवणी;
हृदय विदारुनि दावुं कुणाला सुखासुखाच्या सांठवणी ? ११

(२)

मजभवतीं जो अजगर ऐसा गाढ निजेला अचल दिसे,
झाला ' सह्य ' असें जन म्हणती; पूर्वी हाच असह्य असे;
कारण, ह्याच्या श्रृंगांवरुनी होतां श्रृंग-ध्वनि सहसा,
वीरश्रीनें पुलकित होई हा पंचानन काय जसा. १२

---

१ " उत्तरे रामचरिते भवभूतिर्विशिष्यते. "

२ पाठभेद—गत कालींच्या. ३ Cf " निराधारो हा ! रोदिमि कथय केषामिह पुरः " । जगन्नाथः ४ ही मराठे व मावळे ह्यांच्या भाल्यांवरील उत्प्रेक्षा.

वनघोषासम ' हरहर ' ऐसा हा जेव्हां रणघोष करी,
तेव्हां अंबर चरके वरती, धरा थरारुनि कंप धरी;
ज्या काळीं त्या गरनाळींतुनि बालरवीसम लाल असे
गोळे सुटती फुटती तेव्हां ज्वालामुख हा ' सह्य ' नसे. १३
येथें, तेथें, खालीं, वरती, खड्ग विजांसम चकचकले,
तेव्हां ह्यावरि कटाक्ष ठेवुनि थकले चौकसही चकले;
शौर्य-जयश्रीयुत ह्यावरिचा दैव-दिवाकर नहि टळला,
केतुमुखीं तो आज म्हणावा गळला किंवा मावळला ? ! १४
ज्यांवरि घडघड झडति नगारे, असे शताविधि गड पडले,
पडले नसतिल, असतिल कांहीं कालकरीं तरि सांपडले;
गोजिरवाणीं ठाणीं, वाडे, विशाल किल्ले गर्वभरें
टोंचिति गगना, सर्व विखुरलीं गंधर्वांचीं जणु नगरें. १५
गतवैभव हा हताश होउनि पसरुनि कर पद जणु निजला;
हे सह्या ! घे झोंपचि आतां येते कींव तुझी मजला.
एकी रुसली, दुही धुमसली, अवयव पोटासह लढले,
सुविवेकाचें तुझें बिघडलें, सह्या !—म्हणुनि असें घडलें ! १६
घटयंत्रासम सकलांनांही येते चढती वा पडती,
कां चढतीनें भृकुटि चढावी ? पडती व्हावी अवघड ती ?
कर्म जसें फल तसें, तयाचा भोक्ता ज्याचा तोच तरी.
कर्मांपासुनि फलभोग तसा पश्चात्तापहि मुक्त करी. १७

---

Cf:—" Have, then, thy wish !—he whistled shrill,
" And he was answered from the hill;
" Wild as the scream of the curlew,
" From crag to crag the signal flew.
" Instant, through copse and heath, arose
" Bonnets, spears, and bended bows;
" On right, on left, above, below,
" Sprung up at once the lurking foe; " &c. &c.

Sir W. Scott.

## ( ३ )

### गंगाद्वारीं भजन.

उलटुनि गेली मध्य-निशाही जीवन-कलह जगीं शमला,
जन निद्रावश गमतो सोऽहं–मंत्रें भारियलाच मला;
पान न हाले, शब्द निमाले, स्वानंदी जग मग्न दिसे,
तव भक्तीची 'भंग'*पिउनि मज गंगे! भरलें स्फूर्ति-पिसें. १८

भव-भट्टीमधिं तावुनि तावुनि विजनजलीं जें निववियलें,
मंत्रघनानें पिटुनि, ओढिलें विचार-जंत्रांतोनि बलें,
जें मन नामें कांचन त्याची सतार ही रव काय करी,—
"जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे! भवताप हरीं." १९

येथ शिवानें जटा फटाफट आपटुनी तुज वाहविली,
गोवधपापें अनुतापाकुल गौतमतनु अवगाहविली,
धन्य महात्मा! आपण तरला, तारियलें जग निरंतरीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे! भवताप हरीं. २०

गिरिशिखराहुनि जगदाधारा धारा ही तव अवतरते
छुम छुम छुमछुम जलकलरव हें नादब्रह्मच कीं नटतें?
राहिन हे तव जलधारारव अवधाराया या शिखरीं.
जय् संजीविनि जननि पयोदे श्रीगोदे! भवताप हरीं. २१

विमल विमल! हें कसें तुझें जल, गंगे! गंगाजलचि जसें.
सुंदर सुंदर! वसुंधरेतिल सुंदरतेचें सार दिसे.
किति सुखशीतल! सत्संगासम आश्रिततनुमन गार करी,
भवजालांतहि बद्ध जनांच्या आणुनि देतें मोक्ष करीं. २२

मधुर मधुर गे! अविकृत केवल दैवी प्रेमचि हें गळतें.
वैतरणीच्या उलटचि याची संतत गति जरि चंचळ ते.

---

* हिंदुस्तानी शब्द=भांग.

पावन पावन गंगे ! तुजसम तीर्थ—महात्म्य न भूमिवरी.
पुष्कर* राजा म्हणवुनि लोकीं पूज्य विधी इतुकाच तरी. २३
जगताच्या इतिहासांतिल हें सत्याचें संशोधन कीं ?
कीं सृष्टींतिल पुराण तें हें ? स्मृतिचें हेंच निवेदन कीं ?
कीं हा संगम षडागमांचा ? कीं निगमांचें सार खरें ?
अनुपम ऐशा आत्मरसाचा हा अवतारचि कां न बरें ? † २४
भूतांवरिचें तव वात्सल्यचि अमृतमिषें हें संभवलें,
द्रवलें चंद्रकलामृत यांतचि शिवचरितामृत कालवलें;

---

* हें अतिशय विस्तीर्ण आणि सुंदर कमलांनीं प्रफुल्लित असें तीर्थ, अजमीरापासून जवळ सुमारें, ४–५ मैलांवर आहे. यास सर्व तीर्थांचा राजा असें मानितात. 'पुष्कराद्यानि तीर्थानि । गंगाद्याः सरितस्तथा ॥ इ. स्नानसंकल्प प्रसिद्धच आहे. तथापि, ह्या तीर्थराजाचें माहात्म्य गंगेच्या महिम्याहून कमी, व त्याचें पूज्यत्व विधि म्ह० ब्रह्मदेवासारखे केवल एकदेशीय, अर्थात् गौण आहे, असें येथें ध्वनित केलें आहे. कारण असें सांगतात कीं, ब्रह्मदेवास पार्वतीचा अभिलाष उत्पन्न झाला असें जाणून शिवानें त्याच्या पांच मस्तकांपैकीं एक डोकें उडविलें, व ' तूं सर्वत्र अपूज्य होशील ! ' असा त्यास शाप दिला. नंतर विधिनें उग्र तपश्चर्या करून शंकरास प्रसन्न केलें. तेव्हां फक्त पुष्कर तीरावर त्यास पूजासन्मानाची मोकळीक मिळाली. त्या अन्वयें या सरोवराचे कांठीं ब्रह्मदेवाच्या चतुर्मुख सुंदर मूर्तीचें एक देवालय आहे व तेथें प्रत्यहीं शेंकडों यात्रेकरू व स्थानिक लोकांकडून त्याची पूजा होते. साऱ्या हिंदुस्तानांत स्वतंत्र ब्रह्मदेवाचें असें याशिवाय दुसरें मंदिर नाहीं ! हें प्रत्यक्ष प्रमाण पाहाण्यासारखें आहे, व ह्या पौराणिक कथाभागास अनुसरूनच ही पंक्ति काव्यांत लिहिली आहे.

† Cf:—" न यत्साक्षाद्वेदैरपि गलितभेदैरवसितम्
न यस्मिन् जीवानां प्रसरति मनोवागवसरः ।
निराकारं नित्यं निजमहिमनिर्वासिततमो
विशुद्धं यत्तत्त्वं सुरतटिनि ! तत्त्वं न विषयः ॥ "

—जगन्नाथः

त्रिगुणित ऐसें हें परमामृत पाजुनि तृष्णा दूर करी.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. २५

गिरिकंदरिं ह्या गंगाद्वारीं तव तीर्थांचा निधि जमला,
सन्निध ह्याच्या येतां भासे झाला चंदनलेप मला;
कर्पूरांजन ! नयन निवाले, सात्त्विक धारा अवतरती,
ह्या तव ममता-सुधाकरें जणु चंद्रमणी हे पाझरती. २६

थंडावुनि ह्या थंडाईनें हांव भवाची उपशमली,
शुष्क सुखांची मृगतृष्णा ही राल-ज्वालेसम शमली;
शांत मनाला प्रसन्नता ये गंगे ! या तव जलापरी,
स्वानंदाच्या ठुमकति त्यावरि मनोज्ञ मंजुलशा लहरी ! २७

स्फटिक-शिलेच्या मंचावरतीं कोमल किसलय-सुमशयनीं,
भूरंभेच्या परिरंभामधिं, धवल वसंतांतिल रजनी
अनुभविणाऱ्या अरे नरेंद्रा ! विगलित कां तूं हिरमुसला ?
ही सुखशांती न हि विषयान्तीं असतो विरसचि ठेवियला. २८

सकल मलांचें भंजन कीं हें ? विकल मनांचें रंजन कीं ?
विषयांधांचें अंजन कीं हें ? ज्ञानमधूच निरंजन कीं ?
कीं संजीवन वैराग्याचें, शांतरसामृत खरोखरीं !
ह्याचा एकहि कण प्याल्यावरि चर्चा मम यम काय करी ?* २९

हें मुक्तीचें केलिसरोवर, यांतुनि हो रममाण मना !
जगदात्म्याचें निर्मल बिंबचि तूं प्रतिबिंब सजें सुजना !
परम सुखाचा डोह शरीरा ! मार बुडी तूं स्नान करीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. ३०

---

* Cf:—" भगवद्गीता किञ्चिदधीता
गंगाजललवकणिका पीता ।
सकृदपि यस्य मुरारिसमर्चा
तस्य यमः किं कुरुते चर्चा ॥ भज गोविन्दं० ॥ "

—श्रीमदाचार्याः

ध्यानहि जरि तव पावन करितें, स्नान तरी वद काय करी ?
स्नान, पान, गुणगानहि केलें, देशिल फल मग काय तरी !
अखिलाचें फल अधिकचि म्हणती, पण तें माझ्या ठेव करीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. ३१
जन्मुनि तीरीं, पिउनि तुझें पय, न करिति तव गुणगौरव हा,
अधमपणास्तव चुकेल कांगे सांग मला तरि रौरव ? हा !
तव गुण गातां रमवुनि यमही झुलविन शब्दब्रह्म करीं,
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भव ताप हरीं. ३२
शब्दब्रह्मीं जो कवि कसला, त्याला रौरव मग कसला ?
नित्यानंदें पूर्ण विकसला, परं ब्रह्मपदिं तो वसला. *
परंब्रह्मपदिं तुझ्या झऱ्यामधिं समरसला तो दुधापरी,
' पुनरपि जननं पुनरपि मरणं ' यांची ओळख तो न धरी. ३३

## नासिक-पंचवटी.



[ वेंचा गोदागौरवांतीलः—ह्या वेंच्यांत कवि आनंदवल्लीहून गोदातीरांचें अवलोकन करीत आपल्या जन्मस्थलीं, म्हणजे नासिक पंचवटीमध्यें येऊन तेथील पूर्वापर स्थितींचें तुलनात्मक वर्णन करीत आहे. ]

[ चाल—' अयि मधुरे मधुमोदविलासिनि ' इ० आचार्यकृत यमुनाष्टकाची किंवा ' दो दिवसांची तनु ' इ० फटक्याची ]

तुज हृदयंगम रवें विहंगम-भाट सकाळीं आळविती,
तरु तीरींचे तुजवरि वल्ली पल्लवचामर चाळविती;
तुझ्या प्रवाहीं कुंकुम वाही बालरवी जणु अरुण करीं,
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. १
अवयव थिजले, शरीर भिजलें, उठले रोम तृणांकुरसे,
सद्गद कंठीं बुद्बुद करितें वचन घटोन्मुख नीर जसें;

---

* *cf*:—" शब्दब्रह्मणि निष्णातः परं ब्रह्माधिगच्छति " ।
—अमृतबिन्दूपनिषत्.

अधर थरारे, अश्रुमलिनमुख हो मतिसंकर मदन्तरीं,
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. २

काय बघूं जरि घनबाष्पांचा जमला नयनांवर थर तो ?
काय वदूं जरि शब्द निघेना ? काय लिहूं ? कर थरथरतो !
प्रेमानें मन मूढ जहालें, केविं विचार रचील तरी ?
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. ३

तव परिसर जो पुराणकालीं असे विजन वन दंडक तो,
नरकरणीनें अखंड संभृत कुसुमकरंडकसा दिसतो.
मानुनि घे हा मानवकृतिचा कंठीं हारच दोन सरी,
हें नासिक, ही पंचवटी, ह्या नटल्या होउनि नव नगरी. ४

जनवसतीचें स्थान म्हणुनि जें कविकुलगुरुंनीं रंगविलें,
निसर्गसुंदर आश्रम बांधुनि ज्यांत तपोधन मुनि वसले,
राजविलासहि विसरुनि जेथें उटजामाजीं राम रमे,[3]
तें स्थल हेंच; असें म्हणतां हो आज जनीं उपहास गमे ! ५

---

१ Cf:—" स्तंभः स्वेदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथवेपथुः ।
वैवर्ण्यमश्रुप्रलयो अष्टौ भावाश्च सात्त्विकाः ॥ "

२. जनस्थान किंवा नासिकः—

Cf:—" अमी जनस्थानमपोढविघ्नं । मत्वा समारब्धनवोटजानि ॥
अध्यास्यतो चीरभृतो यथा स्वं । चिरोज्झितान्याश्रममंडलानि ॥"

रघु० १३-२२

३ " अत्रानुगोदं मृगयानिवृत्तस्तरंगवातेन विनीतखेदः ॥
रहस्त्वदुत्संगनिषण्णमूर्धा । स्मरामि वानीरगृहेषु सुप्तः ॥ "

रघु० १३-३५.

"यत्र द्रुमा अपि मृगा अपि बन्धवो मे । यानि प्रियासहचरी चिरमध्यवात्सम् ॥
एतानि तानि बहुनिर्झरकन्दराणि । गोदावरीपरिसरस्य गिरेस्तटानि" ॥१॥

भवभूतिः

श्रीरामाच्या देखत देखत ज्याचें स्थित्यंतर घडलें,
युगान्तरांनीं त्याचें पहिलें रूप दिसाया तें कुठलें ?
माझ्या स्वल्प वयांतहि ह्याचे बदल जहाले किती तरी !
क्षेत्रपणा हें टाकुनि आतां मुंबानगरी थाट धरी. ६
बहिरंगानें होउं कसेंही मम जन्मस्थल म्हणुनि मला
हें प्रिय, हें अभिमानास्पद, हें अतिशय वंद्य गमे मतिला.
अभ्यन्तरिचे भाव सकलही बघतां ह्यास उचंबळती,
जणु तारंबळ उडे दुधाची सुदुष्णतेनें खळबळ ती. ७
अर्ध शतावरि सूर्य उदङ्मुख, उदयगिरीवरि रथ चढवी,
त्या रविवारीं प्रथमचि येथें प्रकाश त्याचा मज दिपवी;
उभय कुलांतिल सुनयनकमलें प्रसन्नतेप्रति तें धरिती,
त्यांतुनि कौतुक-वत्सलतेचे मधु मद्वदनीं अवतरती. ८
फुल झेल्यासम लालनपालन केलें स्वजनें बालपणीं,
शुकवाणीनें मीहि तयांना रंजविलें मधुरालपनीं;
मृगबाळापरि चपळ पळालें फसवें लघु वय तें परतें !
मग बटुतेचें बट झट आलें, शिक्षण-जीन असे वरतें. ९
चेंडूचें भय धरुनि पहांटीं उठुनि करोनी धोंडभटी,
त्या दाजींच्या शाळेमाजीं जात असें मी राजपथीं;

---

१ Cf:—" पुरा यत्र स्रोतः सलिलमधुना तत्र सरिताम्
विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम् ।
बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदम्
निवासः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ॥"–भवभूतिः

२ रथसप्तमीच्या दुसऱ्याच दिवशीं, म्ह० रविवार माघ शु० ८ शके १७९२ ता. २९ जानेवारी सन १८७१ हा माझा जन्मदिवस.

३ गोऱ्हे आणि क्षेमकल्याणी.

४ सडकेवरील ( यावेळीं नासिकांत सडक एकच होती ! ) पंतोजी दाजी डोंगरे यांच्या गांवठी शाळेंत. ह्या शाळेंतील शिस्त फार कडक असे. दाजींच्या चेंडूपुढें ( Black-ball ) मुलें थरथर कांपत असत. ह्या शाळेंत प्रवीण होऊन

दुर्दैवानें अंक, फडाके, हिशोब, केव्हां शिस्त चुके,
मग शिक्षांचा जासूदचि तो चेंडू मजवरि अचुक झुके! १०
हौशी वडिलें मुंजमहोत्सव, महाप्रयोजन साजविलें,
सुभद्रकाली-मंदिर तेव्हां श्रुतिघोषानें गाजविलें.
विश्रुतयाज्ञिक बाबा! वैदिक गुरुजी! तुमची ती म्हणणी,
यज्ञमहोत्सव न पुरोडाशहि लाभे पुनरपि ह्या जननीं! ११
सर्व पुरातन विद्या, तिचिया शाखा, पल्लव विविध तसे;
यांतिल गुरुजन ह्यांनीं पूर्वीं जें हें नासिक पूर्ण असे,
न तसें संप्रति, न दिसायाचें फिरुनि कधींही त्यासम तें,
पाश्चिम विद्या रीतिरीवाजें आज दुजें तें नव गमतें! १२
ही नवविद्या मिळवूं म्हणुनी शिक्षण पुढतीं चालवितां,
ह्या तव तीरीं निवसुनि गोदे! झालों बहु वय घालविता;
त्या अवधीमधिं तुझिया ठायीं सर्व जिव्हाळा मी धरुनी,
भिन्न ऋतूंतिल तव वैभव तें प्रसंग पाहे आदरुनी. १३
मधुमासामधिं मधुर हवा ती, स्पर्श मधुर तव मधुर चवी,
सायंप्रातः सेवियली ती साखर वानिल केविं कवी?
किति कितिदां तरि तरंग तुझिये अवलोकियले म्यां नवलें!
अभिनव तनुला जलकुंभ्यासम तवाऽवगाहन मानवलें. १४
शुभ्र शेवयापरि उपवीतें, हंसधवल निज धोतर तें,
भांडति भांडीं जणु सोन्याशीं जिल्हई चढवुनि त्यांवरते,

---

निघालेले बहुतेक सर्व विद्यार्थी थोर अधिकारी झाल्याबद्दल दाजींस फार अभिमान असे.

१. निष्णात याज्ञिक वेदमूर्ति सदाशिवभट गायधनी; व उपाध्याय सदाशिव भट गर्गे घनपाठी.

२. नासिकानजीक "झिली मातीचा डोंगर" म्हणून एक टेकडी आहे. या टेकडीची माती पिंवळी व लोण्यासारखी मृदु असून ती भांड्यांस लावून भांडीं पाण्यांत बुडवून ठेविलीं असतां, नित्य परिपाठानें त्यांजवर सोन्यासारखी जिल्हई चढते! उत्कृष्ट घाटदार भांड्यांविषयीं नासिक प्रसिद्धच आहे.

शेंडी म्हणजे केवळ झळके मलयकुमारी—केशसखी !
तुझ्या कृपेनें मलिनपणाचा नुरला तेव्हां लेश नखीं. १५
अस्तोन्मुख रवि कुंकुम, केशर, चंदन वाहुनियां तुजला,
वसंतपूजा करितां तुझी तासांवरुनि दिसे मजला;
करिती झुळझुळ विंझणवारे या समयीं तुज त्या झुळुकी,
संध्या करितां रमवि तुझें हें दर्शन देवि ! सुमंजुळ की ! १६
ह्या दिवसांतचि उभय तटाकीं राम-रहीम-महोत्सव ते[4]
फुलुनि रहाती, सुमंदिरांतुनि दर्ग्यांतुनिही गजबजतें;
चक्र, पाळणे, मिष्ट मिठाई, सुरस गुऱ्हाळें द्राक्षफळें,
चित्रें, नाच, तमाशे, गायन यांतिल सुख मी अनुभवलें. १७
काळा गोरा राम महाजन-संमर्दांतुनि मज दिसला,
बाह्योपाधी—रहितावरि त्या जीव अतां हा भरंवसला;
चुकवुनि तोबे दूरावरुनी मी रथयात्रा विलोकिली,
श्रीरामाचें चरणामृतही रुचिकर अशें सेवियलीं. १८
म्हणती चैत्रागौरी जाते माहेरातें ज्या दिवशीं,
कोंकणवासी सुवासिनी[7] त्या पूजिति येउनियां तुजसी,
मग हारीनें तिष्ठुनि तीरीं घेउनि हातीं निज मुसळें,
स्मरुनि भवानी, गाउनि गाणीं, वल्हविति पाणी, जें उसळें; १९

---

१. गंगेवर स्नानापूर्वी खोबरें व कपुरकाचरी उगाळून उन्हानें त्यास तेल सुटल्यावर तें खोबरें शेंडीस लावीत होतो. त्याचा परिणाम कवितेंत वर्णिला आहेच.

२. ह्यांत सूर्यास्तसमयीं गंगेच्या पाण्यावर त्याच्या क्रमशः पडणाऱ्या मनोहर छटांचें वर्णन आहे.

३. गंगेच्या कांठचें विशिष्ट स्थल. ४. रामनवमीचा उत्सव आणि मुसलमानांचा उरूस.

५ रामनवमीनंतरच्या एकादशीस. ६ अक्षय्य तृतीया; म्ह० वैशाख शु० ३

७ कोंकणांतील घाटी यांच्या स्त्रिया. ८ उदाहरणार्थ एक कडवें येथें देतों:—

" ताडावरी ताड वेंधुं जी लागली, वेंधुं जी लागली ॥
माहेराची वाट पाहुं जी लागली, पाहुं जी लागली " ॥ १ ॥

रे मुसळांनों ! मावळभागीं एक असा दिन फटफटला,
कीं पाहुनियां तुमचें पाणी गनीमकावा लटपटला;
आज भवानीमार्गे परि तो दिन शौर्याचा मावळला !
तर्पण करितां तुम्हीच त्याचें बघुनि जिव्हाळा कळवळला ! २०
गंगे ! येतां ग्रीष्म दिनान्तीं पवनहि तव जलकेलि करी,
जे रवितेजो–ग्रहणें करपति, ते कर चंद्र तुझ्यांत धरी;
मासे तळपति, तरंग झळकति, तुषार चमकति जेविं हिरे !
या समयाला रूप तुझें हें दिसतें रम्य किती गहिरें ! २१
द्विजपंक्ती निज मार्जनविधि, वा अघमर्षण, जप लांबविती,
गुलहौसी जन ' बसा बसा हो ! ' म्हणुनि गड्यांना थांबविती;
गमती युवती जलार्थिनी गृह–कथा निरूपिति परस्परीं,
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. २२
दशाहरामधिं आरासेनें " भटजींचा मठ " झगझगुनी
गणेशशास्त्री मोडक[1] यांचा कीर्तनरंग खुले मधुनी !
तव मूर्तिपुढें रस–रंगाच्या हेलावति जणु तव लहरी,
झुलत झुलत मी मज्जन केलें स्वानंदाच्या त्या बहरीं. २३
लंघुनि तट जें प्रावृट्‌ कालीं सैरावैरा धांवतसे,
तवौदार्य तें असीम होउनि सलील वाहे सलिल नसे;
तल्लीलेमधिं तल्लीन न हो कल्लोलिनि ! कवि कवण तरी ?
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. २४
तदुदक गोदा, बुद्‌बुद गोदा, तरंग गोदा, संभ्रमें ते,
दशहि दिशांते घो घो घोषें घुमते गोदा कीं गमतें;
प्रगटुनि नानाऽकारें जणु तें ॐकारें खं ब्रह्म भरी,
जय संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरी. २५

---

१ नासिकचे अतिशय व्युत्पन्न आणि विख्यात कीर्तनकार. ह्यांचा लौकिक महाराष्ट्रांतून सार्वत्रिक होता.

Cf:—आवर्तबुद्‌बुद तरंगमयान्विकारानम्भो यथा सलिलमेव तु तत्समग्रम् ॥"
भवभूतिः

तरणकलेंतिल आचार्यचि ते बाळाचार्यादिक निघती,
घालुनि घोडे पोहत येती, बहुत कुतूहल जन बघती;
कंठीं माळा, मृदंग, झांजा, तरति विनोदें हर-गजरीं,
जय संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. २६
तुंग तरंग न, तूंच करांनीं बाळाचार्य सुबालक तें
कुरवाळिसि किति किति गे मोदें, गोदे ! तव लडिवाळच तें;
शत जन्मीं शत मातृकरांसहि वत्सलतेची ह्या न सरी.
जय संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. २७
पोहायाची हांव धरोनी बुडतां बुडतां मी तरलों,
उलव्या वळणें ओढुनि नेतां मध्यें जाउनि घाबरलों;
ऐकुनि धांवत ये तंव तीरीं जलार्द्रनयना इंदुमुखी,
अझुनि दिसे तुजसम मम जननी वात्सल्याचें दैवत की ! २८
अनुपम सुंदर मुरलीधर तो नटविति नटवर ह्याच दिनीं,
दिपविति दीपक मधुकर-दाटी राहे झुलुनि जया वदनीं;
दर्शन होतां गमे निमज्जन झालें गोदाजलजठरीं.
वाटे जीवहि ओंवाळुनि हा टाकावा तुजवरुनि हरीं ! २९
हे भगवन् ! किति अंत पहासी ? मुरलीवादन केंवि रुचे ?
दास्य, विपत्ती, दैन्य, दरिद्रहि बघवे काय तुला अमुचें ?
चक्र धरोनी, दुर्जन हरुनी, उद्धरिलें जें कुशलपणीं,
परिसुनि धांवा करुण निधाना ! तें प्रिय भारत तार क्षणीं. ३०

---

१ नासिकचे अति निष्णात पोहणारे. ( १ ) बाळचार्य मांडवगणे, ( २ ) बाळा-भुजारी, व ( ३ ) गफूर घव्याळजी. ह्यांनीं एकदां महापूरांत नारोशंकर राजेबहादर यांच्या शिवमंदिरावर अडकलेले ६० गोसावी व बैरागी ह्यांस नासिकांत सुरक्षित उतरवून जीवदान दिलें होतें. !

२. वाळलेल्या कडव्या भोपळ्यांचीं काथ्याच्या दोरीनें विणून केलेलीं तरणासनें.

३. ही मूर्ति इतकी सुंदर आहे कीं, तिचें दर्शन व छायाचित्रें ( फोटोज् ) घेण्यासाठीं विलायत, अमेरिका, वगैरे सारख्या अति दूर देशचे रसिक प्रवासी येत असतात !

होउनि सन्मुख सुदैव अमुचें हंसे न जोंवरि गुळगुळसें,
साह्य मिळोनी पडति न आम्हां तुझ्या कृपेचे जों वळसे,
तोंवरि सगळे अभ्युदयाचे, सुखशांतीचे यत्न महा
विफळ ! म्हणोनी पाव दयाळो ! ऐकुनि घोष तुझा जपे हा. ३१
वरि घन वरसति धो धो, इकडे महापुराच्या घनगजरीं
"कृष्ण कृष्ण" जन, "झन् चक् झन् चक्" टाळ, मृदंगहि दंग करी;
अभंग-गंगा जणु शतधा ही वाहुनि मिसळे स्वदन्तरीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं. ३२
परिसर जलमय, वनकुसुमांनीं झांकुनि जाती कुंप, वथा,
उभय तटींचीं हिरवीं, चित्रित, शेतें डोलति ज्या समया,
नव तृण धान्यें, सुमनें, सुफलें, सुचविति चंगळ हीं अगदीं !
गंगथडीचें रंगुनि राहे मंगलरूपचि भाद्रपदीं. ३३
मग विधिचाही कर धरणारे चित्रकलानिधि नासिकचे
मंगलमूर्तीसह बहुविधसें नटविति नाटक संसृतिचें;
सुंदर चित्रें ! पहावया तीं जनसंघासह मी झुकलों,
रचनाकौशल, सुयोजनाही निरखुनि किति किति कौतुकलों ! ३४
शारद काळीं काली, व्यंकट-रमण-महोत्सव जे घडती,
महाब्रशांती होत असे, परि उरली मौज न ती पुढतीं.
आतां विस्तृत सडका, बंगले, जनकार्यांचीं बहु भवनें,
नव काळींची सुधारणा ही डुले प्रकाशांतुनि पवनें ! ३५
तीं कसलेलीं भीम शरीरें, खाद तयांची वृकोदरी,
तुमुल द्वंद्वें, काटक सोशिक संवयी त्या सुचिरायु-भरी,
श्रुति-शास्त्रांच्या कठिनाध्ययनीं शिणले देह न जे झिजले,
होउनि हा ! ते वश कालातें विस्मरणांतुनि की निजले ! ३६
आणि तयांच्या जागीं दिसती फोल शरीरें, शुष्क मुखें,
उपनेत्राम्वित बहुधा 'नासिक' ! तरुण म्हणूं कीं हें नवखें ?

१. जन्माष्टमीच्या उत्सवांत प्रत्यहीं २४ तास होत असलेला नामसप्ताह !
Cf. "यज्ञानां जपयज्ञोऽस्मि."—गीता.

वक्ते, लेखक, शिष्ट, भिषग्वर, शिल्पी, शास्त्री भौतिक, ते
विविध कलापटु असतिल यांतुनि, किंवा होतिल हे शिकते; ३७
यद्यपि करुनी मनें समुन्नत,—सूक्ष्म तयांच्या तनु चरकीं
परिपोषाविण कातवितां हो उभयांचा लय लवकर की !
लोखंडाच्या तप्त युगाशीं मृदु मेणाचे हे पुतळे
लढतां लढतां वितळुनि होती अनुदिन केविं पहा दुबळे ! ३८
स्वराज्य, सत्ता, सुभिक्ष, यांनीं अन्तर्बाह्य सुमंगल तो
नयनीं शारद दिन न दिसे तों देखावा मज हा सलतो !
त्या सुदिनाचें बिंब मला हीं शरत्प्रभातीं गांगजलें
दाविति ज्यातें बघतां निथळति गालांवरुनि अपांगजलें ! ३९
कांचनरस हा कीं अर्घोष्मा दिनराजाचा वाहतसे ?
केशर, चंदन, लावुनि किंवा देवी गोदा नाहतसे ?
विकसित कमलें, प्रसन्न सुमनें, तरुनि तरंगावरि झुलती,
झग झग करितो समंत सगळा, सोनें आज सवंग किती !† ४०
सायंकालीं स्फटिकविमल तव गंगे ! जल न हि वानवतें
या समयाला सुधाकराचें वैभव त्यांतुनि कालवतें;
नयन मनोरम तरंगतांडव रसरूपी शिव करुनि हंसे,
स्वर्गंगेचें प्रतिबिंबचि जणु गंगा होउनि हें विलसे. ४१
तव तटनिकटीं, मंदिरशिखरीं, घांटाघांटावरुनि तसे
देवदिवाळी-मधिं जणु मणिगण झळकति दीप तसे शतशें;
बिंबति बिंबें, बाह्य दिवाळी होय दिवाळी त्वदन्तरीं,
कीं हे पदकां—पुतळ्यांचे तूं घालिसि हारच दो पदरीं ? ४२
उभय तटींच्या शिवालयांतुनि सुंदर दीपोत्सव करिती,
विधिहरिहर वा नटनारीश्वर मुखयुगलेंहि विराजविती.
स्वादु मसालेदार दुधाचें प्रसादचिन्हहि लोभवितें,
मग तो ' भाविक ' भक्तजनांचा ओघ पुसावा काय तिथें ! ४३

---

Cf:—" स तु भवतु दरिद्रो यस्य तृष्णा विशाला ।
मनसि च परितुष्टे कोऽर्थवान् को दरिद्रः " ॥—भर्तृहरिः

पूर्ण चंद्र न हि सहस्रधारा-पात्र रुप्याचें लटकविलें,
न चंद्रिका हें सरस्वतीनें पयोऽभिषिंचन चालविलें;
गंगेचा कीं ओघ दुधाचा यापरि मन संदेह धरी,
शिवालयीं तें प्रासादिक पय न मिळे सुविपुल याजपरी. ४४
व्यक्ति निराळी भासायास्तव बदलुनि टोप्या, करुनि गुन्हा,
ह्या रात्रीं मी खाउनि ठोसे प्यालों तें पय पिउनि पुन्हां,
तें कौमार्यहि हूडपणाची मौज पुन्हां ती येइल का?
देवि पयोदा पुनरपि सुमधुर तें पय मजला देइल का? ४५
चंपाषष्टी नामक सुदिनीं श्रीमल्लारी शूरवर
ह्याची जत्रा पटांगणावरि भरते मोठी दूरवर.
भंडारातें लाउनि आम्हीं स्वकुलस्वामी तो नमिला,
चित्रें 'खाऊ' करुनि खरेदी तो दिन हर्षें घालविला. ४६
हिमऋतुमाजीं प्रभातकालीं बाष्प तवौघा-वर तरतें,
सकरुण वरुणें शाल धवल ते भासे घातलि तुजवरते;
जणु म्हणुनिच जें सुखोष्ण लागे गे! मज घे घे त्या उदरीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे! भवताप हरीं. ४७
शिशिरामाजीं गांगहि शिशिरचि, करी हिमाची बरोबरी,
ताप दुजे हिम हरितें परि तें भवतापातें काय करी?
तया गदावरि गदा बसे ह्या-ह्या अगदाची* निरंतरीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे! भवतापहरीं. ४८
ह्या दिवसांतचि हुताशनीचा तो सण पूर्वी गाजतसे;
तांबटआळी-' प्रभृति ' ठिकाणीं रंगत रात्रीं मग जलसे!
कलगीवरती तान तुऱ्याची, लागे चुरस! महोत्सव ते,
त्यांतिल 'वैणिक' गायन, छकडी,-गम्मत आजहि आठवते. ४९
गेली गम्मत, दिन गमतीचे गेले,-शाश्वत मावळले!
बरोबरीचे सहृदय माझे स्नेही आज न आढळले!
चार पिढ्यांचें गेह पुरातन, ज्यांतुनि गोकुळ नित्य रमे,
तें परक्यासम भासुनि आतां त्यांतचि मजला न हि करमे. ५०

* Cf:—" नरानम्ब त्रातुं त्वमिह परमं भेषजमसि । " जगन्नाथः

दूरवरी× त्या माळवदेशीं× कालीसिंद न सिंधु× अहो !
तिच्या प्रवाहीं रत्न करांतुनि गेलें शोक अनावर हो.
सीतेसाठीं रामहि रडला, बाहुनि गोदावरि तुजला,
सीता त्यातें फिरुनि मिळाली; परि ती प्राप्त न हो मजला ! ५१
थोर कुळाचें, सौंदर्याचें, सद्गुणतेचें स्मरण मला,
उपभोगांचें, प्रेमाचें,—त्या वेळाचें हो स्मरण मला;
गे ! हतभागी, भग्नहृदय मी, प्रेमांधहि मीं याउपरी
हारविलेल्या विद्येसम* तुज आठवुनी फळ काय तरी ? ५२

## हिरावाडी.



"Land of my sires, what mortal hand,
Can e'er untie the filial band,
That knits me to thy rugged strand ?
Still, as I view each well-known scene,
Think what is now, and what hath been,
Seems as, to me, of all bereft,
Sole friends thy woods and streams were left;
And thus I love them better still,
Even in extremity of ill."

—*Sir Walter Scott.*

× माळव्यांत कालीसिंद नदीच्या तीरीं सारंगपूर येथें श्रावणीचा स्नानविधि झाल्यावर धोतर धूत असतां, हातांतील रत्नमुद्रिका उडाली ती डोळ्यांदेखत नदीच्या प्रवाहांत पडून हरवली ! आणि येथेंच जहागीरदार कै. वा. रघुनाथराव नारायण ऊर्फ दादासाहेब दीक्षित ह्यांची रूपवती नात, व माझी प्रथम पत्नी सौ. उमाबाई, ही मृत्युमुखीं पडली ! ह्या दोन्ही गोष्टींस उद्देशून ह्या ओळी लिहिल्या आहेत. * Cf. " विद्यां प्रमादगलितामिव चिन्तयामि ।"—चौरः

[ चालः—'अयि मधुरे मधुमोद विलासिनी. इ० आचार्यकृत यमुनाष्टकाची. किंवा 'दो दिवसांची तनु.' ह्या चालीवरही म्हणतां येईल. ]

हे नासिकच्या प्रिय स्थलांनों ! माझ्या आप्त सुहृज्जनहो !
निघवेना मज येथुनि परि हें अधिकाधिक मन खिन्न न हो,
ह्मणुनि जियेनें धात्रीभावें अन्नप्राशन मज दिधलें,
जातों दर्शन तिचें* कराया, प्रेम असूं द्या हो पहिलें.
बहु दिवसांनीं पाहुनि मजला हे निज माथे डोलविती,
बोलाविति मज कोकिल–शब्दें, आमंत्रण बहुमोल किती !
पसरुनि शाखाभुज मजला हे कवळाया किति उत्सुकले !
आलों आलों आम्रतरूंनों ! पुसतों तुमचीं मी कुशलें.
अरुणित पिंवळे मोहर तुमचे गुंगति भुंगे ज्यांभंवतीं,
रम्य छटांकित लोल फलांचे बहर मुदें मज नाचविती;
विगलित 'शाका' मिळतां गमला अमृतफलांचा लाभ मला,
किति उल्हासें उतरुनि आंबे अविट सुरस तो सेवियला.
हे मधुरे, हे सत्वमये, तूं अससि बरी ना रामफळी !
सु–रसालांशीं मिळुनि मिसळुनी राहसि ना तूं त्यांजवळीं ?
क्षेत्रपतीवरि छत्र असे तव, औदुंबर ! तें न हि ढळलें.
अंजीरांचें वैभव तुझिया विपुळ फळांतुनि आढळलें.
आचाराचा अनुपम नमुना प्रति दिवशीं तूं दाखविला,
सुमधुर शरबत–रस निज कविला निदाघकाळीं चाखविला;
हे निंबोणी ! विहिरीमध्यें डोकावुनि गे तूं कसला
सखोल करिसी विचार ? का तुज आंबट +आंबा तो हंसला ?

---

— * १० बिघे बागाईत व सुमारें ७० बिघे जिराईत ही वडिलोपार्जित अत्यंत सुपीक जमीन पंचवटींत बॉंबे आग्रारोडवरील काळ्यामारुतीच्या उजव्या बाजूस उत्तर दिशेला सुमारें एक मैलाच्या अंतरावर आहे.

× श्लेष. आचार म्ह. सदाचार आणि आचार म्ह. लोणचें ( हिंदी भाषेंत. )

+ निंबोणीजवळच आंबट्या म्हणून एक आंबा आहे. तो पिकला तरी आंबटच राहत असल्यानें त्याचा उपयोग लोणच्याकडे होतो. लोणचें मात्र फारच फक्कड

तुजला बघतां मनोव्यथेचीं ' कंटकशल्यें बोंथटलीं, ' *
सन्निध येतां तनुवरि माझ्या 'मखमालीची लव वठली ' !
खिन्न न होईं, तव गुण वानिति आयुर्वेद-विशारद ते,
एकचि कंटकदोष तुझ्यांतिल सद्गुण करितिल गारद× ते.
गे विहिरी ! हे† थारोळांनों ! चालति मोटा उभय ÷थडी ?
तीनहि=तुकडे भिजती कांहो ? पाणी देतो कवण गडी ?
घायाळांच्या घराकडे तों बघतां हें मुख हिरमुसलें,
असति इथें जे, अनोळखी ते, म्हणुनि तुम्हांला मी पुसलें.
पूर्व परिस्थिति, परिचय माझा, आठवुनी का बुचकळलां ?
खिन्न निरुत्तर होउनि बसलां ? आशय तुमचा मज कळला.
चढतीपडती, सुखदुःखें, हीं आळोपाळी येति जगीं,
खेद न मानुनि भेटा, बोला, जिवलग माझीं मज अवघीं.
पान न गवसे फुलें–फुलें हीं, डंवरुनि गेलां कंचनहो !
ह्या कुसुमांनीं न कळत सुंदर त्या कमलांचें वंचन हो.
वृष्टि फुलांची भूवरि, ह्यांची सजविति भाजी निज जन कीं,
अतिरेकानें मलयगिरिवर बनतो चंदन इंधन की !
हा एकुलता एकचि हदगा बालवयीं दे थोर फुलें,
वरि उपरतिची पांडुरता, तरि आंत मजेचा रंग खुले;
नागफणींतुनि विष नसतां मृदु गंध, मरंदहि गोड किती !
आन्तर्गुण हे जाणुनि झुलती भृंग तयांते गौरविती.
न शेवगा हा केवळ देशी, सत्वगुणास्तव ' हपूसचा '
म्हणवित होता, परि म्हणणारा + वामनराव नसे तुमचा !

---

बनतें. म्हणून तो लिंबोणीशीं स्पर्धा करीत आहे हा भाव. * केशवसुत–' झपूर्झा '.
× cf:–"एकोहि दोषो गुणसन्निपाते । निमज्जतीन्दोः किरणेष्विवांकः ॥ कालिदास.
† जेथें मोटा रिचवल्या जातात त्या उतरत्या जागेस थारोळ हें नांव एतद्देशीं चालतें. ÷ विहिरीच्या मुबलक पाण्यास श्रेयस्कर=१० बिघे जमीन.

+ कै. वा. ज्येष्ठबंधु.

शेंगानों ! गुण असोनि, गुणिजन गुणज्ञ नसतां, जी कुदशा
भोगिति, आली आज तुम्हांला दुर्दैवानें ती विवशा.
गे बदरी ! मी ह्याच ठिकाणीं मधुर फळें तव वेंचियलीं,
सेववलीं तीं सेवुनि माझ्या खेळगड्यांनांही दिधलीं.
रक्षक काकू उपवासास्तव बनवुनि ठेवी × बोरकुटें,
उपास पडती, कूट दिसेना, काकू आहे तीहि कुठें !
पुष्पकरंडक—जीर्णोद्यानचि आज मला हें * स्थल गमतें,
एके कालीं + चैत्ररथाच्या करी मुलासम संभ्रम तें;
बहुपरिचे गुल्ल, गुलछब्बू, ते मुद्गर, झेंडू, जातिलता,
शेवंती, त्या द्विविधा तुलसी, सुरम्यतेची संकुलता.
जें लघु नंदन राखुनि ' ह्याळू ' घरीं फुलांची रास करी,
हा हा ! वामन शिवरामांनों ! जमलें जंगल त्याजवरी !
ह्या वायूंतुनि वागति तुमचे प्राण यथोचित आदरुनी
त्यांते, येतों येथिल ' तमसा '—तीरावरि मन शांतवुनी.
जनतेपासुनि अलिप्त येथें ' †वाघाडीचा ' निर्झर हा
भिंगासम कीं सुजनमनासम दिसतो निर्मल केविं पहा.
उदकासरशा करवीरांच्या लवुनि डहाळ्या ज्या तरती,
लाल धवल त्या सुमगुच्छांते संथ जलावरि अंथरती.
बघुनि गमे कीं वंनलक्ष्मीनें हें फुल-मंडळ मांडियलें,
निज सख्याची भेट म्हणोनी जलदेवीला तें दिधलें;
निर्झरिणी ! मी बालपणीं तव तीरीं रमलों, विसांवलों,
डुंबुनि न्हालों, तव जल प्यालों, त्या लोभानें आकळिलों,
ह्या एकांतीं शांत जहालें मन, तुज वंदुनि मी परते,
गंगौघावरि लोभ तुझा जो, तोच असूं दे मजवरतें.

---

× बोरांचें पीठ. * मळ्यांतील फूलबाग. + कुबेराच्या बगीच्यांचें नांव. cf. अस्योद्यानं चैत्ररथं पुत्रस्तु नलकूबरः । अमर. † शेतांच्या बाजूनें जाणारा ओढा. हा गोदावरीस मिळतो.

वडिलोपार्जित वसुंधरे ! हे जिराइतांनों ! वंदितसे,
तुमच्या अन्नें पोषियला जन तुम्हांस हा अभिनंदितसे;
द्राक्षी, शाळी, ऊंसहि भाज्या, खुरासनी, भुयमूग बहू,
द्विदल, बाजरी बोरासम ती, पिकुनि झुले तो काय गहूं !
गळति गुऱ्हाळें, गूळ बने जणु केशरमिश्रित ती बरफी !
अये रसाळे ! किति तुज वानूं ? हृदयचि माझें मी अर्पी.
या समयीं कवि लॅंभे यांचा ' शेतकरी ' मज आठवतो,
तो समदुःखी करुनि मला मम हृदयांतिल रस आटवतो !
निज विरहाची कारणमाला,—नको उजळणी ती म्हणणें !
विधिनें माझ्या भाळीं लिहिलें नव्हतें हें सुख अनुभवणें.*
जे करिती वहिवाट, तयां दे हें सुख वैभव, मज नलगे !
हे भृंगाक्षी ! हे मीनाक्षी ! परि ममतेनें यास बघे.
विमल सुगंधी वायुमिषें दे मातृमुखी ! मज चुंबन दे !
विहंगमांच्या गोड रवांनीं कविसंगें तूं गोड वदे.
विमल अहेतुक अनुरागानें अंतर सारें विरघळलें,
या समयीं तव मोल हिऱ्यांहुनि अमोल जें, मज तें कळलें.
मन रमलें, मीं जाऊं अथवा येथचि राहूं ? सांग बरें !
चालुनि पुढतीं, बघतों मागें, नयनांतुनि हे झरति झरे.
प्रेम असूं दे, लोभहि ठेवीं, देवी पुनरपि भेट घडो !
यावत् जीवित निज ममतेची घडी कदापि न ही बिघडो.

श्रीगोदा-गौरव—अप्रसिद्ध.

---

* Cf:—"But me, not destined such delights to share,"
My prime of life in wandering spent and care.
THE TRAVELLER.

# पंचवटी व तपोवन.



वाल्मीकीनीं जो सृष्टीचा अनुपम नमुना रंगविला
तो पंचवटीप्रदेश हा कीं? रमविल गोदे! काय मला?
येथें आणिक रामगिरीच्या रम्य समंतीं मी वसलों,*
बहुविध मौजा नैसर्गिक सुख भोगुनि रमलों मी हंसलों. १
परि तेव्हांचें सहजमनोरम तें स्थल सारें आज नसे,
प्रियजन अथवा त्या समयींचा येथें एक न ही गवसे.
सेतू, शाला, प्रासादासम भवनें, मजल्यावरि मजले
धनवान्–यात्रिक–जनसंघांनीं हें स्थल आतां गजबजलें. २
ही शहराची, व्यवहाराची, संसाराची गजबज ना?
पुरे पुरे. ही टाळुनि जातों तपोवनांतच मी भजना.
ह्या मार्गानें पंचवटीचें ऋषिकालीं तें रूप कसें
शोभत होतें, चित्र तयाचें दिसेल कांहीं अंधुकसें. ३
पंचवटींतिल अद्भुतरूपा, विराट देही हे हनुमान्!
नमुनि तुला मी प्रार्थितसे कीं दावि मला तो श्रीभगवान्.
वरुनि सफेता सारविलेली कलिकालांतिल ही दुनिया
बदलुनि होइल त्या रामाचें राज्य कधीं रे परतुनियां?
तें व्हाया बहु विलंब असला, किंवा नोहे फिरुनि कदा,
तरि तें जेथें असेल तेथें ने मज तूंच हरी विपदा.

× × × ×

हेंच तपोवन; ज्यांत हजारों वर्षें मुनिजन ते वसले,
तीव्र तपानें तनु झिजतां "तत् त्वमसि" असें यन्मनिं ठसलें;
पूर्णब्रह्म सनातन येथचि त्यांच्या करितां अवतरलें,
राज्यपदातें, त्यजुनि सुखातें, ह्याच वनीं तें संचरलें. १
जलही राम, स्थलही रामचि, तृणतरुकाष्ठहि राम इथें,
निधि निक्षेपहि, अणुरेणूही वातावरणहि रामचि तें;

---

* 'आशेवाडी' येथें माझे चुलते कै. वा. गोपाळरामकृष्ण, हे प. व. खात्यांत स्टोअरकीपर असतां, मेच्या सुटींत त्यांच्या येथें राहिलों होतों.

त्रेतायुग मजभंवति विराजे, जें वसल निष्काम इथें,
रंगुनि रामीं राम जहालें, आज दिसे अभिरामच तें ! २
अभ्यन्तरिंचा प्रेम-उमाळा ह्या समयीं न हि साहवतो,
राम-जिव्हाळा बघुनि इथें तो प्रतिरन्ध्रांतुनि वाहवतो !
कस्तूरीच्या दिव्य सुगंधें भडकुनि मृगतनु जेविं गळे,
तेविं गळोनी शरीर माझें रामरसीं हें मन मिसळे. ३
आकाशाहुनि अफाट भरला चैतन्याचा सागर हा;
किति जीवात्मे झळझळती हे तरंग यांतिल मीन पहा !
पार्थिव देहावांचुनि सारे, हे वळखावे कवणपरी ?
वसिष्ठ, विश्वा-मित्र कुणाला दशरथ, जनक, म्हणूं शबरी ? × ४
जगदभिरामा, आत्मारामा, रामा ! माझें नमन तुला; *
ह्या विभवाची, स्वानंदाची, करूं सुखाची केविं तुला ?
पलख न लवतां भव्य दिव्यातें निरखी निश्चल बाळ जसें,
कुंठित वेडें हें मन माझें बघतें रामा ! तुजसि तसें. ५
सत्ता, वैभव, मानमरातब, मायाममता आणि सुखें,
ह्यांतें लोलुप मनें करोनी महाप्रयासें तीं विमुखें,
कष्टवुनी बहु तनुला करणें प्राप्त असे जें इहभुवनीं,
बिंब तयाचें स्वप्रिय कविला त्वांचि दिलें हें दाखवुनी. ६
हे परमात्मन् ! काया, वाचा, आणि मनास न जें गवसे,
तें तव वैभव हें विलसों दे दृष्टिसमोर अखंड असें,
अंतीं हा तव अंश तयांतचि लय पावों दे सत्वर तो,
संसाराच्या विपचारांमधिं फिरुनि कधींहि न गा परतो ! ७

**प्रकाशनः**—मनोरंजन.
मार्च १९२७.

---

× Cf:—"मय्यनंतचिदंभोधावाश्चर्यं जीववीचयः ।
समुल्लसन्ति खेलन्ति प्रविशन्ति स्वभावतः ॥"—**योगवासिष्ठ.**

* Cf:—"प्रत्यक् चैतन्यरूपाय मह्यमेव नमोनमः ।"—**किता.**

# टाकळी आणि ओढें.



[ वेंचा—गोदागौरवांतील. चाल—सदर. ]

दिव्योदधिच्या आखातासम, ओघ कुठें हा जात असे ?
स्वमनोनयनें अनुसरतां तो गोदेवरि हनुमान दिसे.
घालुनि कंथा, कुबडी माळा, धरुनि उभेच समर्थ कवी.
रामजपाचा घोष तयांचा समंत भारुनि हा घुमवी. १

संसाराचें निगड निबंधन तोडुनि आले टाकळिला.
हनुमानाच्या अनुग्रहानें रामहि यांनीं आकळिला.
हे दासाचे ‘ समर्थ ’ झाले गोदातीरीं ह्या कुहरीं.
महायशाचा गंगौघासम उगम किती हा सान तरी ! २

शिवरायाचे राजगुरू हे, नृपनीती मनिं बिंबविली,
शिरें गडांचीं गगनाकडुनी हुंगवुनी तीं चुंबविलीं;
ह्यांच्या बोधांतिल ओजाचें तेज भवानीवरि चढलें,
दिपुनि हजारों गनीम पडले दिवान्ध होउनि वा दडले. ३

गाई, ब्राह्मण, अशेष हिंदू वांचवुनी प्रतिपाळविले,
अधिराज्याचें सुछत्र चामर छत्रपतींवरि ढाळविलें;
जोहाराचें करुनि विसर्जन, योजिति नमनीं रामपदें *
सर्व मनांला जागृत करिती सतेज यांचीं श्लोक-पदें. ४

अझुनि मराठे-शाहीमध्यें “ भगवाझेंडा ” जो विलसे,
निशाण यांच्या निस्पृहतेचें, वैराग्याचें तोच असे;
अटकेवरि जो फडकुनि आला, बखरींनीं बहु गौरविला,
श्रेय तयाचें ह्या गोदेला किमपि असे ह्या टाकळिला. ५

स्वयशोदेहें जेथें तेथें स्वसंप्रदायांतुनि वसतां,
चाफळ येथें गुरो ! तसे ह्या टाकळगांवीं मज दिसतां;

* अर्थात् “ राम राम. ”

राज्यविभव जरि मंद जहालें, पंथ तरी तो निज टिकला,
अझुनि तयानें जे जन जाती त्यांचा राम असे विकला. ६
पथप्रवर्तक गुरो ! तुम्हांला वंदुनि मी पथ हा क्रमितों,
इकडुनि–इकडुनि येइल राजा–राम विमानीं परतुनि तो ! *

प्रकाशन—मनोरंजन.

---

श्रीमंतांच्या सरदाराचें ओढें गांव सुरम्य कसें !
जीवावांचुनि भूदेवीचें दिसतें सुंदर चित्र जसें.
घाट, पटांगण, देवायतनें, शेतें, राया, जनवसती,
सुविमल मंजुल वाहसि गोदे ! स्थान निरामय शांत किती ! १
पानिपताच्या घोर रणामधिं निज नृपनीती जरि चुकली,
प्रलय, पराभव, ऐकुनि मूर्च्छा येउनि राज-श्री झुकली,
तरि जयदेवी उभय चमूंचा बघुनि पराक्रम मनिं विरमे,
माळ कुणाला घालूं कोडें तिचें तिला हें गूढ गमे. २
जरि गिलच्यांनीं ओढुनि नेली, तरि अटकेवरि ती अटके,
वळुनि बघे तंव ये राघोबा नजर ' भरारी ' वरि न टिके.
त्यानें झंझानिल–वेगानें क्रूर दुराणी घेरियला,
पानिपताचा मोबदला !–पण काय दिला हो काय दिला ! ३
अशा रणांतुनि समशेरीचे हात जयांनीं गाजविले,
अरिच्या, अपुल्या, रंगुनि रुधिरें स्वकीय देह विराजविले,
त्या वीरांतिल सु-रंगरावा ! शोभसि लालच तूं गहिरा,
वीर असो, निज धर्मांतिल तूं धीरोदार सतेज हिरा. ४

---

* राम सीतेसहवर्तमान पुष्पक विमानांत बसून लंकेहून अयोध्येस जाण्यासाठीं दक्षिणेहून उत्तरेकडे येत आहे, व कवि गोदातीरानें तिच्या मुखाकडे दक्षिणेस जात आहे, तेव्हां अर्थात् वाटेंत त्याचें दर्शन होईल हा भोळा भाव येथें ध्वनित केला आहे !

श्रीरामाचें मंदिर जें तूं सर्वस्वावरि बांधियलें,
धार्मिकतेचें, उदारतेचें, त्यागाचें तें चिन्ह भलें.
स्मारक तें तव होय चिरंतन पंचवटीसम इहभुवनीं,
कळस तयाचा बघतां म्हणतों धन्य तुला मी माधवनीं. ५

प्रकाशन—मनोरंजन.

१९२७–२८.

---

## निर्वाणषट्क.



[ **प्रास्ताविक टीपः**—निर्वाणषट्क हें स्तोत्र मूळ श्रीमच्छंकराचार्यांचें आहे. पण तें सांप्रतच्या सर्व जगास समजावें, म्हणून विवेकानंदांनीं त्याचें इंग्रजींत फार नामी भाषांतर करून सांगितलें आहे. मात्र तें सांगतांना त्यांनीं विशद करून सांगितलें, येवढाच काय तो त्यांत फरक आहे. आतां आम्हांला स्वामींच्या काव्यांचें रूपान्तर करावयाचें. तेव्हां आम्हीं आचार्यांच्या मूळाचा अनुवाद न करितां, स्वामींच्या रचनेस अनुसरलों आहों. तरी पण, क्वचित् आचार्यांचे शब्दही उद्धृत केले आहेत, ते तज्ज्ञांच्या लक्ष्यांत येतीलच. ]

मी नाहीं मन, बुद्धि, चित्त, अथवा नोहे अहंकार मी,
किंवा देह न मी, विकार अथवा देहाचिये त्या न मी;
कीं ऐके, रुचि, वास घे, बघतसे, तीं इंद्रियें मी नसे,
मी आकाश नसे न भूमि अथवा ना अग्नि वायू तसे;
मी सन्मात्र असे सदोदित, तसा चिन्मात्र, आनंद मी,
आहे तो शिव मी, अहो शिवच मी, जाणा तुम्ही नेहमी. १
वायू प्राण न मी, तदादिक तसे पांची जिव्हाळे न मी,
नोहे धातु शरीरसंघटक वा ना कोशही पांच मी;
ना कर्मेंद्रियसंघ तद् विषय वा जे वेधिती नेहमी,
शब्द, स्पर्श, तसेच रूप, रस, वा गंधाख्य, तेही न मी.
मी सन्मात्र असे सदोदित, तसा.चिन्मात्र, आनंद मी,
आहे तो शिव मी, अहो शिवच मी, जाणा तुम्ही नेहमी. २

राग द्वेष न लोभ मोह मजला, त्यांतें न मी जाणतों,
नाहीं मत्सर वा अहंमति मला, ना धर्म वा मोक्ष तो;
योजी बाह्य निजेंद्रियांस करुनी जो चंचलें मानसें,
तो मी काम नसे, तसा विषय मी तद्वासनांचे नसे.
मी सन्मात्र असे सदोदित, तसा चिन्मात्र आनंद मी,
आहे तो शिव मी, अहो शिवच मी, जाणा तुम्ही नेहमी. ३
नोहे पाप, न पुण्य मी सुख तसें तें दुःखही मी नव्हे,
नोहे मी प्रतिमा, न मी यजन, वा पूजादिकें वैभव;
तीर्थें मंत्रहि मी नव्हे, न हि तसे ते वेद मी संभवे,
नोहे भोजन मी, न भोज्य अथवा भोक्ताहि तो मी नव्हे.
मी सन्मात्र असे सदोदित, तसा चिन्मात्र आनंद मी,
आहे तो शिव मी, अहो शिवच मी, जाणा तुम्ही नेहमी. ४
नाहीं मृत्यु, न मृत्युचें भय मला, जातीहि नोहे मला,
आई बाप न ते मला, तनय हा नाहीं कधीं जन्मला;
कोणी बांधव, इष्टमित्रहि तसे नाहींत कोणी मला,
ना कोणी गुरु भेटला, न हि कुणी चेला मला जाहला.
मी सन्मात्र असे सदोदित, तसा चिन्मात्र, आनंद मी,
आहे तो शिव मी, अहो शिवच मी, जाणा तुम्ही नेहमी. ५
मी निःसंगचि इंद्रियांस, न हि मी मुक्ती, मला नेणवे,
कालातीतचि, रूप अंत न मला, कोणा न मी मापवे;
मी सर्वत्र, चराचरांत भरलों, विश्वास आधार मी,
सूत्रात्मा म्हणती म्हणोनिच मला ज्ञानी मुनी, संयमी.
मी सन्मात्र असे सदोदित, तसा चिन्मात्र, आनंद मी,
आहे तो शिव मी, अहो शिवच मी, जाणा तुम्ही नेहमी. ६

---

# यतीचें भजनगीत.*



आर्या:—

(१)

हे संन्यासिन्! आतां ध्रुवपद तें लाग तूं म्हणायातें,
यतिचें ॐ तत् सत् ॐ आरंभीं भजनगीत गाया तें.
गर्द वनाच्या जठरीं, सखोल गिरिच्या गुहेंत, ज्या ठायीं
संसारदूषणांचा रिघाव कसला?—न गंधही जाई,
तळमळ विषयसुखाची, हांव धनाची, सुकीर्तिलाभाची,
जेथील शांततेला भंगाया न हि कधीं धजायाची,
विजनांत दूर ऐशा जो यति-गीतावतार संभवला,
ज्ञानौघ तो तयानें जेथें अमृतासमान ओढवला,
सत् स्वानंदहि येती ज्या ओघाच्या समेत वाहून,
धीरा यतिवीरा! तूं गीत म्हणें तें उदात्त गाऊन.

ॐ तत् सत् ॐ.

(२)

पाश तुझे तूं तोडीं, बंधचि तव बांधिती तुला साचे,
हे कांत कांचनाचे, किंवा काळया निकृष्ट अयसाचे;
रागद्वेष, शुभाशुभ, असलीं द्वंद्वें जगीं जथाबंध;
कुस्थ्यांत पाडिती तुज, सोड तयांचा म्हणोन संबंध.
जो दास दास तो जरि त्याला गोंजारिला दिले फटके,
बंधांत मुक्तिचे ते वरपंगी आव दावणें लटकें!
कनकाच्या तरि बेड्या! समर्थ त्या कां नव्हेत बांधाया?
तरि धीरा यतिवीरा तोडुनि त्या गीत लाग हें गाया;

ॐ तत् सत् ॐ.

---

* हें गीत न्यूयार्क मधील थावजंड आयलंड्स् पार्क या स्थळीं जुलै १८९५ मध्यें लिहिण्यांत आलें.

(३)

काळोख तो निवारीं, कीं उन्मार्गास तो स्वयें नेतो;
फसवेगिरींत म्हणुनी आग्यावेताळसाच तो दिसतो.
दाखवितो आशेच्या मोहकशा लुकलुक्या प्रकाशातें,
मग रचुनि खिन्नतेचे कज्जलराशी करी निराशा ते !
शमवीं इहलोकींची जीविततृष्णा सदैव, ही खोटी.
जीवास जन्ममृत्यू ह्यांच्या आवर्तनांत ती लोटी.
जो जिंकतो निजात्मा, त्रिजगत्-जेता तयास तूं जाणें;
धीरा यतिवीरा ! हें जाणुनि हो अवश. गा तुझें गाणें.

ॐ तत् सत् ॐ.

(४)

जन पेरणी करी जो, करणें आहेच कापणी त्याला,
कारण जसें, तसें ये ओघानें कार्य तेंहि करयाला;
मिळतें शुभचि शुभाचें, अशुभाचें अशुभ खास मिळताहे,
ह्या नियमाला कोणी अपवादास्पद न एकही राहे.
जो जन इहलोकातें आला जन्मास रूप घेवोनी,
ह्या शृंखला तयाच्या पायीं पडती स्वयेंच येवोनी.
आहे खरें खरें हें, परी अहो ! नाम रूप ह्या उभयां–
पैल सुदूरचि आत्मा, मुक्त असे तो सदैव, जाण तया.
आहेस समज तो तूं, हेंच महावाक्य 'तत् त्वमसि' शिकवी.
धीरा यतिवीरा ! तें जाणुनि तूं भजनसुख तुझें पिकवी.

ॐ तत् सत् ॐ.

(५)

माता, पिता, अपत्यें, गृहिणी, मित्रादि-जे वृथाभास,
स्वप्नांसम भरंवसती त्यांवरि ते जाणती न सत्यास;
लिंगातीत निजात्मा, तो कोणाचा पिता अपत्य असे ?
मित्र कुणाचा शत्रू ? एकचि सर्वत्र जो स्वयें विकसे.

तो सर्वग सर्वांतुनि, त्याविण दुसरें असें नसे कांहीं;
धीरा यतिवीरा ! घे समजुनि आहेस तोच तूं, गाई.

ॐ तत् सत् ॐ.

( ६ )

आत्मा एकचि आहे. विमुक्त, सर्वज्ञ, तो असे साचा,
न हि नाम रूप त्याला, अथवा नाहीं कलंक कैशाचा.
वसते त्यांतचि माया, स्वप्न भवाचेंहि तीच भासविते;
साक्षीभूत तदात्मा, निसर्ग त्याचेंच नाट्य रंजवितें.
आहेस जाण तो तूं, आत्मारामीं रमोनि त्या राहें.
धीरा यतिवीरा ! ॐ तत् सत् ॐकारगान तव गा हें.

ॐ तत् सत् ॐ.

( ७ )

मित्रा, मुक्ति कुठें ती आहे तूं शोधिसी जिला वायां ?
येते ती इहलोकीं ना परलोकीं कुणास मिळवाया.
ग्रंथांतुनि जन तिजला आणि वृथा मंदिरांतुनी शोधी,
तव कर्मकार कर हा तत्प्राप्तीला स्वयेंचि अवरोधी.
ह्यानेंच घट्ट धरिलें अवळोनी दोरखंड कर्माचें.
ओढीत ने तुला तें, मूल्य न त्याला त्वदीय शर्माचें.
तरि शोक टाक, सोडीं पकड करांतील कर्मदोराची;
धीरा यतिवीरा ! गा, दे ललकारी उदात्त जोराची;—

ॐ तत् सत् ॐ.

( ८ )

सर्वांस शांति लाभो ! भय मजपासुनि नसो कुणा जीवा,
स्वर्गांत उंच वसती, सरपटती जे धरातलीं किंवा,
आब्रह्मस्तंबावधि जीव, जिवाणूं, अशेष जे असती,
त्या सर्वांचा आत्मा मीच असे, त्यांत मी करीं वसती.
इहपर तच्चरितांचा करिताहे त्याग मी विरागानें,
स्वर्भू नरकहि सारे त्यजितों जातां स्वमोक्षमार्गानें.

आशा, सर्व भयें, हे पाश तुझे तोड सोड ही माया;
धीरा यतिवीरा ! तूं लागें तव भजनगीत हें गाया;—

ॐ तत् सत् ॐ.

( ९ )

देह कशानें तगतो, नाश कशानें तदीय तो टळतो,
ऐशी चिंता न करीं, जावो कर्मौंघ तो जसा वळतो.
कुणि पुष्पहार घालो, देवो लत्ताप्रहार वा कोणी,
कांहीं एक न बोलें, तूं दोन्ही समसमान मानोनी.
स्तुति-निंदेचा तेथें कोठुनि होईल भाव संभवता ?
स्तोता स्तुत्यहि एकचि, निंदक निंद्यहि जिथें नसे सवता.
यापरि शांत रहा तूं, चित्ताची ठेवुनी सदा समता,
धीरा यतिवीरा ! गा घुमवी तो प्रणवनाद तुजभंवता.

ॐ तत् सत् ॐ.

( १० )

तान्हेले विषयाचे, आणि भुकेले सुकीर्ति-कनकाचे,
लोभी राहति जेथें, दर्शन तेथें घडे न सत्याचें.
स्त्रीशीं जो नर ठेवी पत्नी म्हणुनी जगांतलें नातें,
तो पढतमूर्ख, तन्मन पूर्णत्वातें कधीं न तें जातें.
मितहि निधी जो जमवी, किंवा जो वश असे प्रकोपाला,
द्वारांतुनि मायेच्या शक्त नसे तो निघोन जायाला.
यास्तव ह्या सर्वांतें त्यागोनी मोकळें सुखी व्हावें;
धीरा यतिवीरा ! निज भजनचि तारस्वरें तुवां गावें.—

ॐ तत् सत् ॐ.

( ११ )

नाहीं वास नसो तुज ! तुला पुरेसाहि तो कुठें आहे ?
मंडप गगन सख्या तव, गवत विराजे तुझा बिछाना हें.
पक्वान्न वा कदन्नचि वाढुनि येईल जें अनायासें,
आवड-नावड न करुनि सेवीं तें सर्व मानुनी खासें.

न हि खाद्य पेय एकहि आत्मारामास ह्या विलोभवितें.
आत्मज्ञ तो स्वयें कीं, अलिप्तता हीच त्यास शोभविते.
तूं सतत वाहणाऱ्या कित्ता वळवीं स्वतंत्र सरितेचा,
धीरा यतिवीरा ! गा, कवितेचा विषय पुण्यचरितेचाः—

ॐ तत् सत् ॐ.

( १२ )

हें सत्य फार थोडे अथवा विरळाच जाणती ज्ञाते,
द्वेषचि तदितर करिती, किंवा हंसतात त्या महात्म्यातें.
क्षिति बाळगीं न त्यांची, मुक्तचि तूं, त्वां स्थळोस्थळीं जावें,
अज्ञांतें तिमिरांतुनि, मायाऽवरणामधोनि काढावें.
क्लेशभयें न बुजावें; सुख धुंडाया तुवां न हिंडावें;
धीरा यतिवीरा ! त्या दोहींच्या पार जाउनी गावें—

ॐ तत् सत् ॐ.

( १३ )

यापरि अनुदिन जोंवरि कर्मांचें बल तया लया जातें,
तोंवरि काढुनि गुंता, दे तव हातेंच मोक्ष जीवातें.
नंतर जन्म न पुढतीं, मी वा तूं भाव हाहि नुरताहे,
तैसाच जीव-शिव कीं, नर-नारायण न भेद हा राहे.
‘ मी ’ सर्वपूर्ण, तैसें सर्वहि ‘ मी ’ पूर्ण, ‘ मी ’ निजानंद.
धीरा यतिवीरा ! तो तूंच निजानंद. गा तुझा छंद.

ॐ तत् सत् ॐ.

———

## देवी श्यामा नृत्य करो मग तेथें.*



साकी—

( १ )

सुंदर मोहर ज्यांतुनि भंवतीं घमघम सुगंध चाले,
भृंग संघ ते होउनि वेडे गुंगति सभोंवताले,
चंद्र चंद्रिका धवल रुपेरी मधुर सुहासचि वर्षे,
स्वर्गनिवासी भूभवनें हीं बघती अतीव हर्षें.
त्या मलयाच्या मंजुळ झुळुकी तनु भारुनी मनातें
गत स्मृतीच्या घड्याच उकलुनि आणिति निदर्शनातें.
सरिता, ओढे, प्रवाह ह्यांचे खळखळत वाहणारे,
मंजुलवातें कलनादित ते कासार शोभणारे,
अगणित कमलें फुलुनि जयांतुनि झुलतात मंद वातें,
चंचल भृंगे त्यांवरि घिरट्या घालुनि करिति रवातें,
फेंसाळुनि धबधबे नव्हे तीं संगीतेंच वहाती,
गिरिकंदरिं तत्प्रतिरव घुमुनी साथ करोनि रहाती,
सुपल्लवांतुनि लपुनि पांखरें मारुनि मंजुल ताना,
रिचविति हृदयें, प्रेमालापचि वदतात तीं प्रियांनां,
दिनमणिमंडल उदया येतें; हा दिव्य चित्रकार
स्वर्ण-कुंचले भूमिपटावरि मिरवुनि करी बहार;
त्वरितचि त्याचें सुवर्णवैभव निसर्गहृदयीं वाहे,
रमणीयोज्वल विश्वचित्र हें जीवंत शोभताहे.
खरोखरीं जग सुललित रंगी हा एक अजबखाना,
हेलावुनि दे सकल रसांचा सिंधूच पाहतांना.

---

* हें काव्य स्वामी विवेकानंद यांनीं मूळ बंगाली भाषेंत लिहून त्याचें त्यांनींच इंग्रजींत भाषांतर केलें आहे.

(२)

घन संघांचे परस्परांवरि आघात वेगवंत,
आणि गर्जना थरकविती ज्या ब्रह्मांड हें अनंत,
द्यावापृथिवीमधुनि माजतां भूतांचें रण मोठें,
काळोखातें होउनि वमनें घनांधकारचि लोटे,
प्रळयकाळचा वात वहातो आक्रोशुनी सरोष,
मूर्तिमंतशा रौद्ररसानें करितो भयपरिपोष;
रक्तवर्ण ती वीज भयंकर, चमकुनि असह्य तेजें
कडाडुनीयां सहसा पडतां मृत्यूच दाविते जे,
असुरी लाटा मेघांसम त्या गर्जुनि फेंनिल होती,
गिरि-शिखरावधि उसळायातें सावेग लोटताती;
चवताळोनी गरनाळीसम धरणी धडाडताहे,
झुके, अडखळे, ढळुनि पदाहुनि निज नाशरूप राहे;
भूतल फोडुनि उद्वेगानें ज्वाला घोर वहाती,
पर्वतराजी रजःकणांसम गगनांत उंच जाती.

(३)

निवांत सुंदर एक लतागृह नील सरावरि साजे,
प्रफुल्ल नलिनी सरोवरीं ज्या मालाकार विराजे,
द्राक्षफलें तीं भुरी चढोनी परिपक्व जेथ झालीं,
सुरस तयांतिल तो गुजगोष्टी सांगतसे ह्या कालीं;
सारंगीचे सुमधुर कलरव कर्णपथांत वहाती,
अलाफदारी, ताल, सुरांची लय गोड वाहवा ती !
मानवहृदयीं कामवासना संगीत जागवी तें,
तदंतरंगीं विकारवादळ अनिवार माजवीतें !
प्रेमाचे किति कढत उसासे, पाझरतात उन्हाळीं,*
नयनपथीं ते विलसुनि राहे, सुललित राजसबाळी.

* ऊन्ह पाण्याचे झरे, ज्यांस इंग्रजींत थरमॉल असें म्हणतात; अर्थात् प्रेमाचे पाझर.

गोंडस यौवन, ते बिंबाधर, घननील दोन डोळे,
कीं वृत्तींचे सागर ज्यांतुनि आंदुळतें मन भोळें.
सुंदर बाहू उतावळे ते दोन्ही पुढें सराया,
तो प्रेमाचा पिंजरा म्हणतो राघूस आंत या या !
हृदय-जिवाचा येथ जिव्हाळा,–मोहांत सांपडोन,
जाणुनि पडतो त्या करपाशीं होवोन बंदिवान.

( ४ )

रणवाद्यांचा घोष उदेला, शिंगें पुकारितातीं,
वीरपदांनीं हदरुनि भूमी उंच धुराळे जाती.
धडकति तोफा, झडति बंदुका, फेरी मागुनि फेरी,
लोट धुरांचे, ती रणभूमी, मृत्यू उभा समोरीं !
घोर गर्जना करुनि सभोंतीं वरसतसे जी आग,
कालीसम ती महाभयंकर उल्हाटयंत्र–रांग,
लाल रवीसम कुलपी गोळे वेगें येउनि फुटती,
भेदुनि मर्में नरवीरांचे प्राण वपूंतुनि सुटती;
गिरीपरी गज, सतेज वाजी, सवार, एकच काळीं
ह्या सकळांचें होउनि धुडके जातात अंतराळीं.
न अंतकाचें अकांड तांडव साहुनि धरा थरारे,
इतुक्यामाजीं रणकोलाहल झाला "पुढें चलारे !"
नरसिंहासम तुटोनि पडती शूर हजारों स्वार,
बळकाविति ते निज शत्रूच्या रणयंत्रांची हार.
वर्षति गोळे, गुलिका, घेरिति निबिड धुराचे लोट,
तरि घुसुनि ते त्यांतुनि काढिति निज विजयाची वाट.
पुढें सरोनी, वीर अघाडी मारुनि निशाण नेती,
ती विजयाची खूण विराजे वीरश्रीच अहो ती.
कढत रक्त तें अझुनि जयाचें काठीवरोनि वाहे,
झडति बंदुकी मागुनि तरि तो रणमस्त चाललाहे.
खरा बहादर छातीचा तो निधडा निशाणदार,
पहा पहा ! परि थकोनि पडला जावोनि रक्त फार.

तरि नच कचतां त्यासम त्याचा साथीदार शिपाई,
निशाण अपुल्या खांद्यावरुनी नेई करुनि धिटाई.
जे संग्रामीं कामीं आले त्या वीरांच्या राशी
तुडवित चाले पुढें पुढें तो झगडोनि अंतकाशीं.

( ५ )

सुखसंबंधाकरितां दिसतो मानवदेह भुकेला,
इंद्रियगणही संगीताला लोलुप ललित-कलेला;
मनहि भुकेलें सुमधुर ऐशा मजलेदार हंशाचें,
हृदयहि धापा टाकित गांठी प्रदेश रम्य सुखाचे.
मध्यान्हींचें प्रखर ऊन्ह तें घेऊनि विनिमयानें,
कवण चंद्रिका ती सुखशीतल देईल कोण जाणे !
असे अभागी हृदय जयाचें दाहक रवीसमान,
तोहि कौतुकें प्रेम करोनी हिमांशुला दे मान.
अहो खरोखर तृषार्त सारे हे जन आनंदाचे,
मौजा, गमती, ह्यांचे शौकी; जग सोबती सुखाचें.

( ६ )

जगांत कोणी जन हतभागी असेल का हो असला ?
पीडा, दुःखहि जो हृदयाशीं घट्ट धरोनी बसला.
सुखोपभोगामधुनि जयाच्या विपदा सुदुःख भरलें,
बनुनि राहिलें अमृत जयाचें घातक असेंच गरलें.
जहर गळ्यांतुनि उतरत असतां आशेस गुंतलाहे,
वृथैव जीवित ! इह पर सुख तो मोहविमूढ न लाहे.
पहा ! कसे ती करालरूपा सकलांस डाव देते !
मोह पराङ्मुख करावया ती जनतेस जागवीते.
तरि कोणीही न इलोकेशी त्या मृत्युरूपिणीला
ध्याती, अथवा सद्भावानें भजती न ते तियेला.
तिच्या करांतिल कराल, रुधिरें थबथबती तरवार
काढुनि, तेथें वीणा द्याया कामुक आज तयार !

हे काली ! अति भयंकरे ! हे प्रलयाचे अधिदेवी !
न अन्य, तूं सत् स्वरूपिणी हें शिर मी तव पदिं ठेवीं.
मनमोहन वनमाली ही तव छायेची पडछाया
दिसे खरोखर,–भयदे माते ! कामी जन रमवाया.
त्वरितचि माझें हृदय विदारीं ! मायामोह निवारीं !
जगन्निमिषें हें स्वप्न सुखाचें·दूर करीं–अपसारीं !
गे मातीचें शरीर जड हें, मिथ्या लोभ तयाचा,
म्हणुनि विदारुनि तयास देईं मज मोक्षलाभ साचा.

( ७ )

खरेंच जरि ते घालिति तुजला तव शाक्त रुंडमाला,
तरी भयानें निखिल दयाले ! म्हणती नमोनि तुजला.
घनगर्जितसा–कल्लोलांसम–तुझा भयंकर हास,
दिगंबरे ! तुज नग्न बघोनी कंप सुटे सकलांस;
हृदयें त्यांचीं नम्र भयानें बनती, पण ते म्हणती,
असुरमर्दिनी माता, इजला नहि दीनांची गणती.
केवल दांभिक, वांछिति जरि ते दर्शन तुझें कराया,
प्रसंग येतां बघुनि तुला ते मग लागती पळाया.
काली ! असती मूर्तिमंत तूं कालचि सकल जनांतें,
पसरिसि वाखे नाना व्याधी भवबीजभर्जनातें.
तव हस्तें तूं भरोनि देसी प्याले रोगविषाचे,
मृकंडुसुतही तुजला दिसती साथी जणु निमिषाचे.

( ८ )

रे रे वेड्या ! करिसि वंचना तूंच तुला ठकवाया,
कां न पहासी वळुनि ? पहा तूं जरि वांछिसी बघाया.
अहा, दिसे ती महाभयानक मूर्ति जगन्मातेची,
रौद्ररसाची परमावधि, कीं ही मूर्ति कालिकेची.
आपत्तीतें कंवटाळिसि तूं धरुनि सुखाची आशा,
सुखलोभानें पडुनि संकटीं जाशील तूं प्रणाशा.

अर्चनभक्ती ही देखाऊ धारण करिसी कंथा,
स्वार्थपरायण मनास न दिसे परमार्थाचा पंथा.
मेषशिराचें छेदन करितां जो रुधिरौघ वहातो,
तो बघतां तव उर धडधडतो, जीव भयाकुल होतो.
खराच भितरा ! न तूं दयाळू. दया भयामधिं नसते;
धरुनि करतळीं शिर लढणाऱ्या वीरांतचि ती वसते.
धन्यचि माझ्या आत्मारामा ! वस्तुविपर्यय सारा !
सत्य असे तें कुणास सांगूं ? तें कोण जाणणारा ?

( ९ )

प्रबल अशा ह्या मोहामधुनी सोडविं तूं तुज साचा;
ही प्रेमाची भ्रामक मदिरा, जादू विषयसुखाचा;
फोडुनि वीणा पुढें पुढें जा सागरघोषासंगें,
अश्रु पिवोनी पणास लावीं जीवित तुझें प्रसंगें.
देह पडोंदे, जागृत हो, तूं स्वप्नें झुगार खोटीं,
मृत्यूसन्मुख ठाके वीरा ! यांतचि असे कसोटी.
दुःखभार हा थोर खरोखर, तरि यास कां बुजावें ?
शूरा ! बुजणें तुज नहि शोभे, त्वां शौर्यास भजावं.
जन्ममरण.भवचक्र असे हें, इश्वर हाच तुझा कीं,
श्मशान हें तन्मंदिर आहे जग जेथ देह टाकी.
शवें, चिता, जें युद्ध सततचें, ती तत्पवित्र पूजा,
नित्य पराभव, कधींहि न करो हा हीरमोड तूझा.
भगूर तनु हें भंगो यासह आशा, नांवहि यश तें,
या सकलांची लाव चिता तूं, उर हें मसणचि नुसतें.
क्रव्यादग्नि भयंकर भडकुनि त्यांतुनि शव जळतां तें,
निजाट्टहासें देवी श्यामा नृत्य करो मग तेथें.

---

# भावगीत.*

—:*:—

शार्दूल—

( १ )

गातों सात्त्विक भावगीत तुजला, मी गातसे प्रीतिनें,
टीका लोक करोत त्यावरि बरी वाईट अप्रीतिनें;
त्याची ना परवा मला स्तुति तशी निंदा गमे सारखी,
दिव्य प्रेम अमोलसें गवसलें, तें रत्न मी पारखी.

( २ )

दोघांचा तुमचा+ खरा भगत वा सेवेकरी मी असें.
सक्तीनें अति लीन होउनि पदीं तीं वंदितों सारसें.
पाठीशीं असशी निरंतर उभा तूं पाठराखा सखा.
अंगानें करितां प्रदक्षिणविधी मी पाहतों त्वन्मुखा.
तें तूझें मुख हांसरें बघुनि मी गातों सदा संतसा.
भीतों मी न भया, विलीन मजला कीं जन्म मृत्यू तसा.

( ३ )

जन्मांच्या परिवर्तनांतुनि तुझा आहे प्रभो ! दास मीं;
तूझे मार्ग दयार्णवा ! तुमगती अज्ञेय ते नेहमी.
माझें दैवहि त्यासमान गमतें, तें जाणवेना मला,
तें कोडें उकलावयास पुढतीं इच्छा नसे याजला;
भक्ती, मुक्ति, तपें, अनेक जप, ते स्वद्भोग वा पूजनें,
तूझा भावहि वस्तु ह्या, इतरही यांच्यापरी साधनें,
केलीं वर्ज वरिष्ट मानुनि तुझी आज्ञा प्रमाणास्पदा;
आतां एकचि मन्मनांत उरली इच्छा असे सर्वदा.

---

* हें मूळ काव्य स्वामी विवेकानंद यांनीं बंगाली भाषेंत लिहिलेलें असून त्याचें इंग्रजी रूपांतरही केलें आहे. + प्रकृति आणि पुरुष यांचा.

ती तूर्तेच निवेदितों, प्रकृतिशीं हे पूरुषा संयुता !
व्हावें सख्य तुझ्यासवें विनवुनी मी मागतों मागुता.
प्रल्हादास न काय तूं मिरविलें अंकावरी त्या ध्रुवा ?
तें वात्सल्य मनीं स्मरोनि, मजला तैसेंच घ्यावें तुवां.
येवो भेदक वासना न किमपि प्रेमांत ह्या आडवी;
हे रत्नाकर ! मी तरंगचि तुझा, स्तोता असे मी कवी ×

( ४ )

नेत्रें पाहति बाह्य विश्व, परि तीं ना शोधिती आपणां,
ऐशीं बाह्य किमर्थ तीं निरखिती ? हें तों कळेना कुणां;
तीं अन्यांतुनि त्यांजलाच बघती; तत्त्वार्थ हा यांतला.
तो विश्वात्म-उपासकास पटला ज्ञानी मुनीला भला.
तूं माझीं नयनें, खराच असशी तूं एकला तूं सखा.
जीवन्मंदिर ह्या जगीं प्रगटवी प्रत्येक तूझ्या मुखा.

( ५ )

माझा सर्वहि नोक झोंक विलसे जो बाललीले परी,
तो उद्देशुनि तूजला घडतसे, मी तूजसाठीं करीं;
केव्हां मी निज धाडसें तुजवरी रागावतोंही पहा !
केव्हां स्वैरपणें उगा भटकतों दूरान्तरीं दास हा.
तेथें कृष्ण निशेंत, अंधक अशा भस्मी उजेडांतुनी,
माझ्यासन्मुख अश्रुपूर्ण नयनीं, मौनव्रता घेउनी,
त्या ठायींहि उभाच तूं, लवुनियां माझ्या मुखीं पाहसी,
दृष्टी प्रेमळ ती तुझी मधुर ती चर्या कशी रे कशी !
मी त्यानंतर लागली परतुनी येवोनि तूझ्यापुढें
टेकोनी गुडघे तुला शरण ये, पायीं तुझ्या मी पडे.
हे सौम्या ! न तुझ्याकडोनि कधिंही क्षांतीस मी मागतों,
कीं केव्हांच तुझ्या मुखावरि तुला मी रुष्ट ना पाहतों.

---

× ही ओळ पादपूरणार्थ घातली आहे. Cf. "यद्यपि भेदापगमे नाथ ! तवाऽहं न मामकीनस्त्वं सामुद्रोहि तरंगः क्वच न समुद्रोहि तारंगः–" आचार्याः ।

माझ्या बालिश खोडसाळ लहरी साहील जो अंतरीं,
ऐसा कोण असे दयाघन दुजा ? तो तूंच तूझ्यापरी.

( ६ )

तूं माझा यजमान ! तूं मम खरा जीवाजिचा सोबती,
मी तूंतें बहुसाळ पाहत असे,–मी तूंच हे सन्मति !
मी तो तूंच सदैव आणि अससी तूं तो ममात्माच,–मी.
भासे पालट हा विचित्र तरि तो आहे खरा नेहमी.
वाणीतोनि मदीय तूं अससि तूं कंठांतुनी माझिया,
वीणापाणि सरस्वतीच जणु ती राहे तिथें गावया.

( ७ )

विश्वात्मन् ! तव वेगसंयुत अशा इच्छाप्रवाहावरी,
सारी मानवजाति वाहवुनि तूं नेसी हवी त्यापरी,
लाटा घोष करोनि ज्या थडकती हेलावत्या सागरीं,
गा तूझी घनगर्जना घुमतसे त्यांच्याहि घोषावरी;
ह्या विश्वांतिल सूर्य चंद्र तुझिया शब्दांत ते बोलती,
तूझें भाषण ऐकवोनि झुळुकी मंजूळशा वाहती.
तें तूझेंच खरें, यथार्थचि तुझें, तें सत्य सत् जाणवी,
साधे बोध, निरोपितात न तरी ते उंच तत्त्वच्छवी
ज्ञाता केवळ जाणतो, न इतरां ती थोरवी आकळे;
( प्राशूं पावतसे चकोरचि सुधा चंद्रांतुनी जे गळे. ) *

( ८ )

तेजाचा निधि, चंद्रमा, ग्रह तसे कक्षांत जे चालती,
तारे थोर सतेजसे, चमकत्या त्या चांदण्यांच्या तती,
आकाशांत असंख्य लोक वसले जे स्वप्रदेशांतुनी,
उल्का, केतुहि वेगवंत चमके जी वीज मेघांतुनी,
हें तारांगण, जें अनंत भंवतीं व्यापोनियां शोभतें,
सर्वप्रेक्षक नेत्र सावध जगत् होतात हें पाहते.

---

* मूळास साजेल असा हा दृष्टांत मी दिला आहे.

(९)

काम, क्रोध, विलोभ, मोह, असले मोठे रिपू, ज्यांतुनी
चाले हें भवनाळ्य, वस्तुरचना नानापरी पावुनी,
ज्ञानाऽज्ञानहि संगतीं वसतसे जेथें असें गेह तें,
जीवाची स्फुरुनी अहंमति जिथें केंद्रापरी भासते;
द्वंद्वें नैक सुखासुखादि वसती संपूर्ण जेथें स्वयें,
जेथें पुष्कळ जन्म, यौवन, जरा, मृत्यू, असें पीक ये;
अंतर् आणि बहिर् विराजति महा बाहू असे दोन हे,
आत्म्याचें बल आणि पौरुष भलें ज्यांतोनि दृष्टीस ये;
ज्या ज्या वस्तु सखोल सागरतलीं, वा चंद्र–सूर्यांवधि,
किंवा ज्या असती अमेय गगनीं दूरस्थ तारावधि,
तैसें हें मन, बुद्धि, चित्त, चवथें तें इंद्रियाऽहंकृति,
सारे देवहि यक्ष, मानव, तशा त्या दानवांच्या तती,
पक्षी आणि पशू, तसेच अवघे ते जीव, जंतू, किडे,
संख्यातीत अणू, तदंशघटना यंत्रेंच जी सांपडे.
अस्तित्वांतुनि जें चराचर असें निःशेष सारें असे,
अंतर्बाह्यहि एकजीव सगळें तें ब्रह्मनामें वसे.
त्याची स्थूलचि बाह्यरूप-रचना आहे स्वयंभू तशी,
भ्रूचापावरि आपल्या उगवली ही रोमराजी जशी.

(१०)

मेरूच्या सुविशाल शैलशिखरीं शाश्वत् हिमाच्या तती
राहोनी बहु योजनावधि अशा त्या सारख्या लांबती;
यत् श्रृंगें शतसंख्य मेघपटलें भेदोनि जाती वरी,
तेजानें हिमशुभ्र तीं चमकती सद्वैभवें अंबरीं.
दृष्टीसन्मुख चंचला विशद ते मेरूवरी नाचते,
वारंवार विलास दावुनि असे ती सत्वरीं लोपते.
जेव्हां भास्कर उत्तरध्रुवपदीं मध्यास आलंबतो,
केन्द्रीभूत सहस्र चंड किरणीं तेजास तो ओततो,

विद्युत्पात तदा जणों घडुनि त्या लक्षावधी पर्वतीं,
शृंगोशृंगिं महोष्णता वरसते, तत्पूर कीं लोटती.

( ११ )

प्रत्येकीं शिखरीं प्रचंड सविता तो मूर्च्छताहे पहा !
तेणें ते शिरपेंच आणि वितळे तो रत्नसानू महा;
खालीं कोसळतो भयंकर रवें, नाना प्रपातें पडे,
वाहोनी जल तें जलीं मिसळतें, सिंधूच त्याचा घडे.
जातो वाहुनि हाहि सिंधु सगळा पर्जन्यपूरापरी,
किंवा स्वप्न जसा दिसोनि नयनां तो लोपतो लौकरी.

( १२ )

जेव्हां वृत्ति अनेक, या तव कृपें नाना मनाच्या गती
एकाकार–अशेप एकवटुनी–होवोनियां राहती,
अव्यक्तांतिल तो प्रकाश इतका तेव्हां दिसे थोरला,
कीं, लाखों रविचाहि दीप्तिपुढतीं त्या होय झांकोळला.
सच्चित्सूर्य तदा स्वयंप्रभ असा दे आपुल्या दर्शना;
त्यानें फार अवर्णनीयचि असा आनंद होतो मना.
त्या दीप्तींतुनि सूर्य, चंद्र, उडुपें, स्वर्लोक, तैसे अहो !
पातालांतिल लोकही वितळती; सारें द्रवीभूत हो !
भासे थिल्लर विश्व हें बनविलें कीं गोष्पदानें जसें,
व्याप्ती यापरि दृष्टिची पसरतां निःसीम ती होतसे.
बाह्यातीत महाप्रदेश, ह्मणती अव्यक्त ऐसें जया,
ह्या त्यांतील निवेश येथ कथिला तत्कल्पना यावया.

( १३ )

देहाचा मग वासनोज्वलितसा कल्होळ तो शांत हो.
दर्पानें मन गर्जना न करितें, तें लीन शालीन हो.
होती सर्व ढिले पडोनि सहसा हृद्-बंध ते मोकळे,
संसारांतिल बंधनेंहि सुटुनी संबंध त्यांचा टळे.
प्रेमाकर्षण, मोहही न पुढतीं थाऱ्यास ते राहती,
जीवन्मुक्तचि तो बनोनि वसतो मौनी मुनी संप्रति.

(१४)

हेलाव्याविण गोड संतत असा तो शब्द आतां निघे,
हा तों शब्द तुझा ! खरोखर तुझा ! मी नीट ऐकोनि घे.
ऐसा तो परिसोनि दास तव हा राहे उभा आदरें,
तूझें कार्य करावया बघ कसा तो सिद्ध आहे बरें !

(१५)

'मी' हा नित्य असे. जगत्–प्रलय ये कालक्रमें जेधवां,
होतें लुप्त अशेष अद्भुत असें ब्रह्मांड हें तेधवां.
ज्ञाता, ज्ञान, अदृश्य होउनि वसे, तें ज्ञातही नेणवे.
हा भूगोल कुठें तदा न गवसे, तत्कल्पना नाणवे.
होवोनी रवि, चंद्रमा उडुगणें क्षीणायु ना राहती,
ज्ञाते ह्या स्थितिला पुराणिक 'महानिर्वाण' सें बोलती.
ह्या वेळीं न हि कार्य, कर्म, अथवा कर्त्ताहि कोणी नसे,
किंवा साधन, वा सहाय्यक असा त्याचा न कोणी वसे.
काळोखास महान्ध तें घन तमस् झांकोनि घे नेहमी.
तेथें 'मी' वसतों. उपस्थित तिथें जाल्या असे जाण 'मी.'

(१६)

'मी !' मी होय सदोदित. प्रलय तो येवोनियां ठेपतां,
सारें विश्व विशाल त्यांत मिळुनी तादात्म्य हें पावतां,
ज्ञाता, ज्ञान, विलीन एकवटुनी तें ज्ञातही झालिया,
हें ब्रह्मांड न राहतें. वितळुनी तें पावताहे लया.
त्याची नंतर कल्पनाहि मतिला नोहे; न तें जाणवे.
आदित्यादि नभांतली सकळही ज्योतिष्मता मालवे.
अंधःकार तमाचिया विचरतो वक्षावरोनी तदा,
त्रैगुण्याव्यतिरिक्त विश्व उरतें, त्या विश्व कैसें वदा !
होती शांत तिन्ही गुण त्यजुनियां वैशिष्ट्य आपापलें,
एकाकार समानतत्त्व बनुनी सारें असे लोपलें.
ह्या कालीं अविभाज्य, शुद्ध, अणुच्या रूपांत जें तें वसे.
अस्तित्वांतुनि 'मी' इथेंहि असतों; येथें स्वयें 'मी' असे.

(१७)

मी आतां मजला पुन्हां करुनियां सुव्यक्तसा दावितों.
मी ही शक्ति, विकार नादमय हा माझा असे आद्य; तो
मूलध्वान तरंगशील घुमतो, शून्यांत तो संचरे,
ओतप्रोत अनंत हें उचमळे ॐकार–तारस्वरें.
हा निर्घोष असा स्वयें परिसतें सारें महाकाश तें;
तेणें जागृति मूल कारण गणा येते प्रकृत्याच ते.
नोहे जे नव जीवनें स्फुरति त्या शाश्वत् अणूंला मिती,
वाटे त्यांतुनि मंत्रसिद्धि मिरवे संजीविनी काय ती.
विश्वांतील सुयंत्र जीवित अतां उत्थान पावे, भ्रमे,
तें जा ये करितें, नटोनि फिरतें रासांतल्या संक्रमें.
कीं आत्यंतिक अंतरावरुनि तें अभ्यन्तरीं जातसे.
आतां त्यांतुनि चित्कला स्फुरतसे सारांश ऐसें दिसे.
वायू जागृति जीवमान् धरुनियां तत्त्वांचिया सागरीं
लाटांची गुरु घोषणा उठवुनी फैलाव तीचा करी.
त्यांची घोर परंपरा ढवळते, ती आंदुळे, आदळे,
वज्रावेश धरोनियां भडकती तीं वेगवान् वादळें.
होवोनी प्रतिरोध अंबरपथीं ईशेच्छया खंड जे
जाती फेंकियले तदीय भुवनें हें विश्व तैसें सजे.
नानालोक, दिवस्पर्दी ग्रह, अहो ! तारे असंख्यात ते,
वेगें चालति, मानवाश्रय धरा ही त्यांतुनी भोंवते.

(१८)

आरंभीं जगताचिया वसतसे जो एक सर्वज्ञ 'मी,'
तो 'मी' स्थावर–जंगमांतुनि असे तेव्हां, तसा नेहमी.
अस्तित्वांतुनि विश्वसृष्टि अवघी ही यावया कारण
आविष्कारचि शक्तिचा मम असे सत्ता असाधारण !
आज्ञाशक्तिमुळें मदीय सुटती तीं राक्षसी वादळें
भूपृष्ठावरि, मेघसैन्य गगनीं आक्रोशतें, आदळे.

विद्युत् चमूचमते, उडोनि पडते वेगें कडाडोनि ते.
वायूची मलयावरील लहरी मंजूळशी वाहते.
नामी संक्रम शांत ते गमति की संथावलेले तसे,
श्वासोच्छ्वास गमागमें विचरती योगीजनांचे जसे.
चंद्राचीं किरणें सुशीतल सुधा भूमीवरी ओतिती,
पृथ्वीचें उघडें शरीर हिरवीं तीं शाद्वलें झांकिती;
नाना वृक्षलता, असंख्य कुसुमें, हीं भूषणें लेतसे,
नामी मोहर वा प्रफुल्ल कमलें ह्या सन्मुखें ती हंसे.
अश्रूतुल्य तुषार जाउनि लया, सूर्याकडे पाहते,
आत्म्याला सुमनांतलें विभव त्या ती प्रेमला वाहते.

---

## तारीख ४ जुलैस उद्देशून.



[ हें सर्वांस मह्शूर आहेच कीं, स्वामी विवेकानंद यांचें देहावसान ( अथवा ज्यास ब्रम्हीभवन असें म्हणणें आपणांतील कित्येकांस विशेष पसंत होईल ) हें ता. ४ जुलै १९०२ रोजीं घडलें. सन १८९८ सालीं ते ह्याच तारखेला अमेरिकेंतील कित्येक शिष्यांसमवेत काश्मीरांतून प्रवास करीत होते. तेव्हां अमेरिकेचें स्वातंत्र्य जगजाहीर झाल्याचा तो सांवत्सरिक दिवस, तद्देशीं सार्वत्रिक पुण्यतिथि म्हणून उजविण्यांत यावा, असा त्या मंडळींनीं आपला घाट स्वामींस विदित केला. तो जाणून स्वामींनीं त्या दिवशीं न्याहरीच्या वेळेला मोठ्यानें म्हणण्यासाठीं हें पुढील काव्य रचून तयार केलें. स्थिरमतानुयायी यांजकडून हें काव्य अद्यापि स्वीकारण्यांत येत आहे. ]

( पृथ्वी. )

( १ )

पहा, घनसमूह जे निबिड काजळासारखे
जमोनि धरणीवरी असति लोंबले सारखे,
अशेष वितळोनि ते लय निशेसवें पावले,
जणो दुखवळ्यांतले अशुभ वेष दूरावले.

तुझे प्रगटतांच ते कर जगांत जादू फिरे,
तयामधुनि जागृती किमपि चेतना संचरे;
विहंगगण गायनें किति सुरेल आलापिती,
जणो वनसुधाच त्या गगनमंडळीं वाहती.
तुषारा जडिले जयांवरुनि दिव्य मोती जसे,
अशा सुकुसुमांसवें तरुहि डोलती हे कसे;
जणो मुकुट तारकांसदृश घालुनि सर्व ते
उभे, झुलुनि बाहती तुज करावया स्वागतें.
असंख्य कमलें जशीं प्रणयपूर्ण तीं लोचनें,
विकासुनि सरोवरें करिति कीं तवावाहनें;
सखोल हृदयांतलीं समज हीं तुझीं स्वागतें,
पहा, जग किती तुला सकल चाहतें बाहतें.
अनंतभुवनेश्वरा ! अयि अगाधतेजोनिधे !
अशेष अभिवंदिती जन तुला त्रिलोकीमधें.
नवीन तुज आज हीं करितसों अम्हीं स्वागतें,
तुझे किरण वर्षती अवशता रवे आज ते.

( २ )

स्मरे जग तुला कसें विविध देशकालांतुनी,
उपासुनि असे तुला सतत अंतरीं शोधुनी,
गृहें त्यजियलीं कुणी, स्वजनलोभ ते सांडिले,
सुचिंतन तुझें कुणी वसुनि निर्जनीं मांडिलें.
उदास उदधीमधीं, सहजसिद्ध ऐशा वनीं,
रिघोनि बसले कुणी दृढसमाधितें लावुनी.
जिणें, मरण, यांसवें प्रतिपदास ते झुंजले;
तदा सुदिन पातला; श्रम फलें धरूं लागले.
तुझीं यजनपूजनें, भजन भक्तिभावें तुझें,
सुचिंतनहि पावलें तुज, घडे यथासांग जें.
प्रसन्न मग होउनी उदय तूं प्रभो ! पावसी,
प्रकाश जगतावरी जणु विमुक्तिचा वर्षसी.

( ३ )

निरर्गल तुझ्या पथीं क्रमण हे प्रभो ! तूं करीं.
विराज निज दीप्तिनें गगनमध्यबिंदूवरी.
तिनें झगझगेल हें जगत जोंवरी न्हाउनी,
प्रकाश तळपेल हा अतुल देशदेशांतुनी;
शिरांस जनजात ही तंव उभारुनी पाहतां,
म्हणेल निज बंधनें, खचित भंगलीं हो अतां;
कृतार्थ मग होउनी, अनुभवोनि आनंद ती
म्हणेल नव जीवनें सकळिकां अम्हां लाभती !

---

( भगिनी निवेदिता यांस दिलेला )

## आशीर्वाद.

—:o:—

( स्रग्धरा. )

मातेचें कोंवळें तें हृदय तुज असो पुष्पजातीसमान,
वीरेच्छा तूंत साजो जणु घन—पटलीं वीज हो भासमान;
लीलेनें जी सुगंधी मृदु मधु लहरी वाहते दक्षिणेची,
चेतोवृत्ती करो ती तिजसम अमुच्या ह्या विशालेक्षणेची.
आर्यांच्या यज्ञकुंडीं शुचितर वसते शक्ति जी इंद्रजाली,
मुक्तज्वालावलीनें तुजमधुनि बघूं ती समाविष्ट झाली;
माला ही सद्गुणांच्या सुविविध गुणकें आणखीही गुणावी,
हीतें घालोनि कंठीं तव गुणमहती स्रग्धरे, तूं दुणावीं.
प्राचीनात्मा कुणीही तुजसम विदुषी स्वप्निंही पाहता ना,
तूं भावी हिंदपुत्रा वरुनिच मिळवीं हिंददेशांत माना;
पत्नी, दासी, सखी ह्या अधिकृति धरुनी तीन एकाच देहीं,
आर्ये ! सानंद नांदे शुचितर महिला श्रीमतांच्याच गेहीं.

---

# चित्रकला



तूं धन्य, तूं उचित चित्रकले ! स्तवाला;
हें बोलतों स्मरुनि केवल वास्तवाला.
कीं वस्तु ज्या वसति दूर,—लयास जाती,—
त्या त्वत्कृपें प्रगटती,—जवळीं रहाती. १

स्व–स्वानुरूप जड देह सदैव त्यांचे
पाहोनि नेत्र निवती प्रिय चाहत्यांचे;
त्यांचा वियोग असतां सहवास भासे,
तेणें स्थिरावति मनांतिल ते उमासे. २

हें सत्य कीं, जन मवाळ नव्या वियोगीं
संवेदना तुजमुळें बहु तीव्र भोगी.
येतें तदा लपविणें प्रियवस्तु–चित्र,
त्वत्कार्य येथ दिसतें उलटें विचित्र. ३

नाहीं तथापि उलटें, न विचित्र कांहीं;
येथें कले ! करिसि तूं जित अंतकाही !
तन्नष्ट ती–फिरुनि मूर्ति–तशीच केली;
तेणें तुझी कुशलता कळसास गेली ! ४

डोळ्यांपुढें प्रकृत कीं प्रतिबिंब त्याचें,
हें भेदभान हरुनी अवलोकित्याचें;
संवेदना अमुक एक अजिंक्य व्हावी,
सत्ता तुला अधिक ह्याहुनि काय व्हावी ? ५

नातें तुझें जवळचें जनलोचनांशीं,
तें ठेवितें तव सखी कविता मनाशीं;
सत्ता तुझी म्हणुनि बाह्य जगांत जैशी
चाले तुझ्या भगिनीची तितुकी न तैशी. ६

सर्वत्र पर्णकुटिका अथवा महाल—
ह्यांतोनि वैभव तुझें करितें कमाल.
चित्रें·यथार्थ सगळ्या स्थिरजंगमांचीं
पाहोनि दृष्टि विधिचीहि चकावयाची ! ७
त्याच्या अतर्क्य करणींतिल मोहनी तूं,
तूं चित्तरंजन, कले ! जनसौख्यहेतू;
त्वत्कार्य सुंदर अतीव खरेंखुरें तें,
जें सृष्टिच्या न कळतां करि वंचनेतें. ८

**प्रकाशन**—यशवंत मासिकाचा,
साहित्यसंमेलन—खास—अंक.

---

## कवितेचीं विलासस्थलें.



"The province of Poetry is to describe nature and passion."

—*Dr. Johnson*.

जेथें आम्रतरू शतावधि छताऐसे नभा झांकिती,
गंधोद्गार परागही अरुणशा तन्मंजरी टाकिती;
भृंगे गुंगत संभ्रमें विचरती प्राशोनि आम्रासवा,
गाती जेथ ' कुहू कुहू ' पिक असे वासंतिका वैभवा. १

* * *

जेथें पेटुनियां अरण्यवलय ज्वालावली चालती,
ग्रीष्मार्क प्रखराग्निचे कण जणो ओतीतसे खालतीं;
ऐसा ताप, असह्य धूम करितां प्राणावरोध, त्वरें
जेथें दीन कुरंग ते भडकले चोंहींकडे धावरे. २

* * *

जेथें दारुण मेघसंघ सहसा संध्यानिलें आणिले,
मेघांनीं जलधीस, त्या जलधिनें मेघांसही न्हाणिलें;

घो घो घोष सरोष सागर करी, पाषाणराशींवरी
त्याचे स्थूल तरंग भंगति महा शैलप्रपातापरी.
त्या लाटा फुटतां तुषार उडती त्यांचे सहस्रावधी,
धारापात मिळे तयांत चमके विद्युल्लताही मधीं,
त्या तेजें जलबिंदु ते झळकती नक्षत्रपातापरी,
भासे वासव हा हिरेच रिचवी कीं काय रत्नाकरीं. ३

*　　*　　*

जेथें पुष्पितसे कळंबहि कुडे आर्द्रानिलें डोलती,
टाहो फोडुनि आग्रहें जणु शिखी 'या हो!' घना बोलती;
ठाणें गर्वभरेंच पर्वतशिरीं जैं मेघसंघें दिलें,
धो धो वर्षुनि गर्जुनी गडगडां पाषाणही भेदिले.
नानाजाति घनाभिषिक्त हिरव्या गार प्रसन्नौषधी
जेथें झांकिति सर्व पर्वत, अशा प्रच्छन्न शैलामधीं
वेगें स्थूल जलौघ वाहुनि कड्याखालीं उड्या टाकिती,
झंझानें जल बाष्पसें पसरुनी खोरे दरे झांकती. ४

*　　*　　*

जेथें लागुनि राहिलें तृण नव सर्वत्र पाचेपरी,
जागोजाग अखंड वाहति झरे संशुद्ध कांचेपरी;
जेथें भूवरि टेंकलें चहुंकडे अभ्रांकिताकाश त,
खिल्लारें, कळप, स्वतंत्र चरती, वेणू जिथें वाजते. ५

*　　*　　*

जेथें आर्द्र वनस्थलीवरि तृणें नानाविधें माजलीं,
झाईतें नभ वर्षतें, झळकती खद्योत तारावली;
जेथें दृश्य अदृश्य होय सहसा ज्वाला पिशाचीपरी.
नादें सर्व दिशा प्रकंपित करी तो रौद्रसा केसरी. ६

*　　*　　*

जेथें दिव्य शरत्प्रभातसमयीं मंदानिलें हालती
आंबेमोहर कीं कमोद लवुनी शालीभरें खालतीं;

भोंतीं संचरती सुगंधलहरी, माशाहि सीत्कारिती,
'री री' शेतकरी करी, गडगडी-मोटा पयें ओतिती. ७

* * *

जेथें शांतहि कांत नीलमणिसें कासार तें शोभलें,
तारामंडल शारदेन्दुसह तें ज्याच्यामधीं बिंबलें;
भासे कीं वनदेवतेस शरदें हीं भेट रत्नें दिलीं,
देवीनें शरदुत्सवार्थ अथवा झाकीच¹ की रेखिली. ८

* * *

जेथें सर्व दिशांस बाष्प भरलें, पाहोनि वाटे मला,
विश्वाला करण्यास काय दुलई कापूस हा पिंजला ?
केला दूर अहो यदा निजकरें कापूस तो भास्करें,
त्यांतोनी दंवरूप तों विखुरले देवेन्द्र याचे हिरे ! ९

* * *

जेथें संतत वात वाहति अहा ! अत्यंत की शीतसे,
अंगा झोंबति ते व्रणांस शिपके क्षारोदकाचे जसे;
अभ्रें पांघरला रवी, अनलही रक्षा स्वसंरक्षणा,
झाले जर्जर जीव दाविति तरू-वेली जरालक्षणां. १०

* * *

जेथें दुर्गम दुर्ग कालवश ते होवोनि चोंहीकडे
झाले छिन्न विभिन्न वज्रपतनें जैसे गिरींचे कडे;
वाडे मोडुनियां उजाड पडतां जैं लागलीं वाघळें,
कांती कालभुजंग टाकिति, जिथें तें घूकही विव्हळे. ११

* * *

जी देवी अलकावतींत विहरे यक्षांगनांसंगतीं,
मेघांच्या पडद्यांत जी विलसते सौदामिनी-भामिनी;

---

१ हिंदुस्थानी शब्द. उत्तर हिंदुस्थानांत देवांच्या उत्सवांत देवापुढें परातींत पाणी घालून जी पुष्परचना करितात, तिला तद्देशीय लोक 'झाकी' असें म्हणतात. शब्द चांगला जाणून उद्धृत केला आहे.

केतूंच्या पिचकारिनेंच विमला तारांगणें जी धुते,
उल्कांचीं उधळी फुलें, गगन-हें झंझानिलें-झाडुनी;
सायन्देविसवें गुलाल रमते, रंगीत इंद्रायुधें
रांगोळी महिराप घालुनि जनां जी कौतुकें रंजवी;
शालू नेसुनि काजळी जणु खुले ज्योतिष्मती श्यामला,
राका चंद्रमुखीसवें अमृतसें सौजन्य जी वर्षते;
रत्नालंकृति शुक्रचंद्रयुतिची घालोनि केव्हां सजे,
पूर्णेन्दू, रवि, हे सुरम्य रबरी चेंडूच जी खेळते;
केव्हां कल्पलतेवरी चढुनि जी झोकेच घे मोहिनी,
स्वर्गंगालहरीवरी नलसख्या हंसासवें पोहते;
केव्हां जी हिमपूर्ण त्या ध्रुवपदीं हांसे उषेच्या सवें,
केव्हां बागडते सुनंदन वनीं देवांगनांसंगतीं;
वृष्टीची सखि जी दयार्द्रहृदया प्रेमासवें गाळिते,
अभ्रें—बाष्पमिषेंच पाखर कधीं जी वत्सला घालिते;
गांधारीसम आंधळी प्रणयिनी अव्यक्त राष्ट्रांतली,
अव्यक्तांतहि विस्मयें करुनि जी लीलावती शोभली. १२

[ वैतालीय छंद ]

विरही जन आपुली सखी
स्मरुनी तो म्हणतो तिला जिथें:—
सदये हृदयेश्वरी! किती
किति सोसूं तरि गे वियोग हा!
तनु हें विरहानलीं जळे
मन चिंतादहनांत आहळे;
वणवाच जिवास लागला
सुख कोठेंहि न राहिलें मला!
सखि मोहनबाग, बंगला,
तुजवांचोनि उदास, ओस हा!
कसल्या उपभोग,—आवडी
जरि माझी जवळी न आवडी!

रडतों दिनरात्र मी सये !
कधिं गे तूं मज भेटशील ? ये !
विषही अमृतासमान हो
असतां दैव सहाय देवही !
कटु हाच वियोग पालटो
तव योगांत सदैव योगिनी !
मधुरे ! मुखचंद्र गोड तो
उगवूं दे, कधिं गे दिसेल तो ?
नयनें हरिणीच सारखीं
कधिं गे तीं बघतील सारखीं ?
वद ये मृदु मंजु कोकिले !
चतुरे, तूं सुगरीण गे कशी !
घरटें सजवूं, सुखें रहा;
प्रणयाला प्रणयास दे, पहा.
उटजांतिल दीप तूंच. ये,
मम जीवा, शिवलीन हो स्वयें. १३

* * *

एकांतीं प्रिय·कांतचित्र धरुनी सारंगनेत्रा जिथें
प्रेमानें मुख त्यांतलें निरखुनी ती सारखी चुंबिते;
तो·साक्षात् पति आरशांत दिसला, हांसेच मागें·उभा·!
मारोनी·सकटाक्ष गोड मुरका गेली विजेची प्रभा ! १४

* * *

कोणी एक सुशिक्षिता, नववया, रूपें गुणें मोहिनी
भार्या सुंदर बंगल्यांत रमली कादंबरी—वाचनीं;
आला कांत हळूच मागुनि तिथें डोळे तिचे झांकुनी
नीःशब्दांतचि तो तिला नट म्हणे 'मी कोण ? घ्या·जिंकुनी !'
ती नांवें कथिते अनेक सखिचीं; 'नाहीं' म्हणे, तो हंसे;
'हो हो वन्सच ! 'रिस्ट वॉच' तुमचें हें 'सील;' नाहीं कसें !

आहां वन्सच, वन्स हो ! ठरविते ती चांचपोनी तया,
'कां मीं ओळखलें कसें ?' तिजसि ती लागे फुशारावया.
डोळे सोडुनि तों नटें चटदिशीं ती स्त्री समालिंगिली !
तें पाहोनि चपापली, 'अग बई हें कोण ?' आश्चर्यली.
वारंवारचि 'वन्समोर !' म्हणुनी तो चुंबनें घेतसे,
मावेना मग बंगल्यांत पिकलें जें जोडप्याचें हंसें. १५

*  *  *

जेथें सागरसा समाज भरला, वाचस्पती मोहरा
कर्ण्यांतोनि पुकारितो,—" स्वजनहो ! या सज्ज व्हा संगरा.
खेळे रक्त नसां-नसांत अमुच्या ह्या हिंदमातेंतलें,
गीतेचे अमृतासमान घुटके आम्हीं सदा घेतले.
जर्यांनी पटका, अजिंक्य भगवा झेंडा स्मराहो स्मरा !
नेता, छत्रपति, स्वराज्यजनिता, राजा शिवाजी स्मरा !
वंदा हिंद सुमातरं, जमुनिया सारे चला, व्हा पुढें !
आहे ठेवियलें स्वराज्य-फल ह्या यत्नांपुढें रोकडें." १६

*  *  *

जेथें सर्व विपक्षवीरहृदयें पृथ्वीपरी भेदिता,
मार्तंडावरि आदळोनि सगळें ब्रह्मांड हेलाविता,
ऐसा घोष करोनि, घोर समरीं तो वीर शत्रूवरी
उल्कातुल्य पडे; प्रकोपदहनीं लीन स्वदेहा करी. १७

*  *  *

जेथें वीर बलाढ्य शस्त्रधर ते निःशस्त्र बंधूंवरी
क्रूर श्वापदसे तुटोनि पडती, कीं वन्य मारेकरी,
तेव्हां उन्नत धर्मतत्त्व, म्हणती ज्याला 'तितिक्षा' असें,
त्याचें गाढ अभेद्यसें कवच तें अंगांत ज्यांच्या असे,

ऐसे बांधव धर्मवीर अमुचे तो मारही सोशिती,
ध्येयातें अनुलक्षुनी प्रगतिला जे शांतिनें ठेविती;
जेथें अप्रतिकार वर्तन असें लोकोत्तरांचें घडे,
जेथें जय्‌जयकार गर्जति, जिथें होती फुलांचे सडे. १८

*   *   *

काळानें तनु वांकली, सकलही अंगांस आली जरा,
दुःखांचा नयनांमधोनि झरतो वाटे उन्हाळा झरा[1],
चर्या खेदभरें—वयें—उतरली, माथा रुपेरी दिसे;
म्हातारी निज दंड टेंकित अशी कारागृहीं येतसे.
" बाबांनो !" करुणस्वरेंच म्हणते काराधिकाऱ्यांस, " रे
पाहूं द्या मज, भेटवा कुणितरी माझीं मला वासरें !
सारे थोर, निरापराध, शिणती माझी दशा पाहुनी
देवा ! दे मजला सुखें मरण दे ह्या पारतंत्र्यांहुनी !" १९

*   *   *

ती पौषांतिल पौर्णिमा; शशि नभोमध्यावरी पातला,
थंडी ' मी' म्हणते प्रशांत रजनी, ये शब्द ना कोठला;
ह्या काळीं कुणि एक नंग्न वनिता मार्गांतुनी एकली
येतां दूरुनि ती भयानक मला कालीपरी भासली.
भालीं कुंकुम फांशिलें, कच तिचे पाठीवरी मोकळे,
दो हातांतुनि धग्‌धगाट शगड्या, तो धूप मध्यें जळे,
आली सन्निध चेटकी, मग वळे ती भद्रकालीकडे,
तीतें पाहुनि घाम—कंप सुटला, छाती भयानें उडे ! २०

*   *   *

जेथें सिंधुतरंग एक सहसा पेटोनियां लागली
लाखोंही लहरी जणो उजळल्या विद्युत्प्रदीपावली !

१ ऊन्ह पाण्याचा झरा—Thermal.

सूर्येन्दू नसतां असा तळपुनी तो अंबुधी राहिला;
सृष्टीचा-प्रभुचा-अगाध महिमा हा विस्मयें पाहिला. × २१

* * *

जेथें विठ्ठल-भक्तसंघ जमले श्रीचंद्रभागातटीं,
जेथें विठ्ठल विठ्ठल ध्वनि निघे टाळांचिया संपुटीं;
जेथें विठ्ठल हाच घोष घुमला संघा—मृदंगांतुनी,
आहे विठ्ठल हाचि एक अवघा सर्वत्रही व्यापुनी. २२

* * *

योगी सिद्ध समाधि.लावुनि जिथें पद्मासनीं बैसला,
तेणें आश्रम शांतिचाच निधि जो प्रच्छन्नसा साजला;
मंजूषेंतुनि गुप्त देह अपुला संगोपुनी हा मुनी
ब्रह्मानंदविलीन होउनि वसे. ही-हीच हो उन्मनी !
ह्याचे सर्वहि दुःखताप शमले, त्यांच्या निमाल्या झळा,
ह्याच्या शांतिसुखास पार नुरला, सोळा कळा सोज्ज्वळा !
पुण्यात्मन् ! किति धन्य जीवित तुझें ! हे सज्जना चंदना !
देतो शीतलता समागम तुझा शांतीहि माझ्या मना. २३

* * *

रत्नाकरा ! नव मनोहर पाडसा रे
बाळा ! तुझें करिति कौतुक लोक सारे.
पाहोनि रूप गुण सुंदर मीहि धालों;
खाऊ तुला म्हणुनि घेउनि आज आलों.
ये भेट ये कडकडोनि किशोरका तूं !
आधीं मुका मधुर ! नंतर घेइं खा तूं—
मेवा परोपरि असे, तुज आवडेल.
माझें तुला स्मरण याचमुळें घडेल. २४

---

× हा विश्वचमत्कार श्रीमंत सरकार गायकवाड ह्यांच्या राज्यांतील कोडीनार महालांत फतलबारा ह्या बंदराजवळ दिसत असतो. त्याला तद्देशीय लोक ‘ वडवो ’ ( म्हणजे वडवानल अर्थात् फॉस्फरस ) असें म्हणतात.

शब्दब्रह्मचि अंतरिक्षसम तें, सीमा तयाला नसे.
जागोजाग विलास त्यांतुनि तुझा नानापरी होतसे.
येथें शक्य नसे परी उतरणें तीं सर्व रम्य स्थळें.
कांहींचे जनरंजनार्थ कविते ! आलेख्य हे लेखिले. १

---

## आत्मबोध.

( श्रीमदाचार्यकृत आत्मबोधाचें भाषांतर. )



वसंततिलका.

ज्यांचीं तपें करुनियां दुरितें जळालीं,
वैराग्य आदरुनि शांति जयांस आली,
ऐसे मुमुक्षु जन जाणुनियां भुकेले
हें आत्मबोध—अमृतान्न तदर्थ केलें. १

मोक्षाचिये असति अन्य उपाय जे जे,
हा बोध एक नृपसाच तयांत साजे;
ज्ञानाविना गति न मोक्षपदास होते,
पक्वान्न जेविं नहि वन्हिविना अहो तें. २

कर्में करोनि न कधींहि टळे अविद्या.
कीं, त्या द्वयांत न विरोध. परंतु विद्या—
ही मात्र निश्चितपणें हरिते तियेतें;
जैसें सुतेज तिमिरास लयास नेतें. ३

अज्ञानरूप पटलें जणु झांकलाहे
आत्मा; करा पटल दूर विशुद्ध राहे.
तो सर्वदा झळकतो स्वयमेव तैसा
मेघावली वितळतां दिनराज जैसा. ४

अज्ञान हा मिसळला मळ ह्या जिवाशीं,
ज्ञानानुशीलन विशुद्ध करी तयासी;
तें ज्ञानही मग सवेंच लयास जातें,
जैशी जळा निवळुनी निवळी जळीं ते. ५

स्वप्नासमान भव होय असार सारा,
द्वेषानुराग–विकृतीकृत हा पसारा;
तो स्वप्न जोंवरि दिसे तंव सत्य वाटे,
होतां प्रबोध पटतें सगळेंच खोटें ! ६

आधार जें सकल ह्या स्थिरजंगमाला,
तें ब्रह्म अद्वय न जों कळलें मनाला,
हें विश्व तोंवरि तयास खरेंच भासे,
शिंपेस रौप्य गणितात अजाण जैसे. ७

जो सच्चिदात्ममय एक सदैव आहे,
व्यक्ती अशा हरिमधोनि अशेष राहे;
सोनें जसें असुनि एक अनेकजाती
तोडे, कडीं, नग तयांत समावताती. ८

आकाशतुल्य परमेश उपाधि नाना
लागोनि भिन्न दिसतो जरि डोळसांना,
ते ते उपाधि तरि पावलिया लयातें,
तो एक केवळ असे उमजे मनातें. ९

आत्म्यास वर्ण, विविधाश्रम, नाम, जाती,
ऐसे उपाधिगत भेदहि लाविताती;
जैसें असोनि जल केवळ एक अंगें
भिन्नत्व त्यांत गणिती रस-रंग-संगें. १०

पंचीकृतें करुनि पांच बलाढ्य भूतें
त्यांपासुनी निज शरीर घडोनि येतें;
आपापुल्या प्रथम संचितकर्मजालें
हें भोगण्यास म्हणती सुखदुःख आलें. ११

ते प्राण पांच, मन, बुद्धि, दशेन्द्रियें तीं,
भूतेंहि संयुत करोनि अपंचिकें तीं,
सूक्ष्मांग त्यांजमधुनी निज निर्मियेलें,
तें भोगसाधन म्हणोनि तयार केलें. १२

अज्ञानराशिच अनादि अवर्णनीया
ही कारणाख्य तिसरी म्हणतात काया;
ऐशा तिन्ही तनुहुनी व्यतिरिक्त जो का,
आत्मा असे सतत चिन्मय तो विलोका. १३

येरीति तीन तनु, आणिक कोश पांच,
यांच्या समागमगुणें गमतो तसाच;
आत्मा स्वयें विमल आणि अलिप्तसा तो.
नीलांशुकें स्फटिक जेविं निळाच होतो. १४

हें कोशपंचक, तनुत्रय, आत्मयाशीं
संयुक्त होय जणु फोलच तण्डुलाशीं;
कांडोनि साळ जणु तण्डुल शुद्ध घ्यावें,
आत्मान्तरंगहि तसें मननें पहावें. १५

आत्मा सदैव सकलांत भरोनि राहे,
सर्वत्र तो न नयनां जरि दीसताहे;
बुद्धींत मात्र घडतो पण भासमान
तो निर्मलांत पडल्या प्रतिमेसमान. १६

हे इंद्रियांसह तनू, मन, बुद्धि, साची
आहे प्रजाच नृपतुल्य निजात्मयाची;
राही प्रजेहुनि अलिप्त, करी न कांहीं,
तो आत्मराज तरि वृत्ति तदीय पाही. १७

पाहोनि कर्मरत इंद्रियवर्ग वाटे
आत्माच त्यांसह जगांतुनि ह्या रहाटे;
कीं धांवते ढग बघोनि खुळ्या जनांना
येतो जसा दिसुनि चंद्रच धांवतांना. १८

चैतन्य हा करुनि आश्रय आत्मयाचा
देहेन्द्रियादि करिती व्यवहार त्यांचा;
सूर्यप्रकाश जणु घेउनियां सहाया
कर्मैं स्वकीय जन लागति आचराया. १९

जे जे अनेक गुण कर्म निजेन्द्रियांचें
'कर्त्ते' असें म्हणुनि त्यांसचि द्यावयाचें,
तें मूर्ख लाविति पहा विमलात्मयाला;
जैसें निळें नसुनि, ते म्हणती नभाला. २०

कर्तृत्व, भोगरति, धर्म असे मनाचे
नेणोनि कल्पिति खुळे जन आत्मयाचे;
कीं लावितात जलचंचलता जशी ते
त्यांतोनि बिंबित अशा अचला शशीतें. २१

इच्छा, तसा विषयलोभ, सुखाऽसुखादि,
आत्म्याचिये नसति,—हे मतिचे उपाधि;
निद्रेंत नांवहि नसे मतिचें, तयांचें,
धीचेच ते तरि उपाधि;–न आत्मयाचे. २२

सच्चिन्मयत्व, विमलत्व, सदैव साचा
आनंद हा सहजधर्म निजात्मयाचा;
उष्णत्व, शैत्य, जणु कीं अनला–जलांचा
धर्म प्रकाश अथवा जणु भास्कराचा. २३

सच्चिन्मयांश परमात्मविभाग कोठें !
वृत्ती अशाश्वत अशी मतिचीहि कोठें !
तत्रापि त्या मिसळुनी विषमद्वयातें,
'मी जाणतों' म्हणति मूढ कसे पहा ते ! २४

आत्म्यास दुःखसुख हे न विकार कांहीं.
हा सत्यबोध मतिला न कदापि होई.
जीवास तो कळतसे. तरिही खुळा तो
कर्त्ताहि मी चतुर, मोह असा वहातो. २५

मी जीव मानुनि फुका जन भीति पावे,
दोरीस सर्प म्हणुनी जणु घाबरावें.
आत्मा परी परम मी,—नहि जीव कांहीं,
हें ज्ञान पूर्ण ठसतां भय त्यास नाहीं. २६

आत्मा प्रकाशवितसे सकलेन्द्रियांते,
जैसा प्रदीप तिमिरांत घटादिकांते;
ये आत्मयाविण अचेतनता जयांला,
तीं केविं दावितिल दिव्य परात्मयाला ? २७

आत्मा प्रकाशमय जो स्वयमेव त्याला
अन्य प्रकाश नलगेच पहावयाला;
कीं एक दीप निजरूप दिसावयातें
आणा कधीं न म्हणतो दुसऱ्या दिव्यातें. २८

गा ! तें न, तें न हि अशा वचनेंच आधीं
टाकी चराचरमिषें सगळे उपाधी;
" तें तूंच " आदिक महावचनें* पहावे
जीवात्म आणि परमेश्वर एकभावें. २९

देहादि हें असुनि मायिक सत्य वाटे.
हें बुद्बुदासमचि नश्वर विश्व खोटें.
ऐशा अशाश्वत जगाहुनि भिन्न साचा
मी ब्रह्म निर्मल खरें समजे त्रिवाचा. ३०

मी ह्या तनूस परका. मज जन्म नाहीं,
वृद्धी, जरा, न दुबळेंपण नाश हाही.
सर्वेन्द्रियांरहित मी; म्हणुनी न रंगे
मी स्पर्श—शब्द—रस—रूप—सुगंधसंगें. ३१

नाहीं मला मन, म्हणोनिच दुःख नाहीं,
न द्वेष तेविं अनुराग भयादि कांहीं;

---

* 'नेति नेति,' 'तत् त्वमसि,' 'अयमात्माब्रह्म,' इ० वेदवाक्यें.

आधार वेदवचनार्थ पुढील यालाः–
" न प्राण ना मन तया धवलात्मयाला." ३२

नाहीं क्रिया, गुण मला क्षय तोहि नाहीं,
नाहीं विकल्प, मल वा न विकार कांहीं;
आकार, बंधन तसेंच नसे; असा मी
आत्मा विशुद्ध भरलों सकलान्तरामीं. ३३

मी व्यापलों चहुंकडेहि तिन्ही त्रिकालीं,
आकाश जेविं भरलें विमलान्तरालीं;
सर्वांस मी सम असे, मज नाश नाहीं.
निःसंग, शुद्ध, विमल, स्थिर मी सदाही. ३४

जें एक शाश्वत, विशुद्ध, विमुक्त, साचें,
आनंदरूपचि अखंड दुजें न ज्याचें;
जें ज्ञान सत्यहि अनंतहि जें स्वभावें,
तें ब्रह्म मीच परमेश असें गणावें. ३५

' मी ब्रह्म ' संतत घडे जरि भावना ही
विक्षेप मायिक तरी लवही न राही.
कीं, रोम रोम भिनल्यास रसायनें तीं
जैसे अनेकविध रोग लयास नेती. ३६

वैराग्य तें अढळ तीव्र असें धरावें,
स्वाधीन इंद्रियरिपू पुरते करावे;
एकांतशा स्थलिं बसोनि अनन्यभावें
आत्मा अनंत समजोनि तया स्मरावें. ३७

सुज्ञें जनें नयनगोचर विश्व सारें
आत्म्यामधीं करुनि लीन सदा विचारें,
त्या आत्मयासचि सदैव अनन्यभावें
ध्यावें, विशुद्ध गगनासम जो स्वभावें. ३८

जो जाणता जन असे ' परमार्थ ' याचा,
तो रूप, वर्ण, मग ओळखतो कशाचा !

सच्चित्सुखात्मकचि तो परिपूर्ण आहे,
तो ब्रह्म मीच समजोनि सदैव राहे. ३९

ज्ञाता, सुजाणपण, आणिक जाणण्याचें,
हे भेद जाति विलयास अशेष त्याचे,
जो ब्रह्मरूप सजला, मुनिसा अहो, तो
सत्–चित्–सुखीं समरसे, तळपे स्वयें तो. ४०

ह्या आत्मरूप अरणींतुनि याज्ञिकांचें
हो ध्यानमंथन जरी दिनरात्र साचें,
बोधाग्नि पेट तरि घेउनि तेचि काळीं,
अज्ञानरूप समिधांस तदीय जाळी. ४१

गाढान्धकार हरतां अरुणोदयानें,
मागोनि भास्कर जसा उगवे क्रमानें,
बोधें तसा प्रथम मोह लयास जातो,
आत्मा स्वयेंचि पुढतीं उदयास येतो. ४२

आत्मा स्वहस्तगतसा असतो सदाही;
अज्ञांस तो तरि अलभ्य असाच राही.
तो प्राप्तसा दिसुनि ये जरि मोह गेला;
कंठांत हार गवसे जणु शोधिलेला ! ४३

खुंटास चोर म्हणतात जसे भ्रमानें,
आत्म्यास जीव जन कल्पिति त्याप्रमाणें;
आत्मा समक्ष दिसल्यास परी अहो तो,
मी जीव हा भ्रम वृथा मग दूर होतो. ४४

जें ज्ञान तत्त्व कळतां उदयास येतें,
तें 'मी' 'ममा'दिक विमोह लयास नेतें;
प्राची दिशा उजळतांच रविप्रकाशें
तत्काळ दिग्भ्रम जसा स्वयमेव नाशे. ४५

योगी, कळे परम तत्त्व यथार्थ ज्याला,
ब्रह्मांड हें मग निजात्मविलीन त्याला;

विज्ञानरूप नयनें चवदाहि लोकीं
तो आत्मरूपचि अशेष, असें विलोकी. ४६

आत्माच हें सकळ विश्व. तदन्य कांहीं
नाहीं. निजात्ममय तो सगळेंचि पाही.
आध्यांत कुंभ, सुगडें, परळें, पराती,
पात्रें अनेक; तरि तीं जणु एक माती. ४७

त्यागोनि पूर्वगुण आणि उपाधि सारे,
जो ब्रह्मरूप सजला सदसद्विचारें,
ज्ञानी जिता असुनि मुक्तचि तो म्हणावा;
जैसा किडा भ्रमर होउनियां सुटावा. ४८

योगी असा तरुनि मोहमहार्णवातें,
रागादि संहरुनि रावण-राक्षसांतें,
पावोनि शांति सुमनोहर जानकी जे
आत्माऽभिराम जणु रामच तो विराजे. ४९

त्या देहभाव न शिवे असतांहि देही,
आकाश सर्वगत जेविं अलिप्त राही;
सर्वज्ञ तो, तरि वसे जणु मूढ लोकीं,
निःसंग राहुनि फिरे जणु वायु तो की. ५०

जाणोनि बाह्यसुख भंगुर त्यास टाकी,
तो अंतरात्मसुखरूप रमे तटाकीं;
कीं स्वच्छ दीपचि घटांतुनि ठेविलेला,
तो अंतराल उजळी करुनि प्रभेला. ५१

नीरांत नीर, गगनीं गगन स्वभावें,
तेजांत तेज अथवा प्रविलीन व्हावें,
तैसा उपाधि हरतांच मुनी अहो तो
ब्रह्मामधें समरसोनि विलीन होतो. ५२

जें लाभतां अधिक लाभ दुजा न कांहीं,
ज्याच्या सुखाहुनि दुजें सुख थोर नाहीं,

न ज्ञान त्याहुनि दुजें कळल्यावरी जें,
तें ब्रह्म तूं समज. हा श्रुतिघोष गाजे. ५३

जें पाहिल्यास नुरलेंच पहावयाचें,
जें झालियास जननास न यावयाचें,
जाणावया उचित अन्य न जाणिल्या जें,
तें ब्रह्म तूं समज. हा श्रुतिघोष गाजे. ५४

सत्–चित्–सुखेंकरुनि जें परिपूर्ण राहे,
खालीं, वरी, चहुंकडेहि अनन्य आहे,
निःसीम जें, सतत एकुलतें असे जें,
तें ब्रह्म तूं समज. हा श्रुतिघोष गाजे. ५५

वेदान्त ‘ नेति ’–वचनाव्यतिरिक्त अंतीं
जें एक, अव्यय, तुला निवडोनि देती,
आनंदरूपचि, अखंड, अनन्यसें जें,
तें ब्रह्म तूं समज. हा श्रुतिघोष गाजे. ५६

आनंद हें सकल संतत रूप ज्याचें,
आनंदलेश अवलंबुनियां तयाचे,
कोणी उणे, कुणि विशेष, अशा प्रकारें
सानंद देव असतात तदंश सारे. ५७

त्यानेंच युक्त जगतांतिल हा पसारा,
त्यानेंच युक्त घडतो व्यवहार सारा,
त ब्रह्म यास्तव पहा सकलांत राहे,
व्यापूनि, जेविं घृत सर्व दुधांत आहे. ५८

न स्थूल, सूक्ष्महि न जें, लघु, दीर्घ नाहीं,
नाहीं जया जनन, वा क्षय तो कदाही;
ना रूप, ना गुण, न वर्ण जया असें जें,
तें ब्रह्म तूं समज. हा श्रुतिघोष गाजे. ५९

ज्याचा प्रकाश उसना मिरवी रवी तो,
तेजोऋणी रवि न ज्यास चकाकवीतो;

ज्याची कळा झळकवी सकळां असें जें,
तें ब्रह्म तूं समज. हा श्रुतिघोष गाजे. ६०

जें अन्तरंग बहिरंग जगत्त्रयाचें
व्यापूनि सर्व उजळी स्वयमेव साचें,
तें ब्रह्म नित्य तळपूनि असे अखंड,
होवोनि लाल अनलीं जणुं लोहपिंड. ६१

तें ब्रह्म सर्व जगताहुनि भिन्न आहे,
त्याहूनि अन्य असलें किमपीहि नोहे;
ब्रह्माविना इतर तें लटिकेंच सारें,—
वाळूवरी मृगजलासम भासणारें. ६२

जें पाहतों, परिसतों, जगतांत कांहीं,
तें ब्रह्म. त्याहुनि दुजें लवलेश नाहीं.
तें एक 'सत्' असुनि चित्सुखरूप साचें;
हें आत्मबोध घडतां समजावयाचें. ६३

सत् चित् जगन्मय अशा परमात्मयाला
हो ज्ञानलोचन समर्थ पहावयाला;
तो ज्ञाननेत्ररहितां न दिसेचि तैसा
देदीप्यमान रवि अंध जनास जैसा. ६४

मालिनी.

श्रवण, मनन, तैसा ध्यास, हे तीन भाते
रसरसविति भोतीं ज्ञानवैश्वानरातें;
मल मग परितापें दग्ध होती जिवाचे,
झळ झळ झळके तो जेविं सोनेंच साचें. ६५

शिखरिणी.

यदा आत्मारूपी हृदयगगनीं ये दिनमणी,
तदा अज्ञानाचें तिमिर पळवी ज्ञानकिरणीं;

दिसे सर्वव्यापी, सकल जगदाधारक असे,
प्रकाशी विश्वातें, सतत निज तेजेंच विलसे. ६६

शार्दूल०

ज्याचा देशदिशांसवें नच तसा संबंध कालासवें,
सर्व व्यापक शुद्ध नित्यसुख जें, न द्वंद्व जैं संभवे;
कर्मे सोडुनि आत्मतीर्थ असलें जो नित्य आराधितो,
तो सर्वज्ञ मुनी स्वतंत्र गमनीं मोक्षासही साधितो. ६७

अप्रसिद्ध—बडोदें.
ता. २४-११-३१.

